# ' गोविंदसुत '





द. प. चिंचाळकर,
वकील, अमळनेर

किंमत १ रुपया

# कै. 'गोविंदसुत

## उर्फ

# परशुराम गोविंद चिंचाळकर

# यांचें चरित्र.

## ( त्यांच्या ग्रंथांतील सद्बोधसूक्तींसह )



लेखकः—दत्तात्रय परशुराम चिंचाळकर

बी. ए. एल एल. बी. वकील, अमळनेर



हें पुस्तक विश्वनाथ गणेश जावडेकर, बी. ए. एल एल. बी.
वकील, धुळें, संपादक प्रबोध, यांनीं धुळें येथें
गल्ली नंबर २ घर नंबर १२ येथें आत्माराम छापखान्यांत छापून
दत्तात्रय परशुराम चिंचाळकर, वकील, अमळनेर, यांनीं
तेथेंच प्रसिद्ध केलें.

१९३५

किंमत १ रुपया

*



गोविंदसुत संध्यावन्दन करीत आहेत.

# ❀ अर्पण-पत्रिका ❀



**मातृ देवो भव !          पितृ देवो भव !**



ज्या परमपूज्य मातापितरांनीं आपल्या उदरीं जन्म देऊन आम्हांस
लहानाचें मोठें केलें, ज्यांनीं आपल्या गोड वाणीनें व सदाचरणानें
आमच्या व जगाच्या कल्याणाचा अमोलिक उपदेश केला,
आमच्या हातून घडणाऱ्या असंख्य चुका, दोष व
पातकें यांबद्दल गंभीरपणानें व पुत्रवात्सल्यानें क्षमा
करून ज्यांनीं आपल्या कृपाछत्राखालीं आम्हांस
सुखरूप ठेवलें, ज्यांचें पुण्यस्मरण अद्यापही
आमचें दौर्बल्य नाहींसें करून आमचें
सर्व प्रकारें संरक्षण करण्यास समर्थ
आहे अशी आमची आध्यात्मिक
निष्ठा आहे त्या प्रेमळ
मातापितरांच्या स्मरणस्फूर्तीनें
लिहिलेलें हें पुस्तक गोविंदसुतांचा
शेवटचा लेख ज्या तत्त्वज्ञानमंदिराच्या
त्रैमासिकांत प्रसिद्ध झाला त्या तत्त्वज्ञानसंस्थेचे
अध्यक्ष व तत्त्वज्ञानाबद्दल विशेष आवड
बाळगणारे व गोविंदसुतांबद्दल प्रेम व आदर असणारे
अमळनेरचे सुप्रसिद्ध नागरिक श्री. मोतीलाल माणकचंद
ऊर्फ प्रतापशेट यांस त्यांच्या अंगीं असलेल्या अनेक
सद्गुणांमुळें त्यांची परवानगी घेऊन आदरपूर्वक अर्पण केलें असे.



# गुरुवर्य बापट यांचीं चार अक्षरें



गोविंदसुतांच्या चरित्रांत माझीं अशीं चार अक्षरें पाहिजेत असें चरित्रकारांनीं आपलें मनोगत आग्रहपूर्वक समक्ष व पत्रद्वारा कळविल्यामुळें जें कांहीं सुचलें व आठवलें तें लिहून पाठवीत आहें. गोविंदसुत ही एवढी थोर विभूती होऊन गेली कीं तिचे सेवाधारी म्हणून मिरविण्यासही मला संकोच वाटतो. स्थितप्रज्ञ गोविंदसुतांची मूर्ती माझ्या नजरेसमोर सारखी उभी आहे. आध्यात्मिक विचारानें त्यांची योग्यता किती मोठी हें त्यांची परंपरा ध्यानांत आणली म्हणजे समजून येतें. " श्री नारायण विधि अत्रि नाथ दत्त जनार्दन एकनाथ नरहरि निंबराज नागनाथ उद्धव चिद्घन शामराज दिनानाथ विश्वनाथ गोविंद " याप्रमाणें ती गुरुपरंपरा आहे. शेवटचे गोविंद हेच श्री गोविंदराव वेल्हणकर होत व त्यांचे आध्यात्मिक सुत परशुरामपंत. ४० वर्षांच्या सहवासांत त्यांनीं आध्यात्मिक बैठक कशी स्थिर केली होती आणि " पदींहून चळूं नये " ही शिकवण त्यांनी स्वतः व माझे ठिकाणीं कशी एकरूप बिंबविली हें अनुभवीयांस माहीतच आहे. आपलें जड कलेवर जिचा अंश त्या भूवर ठेवते वेळीं त्यांना आतुर संन्यास देण्याचा विचार चालू असतां त्यांनीं स्वमुखानें आज्ञा केली कीं "हा विचार तुम्ही मनांत आणूं नका." ही त्यांची आज्ञा ऐकतांच मी त्यांना विचारलें कीं " आपण आपल्या स्वपदीं स्थिर आहां ना ?" तेव्हां त्यांनीं 'होय' असें सांगून तत्काल चिरंजीवाच्या मांडीवर उसें ठेवून निजानंदीं निमग्न जाहले. तो समय मनांत आला म्हणजे त्या दिव्य प्रकाशाचें स्मरण करून श्रीसमर्थांच्या उक्तीनेंच त्यांची प्रार्थना करणें हेंच जीवांचें कर्तव्य.

आम्ही अन्यायी अपराधी । आम्हां कैची दृढ बुद्धी ॥
माझे अन्याय अगणित । कोण करील गणीत ॥
मज सर्वस्वें पाळिलें । प्रतिदिनीं सांभाळिलें ॥
माझी वाईट करणी । रामदास लोटांगणीं ॥
शुभंभवतु. शिवोऽहम् । शिवोऽहम् । शिवोऽहम्

मु. आवास<br>२४।१२।३४

दत्तात्रेय यशवंत बापट



# दोन शब्द !

ठेविलियां दिसे रंगा ऐशी शिळा । उपाधीवेगळा स्फटिकमणी ॥ (श्री तुकाराम)

१ ' श्री गोविंदसुत ' यांचा देह जाऊन आज वर्ष झालें. ' आह्मांला जन्म नाहीं, मरण नाहीं, आह्मी कोठें जात नाहीं व कोठून येत नाहीं, आह्मी अखंड आहों तैसेचि आहों ' असें गोविंदसुत नेहमीं म्हणत असत व ज्या बैठकीवरून ते हें बोलत ती त्यांची बैठक स्थिर होती हें आह्मीं पाहिलें आहे. व्यतिरेकानें ते संसारांत असून सर्वांहून वेगळेच होते व अन्वयानें ते आपले आईबाप, चुलतेपुतणे, स्त्रीपुत्र, इष्टमित्र व गुरुजन यांशीं किती प्रेमानें वागले हें त्यांचे चिरंजीवांनीं त्यांचे परम मित्र आवासचे बापट मास्तर यांच्या मदतीनें लिहिलेल्या प्रस्तुत चरित्रावरून स्पष्टच होत आहे. हें चरित्र संक्षिप्त असून अगदीं यथार्थ आहे. गोविंदसुत जसे होते तसेच यांत दाखविले आहेत. यांतील एकही गोष्ट मिथ्या नाहीं किंवा अतिशयोक्तीची नाहीं. अन्वय आणि व्यतिरेक आमच्या स्वरूपीं पोंचतच नाहींत असें आह्मी शुद्धबुद्ध सच्चिदानंदस्वरूप आहोंत अथवा कोणतेच शब्द आमच्या ठिकाणीं पोंचत नाहींत असें ते म्हणत त्यांत अहंकाराचा लेशही नसून केवळ अनुभव होता. त्यांच्यापाशीं अहंकार कसलाच नव्हता. त्यांची आमची जेव्हां भेट होई तेव्हां त्यांचा आम्हांस पहिला प्रश्न असे : ' कां बळवंतराव ! कसें काय आहे ? ' आमचेही उत्तर एकच असे ' आनंद आहे.' यावर ते लगेच विचारीत : ' आनंद वृत्तिसहित आहे कां वृत्तिरहित आहे ? वृत्तिसहित असेल तर तो प्रपंचांतला अतएव मिथ्या आहे आणि वृत्तिरहित असेल तर त्याचा साक्षी कोण ? ' येथून मग जो ' उगमाचा सुखसंवाद ' होई तो दोन दोन तास टिकत असे ! अध्यात्मसुखसंवादाला त्यांच्यासारखा अधिकारी पुरुष आम्हांला दुसरा कोणी भेटला नाहीं. त्यांच्या पत्रव्यवहारांतही सारा अध्यात्मविषयच भरपूर असे. त्यांच्या मित्रांस गेलेलीं त्यांचीं सारीं पत्रें एकत्र करून छापण्यांत आलीं तर तोही एक आदरणीय स्वतंत्र ग्रंथच होईल. ' आतां ऐसे कोणी होणें नाहीं ' हें मनांत येऊन प्रवृत्ति-निवृत्तींच्या आंदोलनांत खेळणाऱ्या आमच्यासारख्या त्यांच्या सुहृज्जनांना प्रत्यहीं चुकल्याचुकल्यासारखें होऊन त्यांचा विरह जाणवल्याशिवाय रहात नाहीं.

२ दत्तोपंतांनीं लिहिलेलें त्यांचें प्रस्तुत चरित्र व बापट मास्तरांनीं निवडलेल्या त्यांच्या उक्ति एवढ्या जरी कोणी वाचल्या तरी त्यांची धुळभेट झाल्याचें त्यास समाधान वाटेल. प्रस्तुत छोटा ग्रंथ आटपशीर आहे. यांत पाहिजे तें सर्व आहे. पाल्हाळ नाहीं, वर्म सुटलें नाहीं. गोविंदसुतांचें विस्तृत चरित्र कोणीतरी लिहिलें पाहिजे. लोकांना तें मार्गदर्शक होईल. त्यांची सोज्वळ कुलपरंपरा, त्यांचें वडिलधाऱ्या व धाकट्या मंडळीवरील प्रेम, प्रपंच व परमार्थ–दोहींकडील सावधानता, त्याचा सततोद्योग व दीर्घव्यासंग, त्यांची निरलसता, त्यांची निर्मळ व शोधक तीव्र बुद्धि, त्यांचें शुद्ध व बाळबोध आचरण,

त्यांची निःस्वार्थता, राष्ट्रकल्याणाची अंतरीं वसत असलेली जाज्वल्यता, सर्वत्र असून असंगता हे त्यांचे गुण खरोखरीच मोठे मनोवेधक होते.

३ ग्रंथलेखनाची इच्छा किंवा संकल्प नसून ते ग्रंथकर्तृत्वाकडे कसे ओढले गेले हें प्रस्तुत चरित्रानें बरोबर दाखविलें आहे. त्यांचें सर्व लिखाण प्रथम माझ्या नजरेखालून गेलें आहे. अगदीं शेवटचा 'श्रीज्ञानेश्वरदर्शनांत' त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेला लेखही त्यांनीं लिहिणें संपतांच प्रथम माझ्याकडे अवलोकनार्थ पाठविला होता व नंतर तो छापण्यास गेला. त्यांचे तीन मुख्य ग्रंथ– १ परमार्थ विचारमाला २ आत्मानुसंधान व ३ आधिभौतिक सुधारणा आणि आध्यात्मिक धारणा हे मराठी गद्यांतील अव्वल दर्ज्याचे ग्रंथ पुढें मागें आदरिले जातील अशी मला उमेद आहे. त्यांच्या ग्रंथांची बूज करणारा प्रस्तुतचा काळ नाहीं. नाटकें, कादंबऱ्या, लघुकथा, भाषांतरें, अर्वाचीन काव्यें इत्यादिकांच्या वावटळींत अध्यात्माच्या गंभीर वाङ्मयाचा योग्य तो परामर्ष घेतला जात नाहीं. कोल्हटकरांचा 'भागवतादर्श,' फडक्यांचे 'नवयुगधर्म-माला' व इतर ग्रंथ, गो. म. जोशी यांचें 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' ह्या ग्रंथांसारखेच गोविंदसुतांचे ग्रंथ महाराष्ट्र वाचकांत सर्वमान्य झाले पाहिजेत. यांचाही काळ येईल. माझेही ३० ग्रंथ याच वर्गांत मोडतात, तथापि त्यांतले कांहीं ग्रंथ युनिव्हर्सिटीनें मान्य केल्यामुळें तरुणपिढीच्या परिचयाचे झाले आहेत. ह्या सर्व ग्रंथांचें मुख्य धोरण आपल्या आर्यसंस्कृतीचें व संस्कारांचें संरक्षण करणें हें आहे. सांप्रतचा काळ पाश्चात्यांच्या आचारविचारांच्या अंधानुकरणाचा व आर्यसंस्कृतीच्या विनाशाचा आहे. गोपाळराव देशमुख व गोपाळराव आगरकर यांच्या वेळेपासून हा काळ सुरू झाला असून आतां त्याचा कळस झाला आहे. वरेरकर, ठाकरे, ना. सी. फडके, अत्रे, किर्लोस्कर, कर्वे इ. नवयुगाचे अभिमानी लोक आपल्या नाटकांनीं, लेखांनीं व भाषणांनीं तरुणांचीं मनें वहकवीत आहेत व त्यांना भलतीच दिशा दाखवीत आहेत! असो. हाही काळ जाईल. नव्यांतील जें कांहीं चांगलें असेल तेवढेंच घेऊन आपल्या शुद्ध संस्कृतीचें जतन करणें व ती जोरदार करणें हें अत्यवश्य आहे. अशी तरुणपिढी लौकरच उदयास येईल. नवयुगमतापासून समाज परतवला पाहिजे असें कित्येकांच्या मनांत येत आहे हें सुचिन्ह आहे. धर्म, राजकारण व समाजसंस्था यांचा सांप्रत संपूर्ण ऱ्हास झाला आहे तथापि हा लौकरच थांबेल. काळोखी रात्र उलटूं पहात आहे, प्रभात काळ सुरू होण्याच्या समयीं गोविंदसुतांसारखे 'कोकिळ' सुस्वर गायन करूं लागले आहेत. दिवस उगवेल, नाथ समर्थ तुकोबांसारखे राष्ट्राचे खरे पुढारी संत पुन्हा अवतरतील, ते राष्ट्राचे डोळे उघडतील व धर्ममूर्ति शिवरायासारखे हिंदु क्षत्रिय राजे जन्माला येऊन महाराष्ट्रमहोदयाचा सूर्य माध्यान्हीं येईल. शुभं भवतु!

नाशीक, १०।१२।३४ ]

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर

# * अनुक्रमणिका *



# कै० परशुराम गोविंद चिंचाळकर
## ऊर्फ
# गोविंदसुत यांचें चरित्र

क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें। न लिंपे कदा दंभ वादें विवादें ॥
करी सूखसंवाद जो ऊगमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥५२॥

श्रीसमर्थ रामदास स्वामी-मनाचे श्लोक



## सदरहू पुस्तकाचा उपक्रम कसा झाला ?

माझे परमपूज्य वडील ती. **परशुराम गोविंद चिंचाळकर ( ऊर्फ गोविंदसुत )** यांस अमळनेर येथें त्यांच्या वयाच्या ७२ व्या वर्षी शके १८५५ पौष व॥ ७ सोमवार ता ८।१।३४ रोजीं सायंकाळीं ७ वाजतां देवाज्ञा झाली. त्यांच्या मृत्यूची दुःखद बातमी आप्त व सुहृज्जनांत ताबडतोब पसरली व गोविंदसुत हे आतां सगुणमूर्तिरूपानें यापुढें आपणांस दिसणार नाहींत याबद्दल सर्वांस फार हळहळ वाटली. नव्या काळांतील दे. भ. कृष्णाजीपंत खाडिलकर व श्री. नरहरपंत फाटक यांचा व वडिलांचा विशेष परिचय असल्यामुळें त्यांस मुंबईच्या मित्रांकडून ही शोचनीय वार्ता समजतांच ता. १२।१।३४ च्या नव्याकाळांत संपादकांनीं २।३ स्तंभांचा मृत्युलेख लिहून अग्रभागीं प्रसिद्ध केला व त्याबरोबरच गोविंदसुतांचीं दोन छायाचित्रेंही प्रसिद्ध केलीं. ता. १२।१।३४ च्याच केसरींत " दोन शोचनीय मृत्यु " या शीर्षकाखालीं प्रो० पानसे व गोविंदसुत यांचे मृत्युलेख संपादकांनीं प्रमुख भागीं प्रसिद्ध केले व पुढील अंकांत गोविंदसुतांचें छायाचित्रही दिलें. गोविंदसुत निजानंदीं निमग्न झाल्याची वार्ता महाराष्ट्रांतील त्यांच्या असंख्य परिचित व प्रेमी सज्जनांस विदित व्हावी म्हणून " गृह्यसंस्कार " या सदराखालीं प्रसिद्ध करण्यासाठीं केसरीकडे मीं चार ओळी पाठविल्या होत्या. परंतु या वार्तेला संपादकीय स्फुट लेखांतच स्थान देणें केसरीस उचित वाटून गृह्यसंस्कार या मामुली सदरांत केसरीनें ही बातमी घेतली नाहीं. प्रो० पानसे व गोविंदसुत यांचा एकमेकांशीं ३०।३२ वर्षांचा परिचय होता व एकमेकांस एकमेकांबद्दल

चांगला आदर असे. या दोन स्नेही व विनोदी वाङ्मयभक्तांचें एकाच दिवशीं व एकाच पूर्वखानदेश जिल्ह्यांत निधन व्हावें व महाराष्ट्राच्या मुखपत्रांत एकसमयावच्छेदेंकरून त्यांचे मृत्युलेख यावे हाही एक अकल्पित योगच म्हणावयाचा ! केसरी व नवाकाळ यांतील मृत्युलेख वाचून ८।१५ दिवसांत मजकडे शेंदोनशें सहानुभूतीपर पत्रें आलीं. मराठींतील बहुतेक वृत्तपत्रांत व कित्येक मासिक पुस्तकांत गुणगौरवपर लेख आले. गोविंदसुतांशीं सतत ४० वर्षें दृढस्नेह असलेले व त्यांच्याशीं संवादसुखांत हजारों प्रसंग घालविलेले महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विठ्ठलभक्त लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं केवळ स्वयंप्रेरणेनें चित्रमयजगत्‌च्या फेब्रुवारी १९३४ च्या अंकांत कै. गोविंदसुतांचें त्रोटक चरित्र दिलें. तसेंच प्रो. पोतदार यांनींही जानेवारी १९३४ च्या महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेंत गोविंदसुतांच्या गुणांचा गौरव करणारा मृत्युलेख लिहिला आहे. या सर्व लेखांमुळें गोविंदसुतांबद्दल आणखी जास्त माहितीनें भरलेलें असें समग्र चरित्राचें पुस्तक प्रसिद्ध व्हावें अशी उत्सुकता बऱ्याच लोकांस वाटूं लागली. ह. भ. प. पांगारकर यांच्या लेखांत शेवटचें वाक्य असें आहे कीं "गोविंदसुतांच्या अंतरंगाचें, वर्तनाचें व ग्रंथकर्तृत्वाचें समग्र चित्रण करण्यास स्वतंत्र ग्रंथच लिहिला पाहिजे, तितकी मला सवड नाहीं म्हणून त्यांच्या पवित्र आत्म्यास वंदन करून हा धांवता लेख येथेंच संपवितों." या वाक्यांत सूचित केलेल्या स्वतंत्र ग्रंथाची मागणी प्रेमी जनतेकडून मजकडे विशेष आग्रहानें होऊं लागली. सासवनें जि. कुलाबा येथील वयोवृद्ध देशभक्त व पुढारी श्री. रा. ल. घरत यांनीं ४।३।३४ च्या आपल्या पत्रांत "आपल्या वडिलांचें समग्र चरित्र प्रसिद्ध झाल्यास त्याचा मुमुक्षूंस फार उपयोग होईल म्हणून आपण तें अवश्य प्रसिद्ध करावें" अशी प्रेमळपणानें सूचना केली व वडिलांच्या वर्षश्राद्धास त्यांचें स्मरण म्हणून कांहीं तरी प्रसिद्ध करीन असें मी त्यांस तावडतोब आश्वासन देऊन चुकलों ! श्री. घरत यांच्या सूचनेला वडिलांचे जिव्हाळ्याचे स्नेही व आमच्या घराण्याशीं सुमारें ४० वर्षांवर अत्यंत घरोब्याचा व विश्वासाचा संबंध असलेले आवास येथील गुरुवर्य श्री. दत्तात्रेय यशवंत बापट पेन्शनर हेडमास्तर यांनीं विशेष जोराचा दुजोरा दिला व दररोज थोडथोडें लेखन सुरू ठेवा म्हणजे वर्षश्राद्धापर्यंत काम पुरें होईल, अशी आज्ञा केली. किंबहुना १९३२ च्या जुलैमध्यें माझे कनिष्ठ बंधु कै. श्रीरामपंत निवर्तल्या वेळीं बापट मास्तर आमच्या भेटीस आले त्याच वेळीं वडिलांची क्षीण प्रकृति पाहून दररोज त्यांच्या सन्निध बसून त्यांच्या तोंडून थोडथोडी माहिती घेऊन ती टिपून ठेऊन चरित्रलेखनाची

सामग्री तयार करून ठेवा असा इषारा गुरुवर्य बापट यांनीं मला दिला होता. तथापि नित्याच्या परिपाठास अनुसरून यानंतरही वडिलांनीं बराच प्रवास केला व पुनः अमळनेरास शेवटच्या दुखण्यांत अंथरुणासच खिळून असतांही त्यांचे सर्व बौद्धिक उद्योग नेहमींप्रमाणेंच चालू असत. त्या मुदतींत त्यांच्या तोंडून माहिती घेऊन टांचणें करण्यास २।३ वेळांच काय तो अवसर मिळाला. आतां असा पश्चात्ताप वाटतो कीं बापट यांचा उपदेश जर तंतोतंत पाळला असता तर हें चरित्रलेखनाचें काम फारच सोपें झालें असतें. परंतु आतां त्याचा उपयोग काय ? गोविंदसुतांच्या चरित्रलेखनाची अवश्यकता खरोखरच उत्पन्न होईल व ती उणीव पूर्ण करावी लागेल अशी त्या वेळीं तादृश कल्पना नव्हती.

गोविंदसुत हे "मरावें परी कीर्तिरूपें उरावें" या कोटींतील पुरुष होऊन गेले यांत शंकाच नाहीं. एखादा सामान्य मनुष्य मयत झाला तर त्याच्या पश्चात् त्याचे सुतकी भाऊबंद व जवळचे नातेवाईक यांच्याशिवाय दुसरे कोणीही त्याच्याबद्दल पूसतपास करीत नाहींत व त्याची आठवण त्याचीं मुलेंबाळें अगर गांवांतील कांहीं लोक यांच्या पलीकडे कोणी काढीत नाहींत. त्यानें सावकारांचें कर्ज करून ठेवलें असेल तर मात्र ते सावकार लोक तें कर्ज फिटेपर्यंत अगर फिटण्याची आशा नष्ट होईपर्यंत त्याच्या दाराशीं खेपा घालीत राहतील इतकेंच. परंतु एखादी अलौकिक व्यक्ति दिवंगत झाली तर तिच्याशीं परिचय असलेले लोकच तिच्याबद्दल पूसतपास करतात व आठवण ठेवतात असें नसून अनेक अपरिचित लोकांसही त्या व्यक्तीचें चारित्र्य समजून घेण्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न होते. सामान्य लोक हे जगांत जिवंत असतांनाही मेल्याप्रमाणें असतात व असामान्य लोक हे मेल्यानंतरही लोकांच्या अंतःकरणांत स्मृतिरूपानें जिवंत राहातात हा दोघांमध्यें महत्त्वाचा फरक आहे. गोविंदसुत हे अगदीं अलौकिक अगर असामान्य कोटींतील पुरुष होते असें जरी म्हणतां येणार नाहीं तथापि त्यांच्या अंगीं कांहीं तरी वैशिष्ट्य होतें व त्यामुळें आपल्या हयातींतच नव्हे तर आपल्या पश्चात्‌ही शेंकडो परिचित व अपरिचित लोकांचें प्रेम व जिज्ञासा त्यांनीं आपल्या भोंवतीं आकर्षित केल्या आहेत याचा अनुभव आम्हांस पदोपदीं आलेला आहे व येत आहे. त्यांच्या निधनानंतर अखिल महाराष्ट्रांतून असंख्य लोकांकडून आम्हांस दुखवट्याचीं पत्रें आलीं याचा उल्लेख वर केलाच आहे. यांपैकीं कांहीं लोक त्यांच्याशीं प्रत्यक्ष परिचित होते, परंतु कित्येक लोक फक्त त्यांच्या ग्रंथांचे वाचक होते व प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ आतां अशक्य म्हणून त्या सर्वांनीं फार हळहळ व्यक्त

केली आहे. दुःखाचा आवेग ओसरल्यानंतरही अनेक सुहृदांकडून अनेक प्रकारच्या सूचना व जिज्ञासापूर्वक पृच्छा होत आहेत. कित्येक फलज्योतिषज्ञांनीं त्यांच्या जन्मवेळेची व कुंडलीची आमचेकडे मागणी केली तर कांहीं फलज्योतिषाचे अभ्यासी लोक त्यांच्या आयुष्यांतील ठळक गोष्टींची आमच्याकडे समक्ष येऊन चौकशी करून त्यांची कुंडली घेऊन गेले. कित्येक सन्मित्रांनीं सूचना केल्या कीं गोविंदसुतांचे कांहीं अप्रसिद्ध लेख असल्यास ते सर्व प्रसिद्ध करावे म्हणजे मराठी भाषेंत एका चांगल्या पुस्तकाची भर पडेल तर कित्येकांनीं गोविंदसुतांचा नित्यवाचनाचा ग्रंथसंग्रह काय आहे व श्री. विश्वनाथदादा पाटणकर यांच्या अप्रसिद्ध ग्रंथांपैकीं कांहीं पुस्तकांचीं हस्तलिखितें त्यांत आहेत काय वगैरे पृच्छा केली आहे. जमखंडीकडील एक प्रेमळ भक्त लिहितात कीं गोविंदसुतांच्या प्रत्यक्ष भेटीचें भाग्य आपणांस लाभलें नाहीं तरी ग्रंथद्वारा आपण त्यांस आद्य गुरूचा मान देत असल्यामुळें व या ग्रंथांनींच आपणांस प्रथम मुमुक्षुत्व प्राप्त होऊन नंतर एका सद्गुरूंचा अनुग्रह प्राप्त झाला असल्यामुळें आपली सांपत्तिक स्थिति बरी नसली तरी गोविंदसुतांची समाधि, मंदिर अगर अन्य कांहीं स्मारक होत असेल तर फुलाची पाकळी म्हणून रु. ५० आपण पाठविण्यास तयार आहों. अर्थात् गोविंदसुतांस यांपैकीं कोणतीच गोष्ट प्रिय नसल्यामुळें स्मारकासाठीं रक्कम पाठविण्याची जरूरी नाहीं असें आम्ही त्यांस कळविलें. गोविंदसुतांच्याच विचारांचे व बैठकीचे दुसरे कोणी पुरुष त्यांचे शिष्य अगर त्यांच्या गुरुपरंपरेंतील कुणी विद्यमान आहेत काय व गोविंद-सुतांप्रमाणेंच प्रेमळपणें परमार्थमार्गांतील शंकांचें ते निरसन करतील काय अशी चौकशी कित्येकांनीं केली तर कित्येकांनीं गोविंदसुतांच्या पश्चात् आम्हांलाच त्यांच्या ठिकाणीं कल्पून आमच्या ठिकाणीं नसलेली पात्रता व थोरवी आम्हांस आणून दिली आहे. परंतु वाचकांस प्रथमतःच आम्ही प्रांजळपणें निवेदन करतों कीं जनतेच्या अपेक्षेप्रमाणें "गोविंदसुतांच्या अंतरंगाचें, वर्तनाचें व ग्रंथकर्तृत्वाचें समग्र विवरण" करतां येईल अशी यत्किंचितही लायकी आमच्यापाशीं नाहीं, तथापि गोविंदसुतांसंबंधानें ज्या ज्या गोष्टी आम्हांस आठवत गेल्या व जी जी माहिती मिळत गेली ती ती क्रमशः लिहून काढून जिज्ञासू जनतेपुढें सादर केली असतां आपण आपल्या कर्तव्याच्या ऋणांतून अंशतः तरी मोकळे होऊं व दुधाची तहान ताकावर तरी भागविण्याचें साधन करून ठेऊं या नम्र भावनेनें प्रस्तुत चरित्रलेखनाचा उपक्रम झाला आहे.

## चरित्राचें वैशिष्ट्य

हल्लींच्या काळांत ज्या प्रकारचीं चरित्रें बहुजन समाजास विशेष वाचनीय व संग्राह्य वाटतात त्या प्रकारचें गोविंदसुतांचें चरित्र नाहीं हें प्रथमतःच सांगितलें पाहिजे. गोविंदसुतांच्या नांवापुढें अगर नांवापाठीमागें कोणत्याही प्रकारच्या विद्वत्ताप्रदर्शक पदव्या अगर सरकारनें किंवा जनतेनें दिलेलीं उपपदें नाहींत. यामुळें आधुनिकांच्या कसोटीनें पाहतां त्यांच्या चरित्राला शंभरापैकीं पन्नास टक्के मार्क कमी पडतात. त्यांनीं जे लेख लिहिले आहेत तेच एखाद्या आधुनिक पदवीधरानें लिहिले असते तर कदाचित् जनतेचें तिकडे जास्त सहानुभूतीनें लक्ष गेलें असतें व ते जास्त लोकादराला पात्र झाले असते असें एखाद्या वेळीं वाटतें. परंतु त्याबरोबरच आम्ही असेंही निश्चयात्मक सांगूं शकतों कीं गोविंदसुतांच्या विशिष्ट विचारपद्धतीशीं सहानुभूति असल्यामुळें अथवा त्यांच्या विविधप्रकारच्या कार्यव्यापामुळें शेंकडों आधुनिक विद्वानांचें त्यांस साहचर्य लाभत असे, परंतु गोविंदसुत हे बिनपदवीवाले म्हणून त्यांची कोणीही कधींही अवहेलना केलेली नाहीं. उलट आपल्याबरोबर विचारविनिमय करण्याची बौद्धिक पात्रता त्यांच्यांत आहे व चार अनुभवाच्या गोष्टी आपणांस सांगण्याचा त्यांस अधिकार आहे हें पाहून त्यांच्याबद्दल त्यांस कौतुक व आदर वाटत असे. सरकारी नोकरींत असतांना त्यांच्यापेक्षां जास्त शिकलेले व पदवीधर लोक त्यांच्या अनुभविक कामकाजपद्धतीचे त्यांच्यापासून धडे घेण्याचे दृष्टीनें त्यांचेकडे पाहात असत. मराठी भाषेवरील प्रभुत्वाच्या बाबतींत तर अनेक पदवीधरांस त्यांचा हेवा वाटत असे. रहस्यनिरीक्षणाचें परीक्षण करतांना साहित्यसम्राट् श्री. न. चिं. केळकर जून १९१८ च्या लोकशिक्षणांत लिहितात "गोविंदसुत हे एखादे उपपदधारी ग्रॅजुएट नाहींत; तरी पण त्यांचें भाषाप्रभुत्व, टीकाचातुर्य, विनोद व कुशाग्र बुद्धि हीं अनेक ग्रॅजुएट म्हणविणारांनाही दुर्लभ आहेत असें आम्हांस वाटतें." अलीकडे किर्लोस्कर वगैरे मासिकांतून "भिक्षाधीशाचा लक्षाधीश कसा झाला?" वगैरे स्वरूपाचीं बरींच चरित्रें येतात व व्यावहारिक दृष्ट्या उत्कर्षेच्छु लोकांस तीं बोधप्रदहि असतात. परंतु त्या दृष्टीनेंहि गोविंदसुतांच्या चरित्रावर लुब्ध होण्यासारखें आधुनिकांस कांहींच आढळणार नाहीं, यामुळें आणखी २५ मार्क कमी पडतील. द्रव्यप्राप्ति व द्रव्यसंग्रह हें गोविंदसुतांनीं आपल्या आयुष्याचें ध्येय कधींच ठेवलें नाहीं. निर्वाहापुरतें अन्न व आच्छादन स्वतःच्या प्रयत्नानें मिळविलें म्हणजे त्यांत ते पूर्ण संतुष्ट असत व त्यांतूनही शिल्लक राहिल्यास तें दुसऱ्यांस देण्यांत ते धन्यता मानीत व यामुळें कित्येक व्यावहारिक लोक त्यांस अव्यावहारिकही म्हणतील. त्यांनीं कधीं आपली

शिष्यशाखा म्हणून वाढविली नाहीं किंवा कोणावर अनुग्रह करण्याचा आव आणून गुरुदक्षिणाही कधीं घेतली नाहीं. बुवाबाजीच्या मार्गांत गोविंदसुत शिरले असते तर शेंकडों पृष्ठांची त्यांचीं चरित्रें त्यांच्या हयातींतच लिहिलीं जाणें अशक्य नव्हतें. हल्लींच्या व्यावहारिक म्हणविणाऱ्या जगाला अवश्य वाटणाऱ्या असंख्य गोष्टींचा गोविंदसुतांच्या ठिकाणीं अभाव असूनही त्यांची 'साधी राहाणी व उच्च विचारसरणी' असंख्य विद्वान् व सामान्य लोकांना आपल्याकडे आकर्षण करूं शकली. आपण प्रसिद्धीला यावें अशी त्यांची मुळींच इच्छा नसे व एवढे हजारों पानांचे ग्रंथ त्यांच्याकडून लिहिले गेले हें कार्य केवळ यदृच्छेनेंच झालें असें म्हणावें लागतें. गोविंदसुतांना लहानपणापासून विचार करण्याचा नाद असे व दासबोध, ज्ञानेश्वरी व इतर संतवाङ्मय वाचण्याची फार आवड असे. प्रचलित विषयांवरील वर्तमानपत्रें व मासिकें वाचल्याशिवाय ते राहात नसत हें खरें, परंतु त्यांत त्यांचें अंतरंग रंगत नसे. स्वदेशांतील व परदेशांतील सर्व चळवळी व उलाढाली समजून घेण्याचा त्यांस जबर हव्यास असे, परंतु त्यांतून मानवी स्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण करून संतवचनांच्या आधारें तत्त्वशोधन करून आत्मोन्नति करून घेणें हें त्यांच्या आयुष्याचें खरें ध्येय होतें. हें ध्येय गांठीत असतां प्रापंचिक कर्तव्यांत त्यांनीं कधींही हेळसांड केली नाहीं व वाटेंतील मुक्कामांत सहज लीलेनें कांहीं पारमार्थिक ग्रंथ त्यांच्या हातून लिहिले गेले तरी तें कार्य त्यांचें ध्येयसर्वस्व होतें असें म्हणतां येत नाहीं. गोविंदसुत हे एक तत्त्वज्ञानी, स्थितप्रज्ञ व आत्मवेत्ते पुरुष होऊन गेले. त्यांचे ग्रंथ वाचण्यापेक्षां ज्यांना त्यांच्या सहवासाचा व त्यांच्याशीं सुखसंवाद करण्याचा चिरकाल लाभ घडला त्यांनाच त्यांच्या विचारांच्या उच्चभूमिकेची साक्ष पटण्याजोगी आहे. गोविंदसुतांचें व्यावहारिक अगर पारमार्थिक चरित्र यथार्थपणें लिहितां येणें किती अवघड, दुरापास्त किंबहुना अशक्य कार्य आहे हें श्री. के. भि. बापट यांच्या आम्हांस आलेल्या एका पत्रावरून दिसून येईल सबब त्यांच्याच शब्दांत निवेदन करतों. रा. बापट लिहितात "व्यवहारदृष्टीनें दादांकडे पाहिलें तर ते व्यवहारापलीकडे केव्हांच गेलेले होते. केवळ व्यावहारिक लोकांस वाचण्यासारखीं दुसरीं चरित्रें हवीं तितकीं आहेत. पारमार्थिक पदाकरतां ज्यांना भूक लागली असेल त्यांचा खरा मार्ग पुस्तकांकडे नसून 'तद्विज्ञानार्थं सद्गुरुमेवाभिगच्छेत्' असाच असतो. दादांनीं पुस्तकांतून काय थोडें रहस्य सांगितलें आहे? परंतु रहस्य तें रहस्यच. तें पुस्तकांत कितीसें येणार? दादांची भूमिका इतकी उच्च होती कीं साधकांना व

मुमुक्षूंना प्रथमतः त्यांचें बोलणें आकलन करण्यासही कठीण वाटून चमत्कारिकपणा उत्पन्न होई. दादांचें पारमार्थिक स्वरूप सांगावयाचें म्हणजे ' गगनं गगनाकारं सागरः सागरोपमः ' अशी स्थिति. यामुळें त्यांचें यथार्थ चरित्र कोण व कसें लिहिणार व त्यापासून कोणास लाभ घेतां येईल ? तथापि एखादी अलौकिक व्यक्ति दिवंगत झाली म्हणजे निधनोत्तर त्या व्यक्तीबद्दल शक्य तितकें ज्ञान करून घ्यावें असें जनतेस वाटणें स्वाभाविक आहे. या बाजूनें विचार करतां बहिरंग दृष्टीनें त्यांच्याबद्दल चरित्रकारास माहिती लिहितां येईल व जगाची जिज्ञासा अंशतः तृप्त करतां येईल. दादांच्या अंतरंगाचें चित्र व चरित्र त्यांच्या ग्रंथांत जितकें व जसें सांपडतें तितकें दुसरा कोणीही लिहिण्यास समर्थ नाहीं. त्या ग्रंथांतून " सद्बोधसूक्ति " निवडून काढल्यास त्या अभ्यासकांस उपयोगी पडण्याचा संभव आहे. " या पत्रानंतर गोविंदसुतांच्या बाह्य व व्यावहारिक चरित्राची रूपरेषा वाचकांस दाखवून देण्याचें काम आम्ही आमच्या शिरावर घेतलें व ग्रंथांतील सद्बोधसूक्ति निवडून काढून पारमार्थिक अगर अंतरंगाचें चरित्र दिग्दर्शित करण्याबद्दल आम्ही श्री. के. भि. बापट यांसच विनंति केली व मोठ्या तत्परतेनें ८।१० दिवसांतच त्यांनीं ३६५ सूक्ति निवडून व लिहून आमचेकडे पाठविल्या व या पुस्तकाचा दुसरा भाग म्हणून त्या पुढें प्रसिद्ध केल्याच आहेत. तिसऱ्या भागांत निरनिराळ्या लोकांनीं गोविंदसुतांबद्दल आठवणीदाखल लिहिलेला मजकूर प्रसिद्ध केलेला आहे. या तिन्ही भागांचा मिळून विचार करतां हें पुस्तक गोविंदसुतांचें यथार्थ चरित्र अशा स्वरूपाचें नसून त्यांच्या आप्तेष्टांनीं व सुहृज्जनांनीं त्यांच्या वर्षश्राद्धानिमित्त त्यांचें केलेलें पुण्यस्मरणच आहे असें म्हटलें तरी चालेल. ज्याला त्याला आपआपल्या भूमिकेपासून गोविंदसुतांचें जशा प्रकारचें दर्शन घडलें तशाच प्रकारचें यथामतिवर्णन ज्यानें त्यानें केलें आहे. यामुळें या पुस्तकांत कांहीं दोष अगर चुका आढळल्यास अथवा उणीवा राहिल्यास त्याबद्दलची जबाबदारी सर्वस्वीं आमच्या आकुंचित दृष्टीवर व दुर्बलतेवर आहे, गोविंदसुतांच्या चारित्र्याला त्यामुळें वैगुण्य येण्याचा मुळींच संभव नाहीं. एखाद्या वस्तूचें स्मरण करणाऱ्याच्या अंतःकरणांतील अनेकविध दोषांमुळें त्या वस्तूच्या यथार्थ स्वरूपांत ज्याप्रमाणें कधींच बदल होत नाहीं त्याप्रमाणेंच या पुस्तकांत आमचेकडून कांहीं प्रमाद घडल्यास त्याचा दोष सर्वस्वीं आमचेवरच राहील इतका इषारा देऊन मुख्य विषयाकडे वळतों.



## जन्म व घराण्याचें मूळ गांव

गोविंदसुत हे वासिष्ठ गोत्री कऱ्हाडे ब्राम्हण. त्यांचा जन्म मुक्काम सांवर्डें तालुके चिपळूण जिल्हा रत्नागिरी येथें चिंचाळकर घराण्यांत शके १७८४ मार्गशीर्ष शुद्ध ११ ( गीताजयंति ) ता. १।१२।१८६२ सोमवार या दिवशीं रात्रीं ४ घटकेच्या सुमारास झाला.

सांवर्डें येथील चिंचाळकर घराण्याचा मूळ गांव कशेळी तालुके राजापूर हा आहे. तेथून हें घराणें करंबेळ तालुके संगमेश्वर येथें आलें. तेथून आगवें तालुके चिपळूण येथें स्थलांतर झालें. आगवें येथें आगवेकर आडनांवाचें देशस्थ घराणें आहे त्यांच्याकडे गोविंदसुतांचे आजोबा गणेशपंत हे अगदीं गरीब स्थितींत नोकरी करीत होते. आगवें हा गांव सांवर्ड्यांपासून २।३ मैलांवर आहे. पुढें गणेशपंतांनीं सांवर्डें येथें येऊन लहानसें घर बांधलें व नजीकच्या डेरवण गांवीं थोडीशी शेतीही घेतली. या शेतीच्या ठिकाणाला ' मडग ' असें नांव आहे व हें ठिकाण आमचें प्राचीन वडिलार्जित ठिकाण म्हणून सर्व वंशज विशिष्ट अभिमानानें सांगतात. गणेशपंत सांवर्ड्यांस रहावयास आले तरी तेथून आगव्यास जाऊन नोकरी करीतच असत. गोपाळ गणेश व इतर वंशज यांनीं पुढें कुडप, डेरवण, मांडकी वगैरे नजीकच्या गांवीं मिळकत संपादन केली. खुद्द सांवर्डें येथें राहातें घर व त्या भोंवतींचें परसूं याखेरीज या घराण्याची दुसरी मिळकत नाहीं. मांडकी गांवांत नानल व चिंचाळकर यांनीं मिळून समाइकींत संपादन केलेली खोती तक्षीम आहे.



## जन्मकुंडलीचें त्रोटक निरीक्षण




आम्हांला स्वतःला फलज्योतिषाचें मुळींच ज्ञान नाहीं. परंतु या शास्त्रावर आमचा विश्वास आहे. ग्रहांचे मनुष्यांवर सुखकारक अथवा दुःखकारक परिणाम होत असतात ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. गोविंदसुत स्वतः

फलज्योतिषज्ञ होते. फलज्योतिषावर विश्वास ठेवणारे व त्याचा अभ्यास करणारे जे वाचक असतील त्यांची जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं गोविंदसुतांची जन्मकुंडली त्यांना स्वतःला मान्य असलेली आम्हीं वर दिली आहे व आमच्या विनंतीवरून श्री. केशव भिकाजी बापट मास्तर यांनीं या कुंडलीचें त्रोटक निरीक्षण केलें आहे तें त्यांच्याच शब्दांत खालीं दिलें आहे.

( १ ) या कुंडलींत लग्नस्थानीं मिथुन ही बौद्धिक व शास्त्रीय राशी असून त्या ठिकाणीं हर्शल हा गूढ व अद्भुत ग्रह आहे म्हणून गोविंदसुतांची विचारशक्ति व संशोधनशक्ति फार सूक्ष्म व गहनांतील गहन अशा अध्यात्म शास्त्राकडे वळली.

( २ ) द्विस्वभावराशि केंद्रांत असून त्यांत हर्शल, शनि, चंद्र, नेपच्यून, मंगळ इतके एकंदर ग्रह आहेत म्हणून गोविंदसुत हे हुषार, चलाख, कर्तृत्ववान् व बहुप्रिय असे होऊन प्रसिद्धीस आले.

( ३ ) तृतीयेश रवि हा लग्नेश बुध व पंचमेश शुक्र यांसह षष्ठस्थानांत म्हणजे उपचयस्थानांत असल्यामुळें व हे तीनही ग्रह राशीवरून नवमस्थानीं येत असल्यामुळें व पंचमांत गुरूही असल्यामुळें पूर्वीं कारकुनीच्या रूपानें व नंतर ग्रंथकर्तृत्वरूपानें लेखनकर्माचाच व्यवसाय झाला. यांचें लिहिणेंही कोटिबाज, विनोदी, सुबोध पण मार्मिक असें होतें. पत्रव्यवहारही तसाच जबर होता.

( ४ ) लग्नीं हर्शल असल्यामुळें कित्येकांस गोविंदसुतांचे विचार, मतें किंवा वर्तन हें चमत्कारिक वाटे.

( ५ ) पुणें शहराची राशी कन्या असून त्याच राशींत या कुंडलीच्या भाग्यस्थानाचा अधिपति शनि हा चतुर्थांत असल्यामुळें मुख्य प्रसिद्धीचें व भाग्योदयाचें स्थान पुणेंच झालें.

( ६ ) पितृकारक रवि षष्ठांत, पितृस्थानाचा अधिपति गुरु हा शत्रुराशींत नुकताच आलेला व पितृस्थानीं षष्ठाधिपति मंगळ व नेपच्यून हे पापग्रह शिवाय दशम स्थान शनीच्या पूर्ण दृष्टींत या सर्व योगांमुळें पितृसुख फारच थोडें मिळालें. यांच्या नवव्या वर्षीं वडील वारले.

( ७ ) मातृकारकग्रह चंद्र गुरूच्या राशींत असून त्याची चतुर्थ स्थानावर पूर्ण दृष्टि आहे म्हणून पितृसुखापेक्षां मातृसुख अधिक पण चंद्राजवळ मंगळ, चंद्रासमोर शनि, चतुर्थेश षष्ठांत, चंद्राच्या चतुर्थांत हर्शल यामुळें यांच्या २७ व्या वर्षीं मातेचाही मृत्यु झाला.

( ८ ) चतुर्थ स्थानांत शनि व दशमांत मंगळ यामुळें एकंदर शरीरकष्ट फार व एकदां वाहनांतून पडून अपघातही झाला होता. ( अष्टमेश शनि चतुर्थांत आहे. )

( ९ ) पंचमेश शुक्र असून पंचमांत गुरु आहे म्हणून बुद्धिमान् व हुषार पण गुरु हा शत्रुराशींत अल्पबली असून शुक्रही षष्ठांत अस्तंगत म्हणून विद्वान् म्हणण्याइतका अभ्यासाचा योग आला नाहीं.

( १० ) पंचमांत गुरु व पंचमेश शुक्र रवियुक्त यामुळें मुलगे हुषार, पण अल्पबलीगुरु व पंचमेश षष्ठांत अस्तंगत व मंगळाची पंचमावर दृष्टी यामुळें सुतशोकाचाही प्रसंग आला. आणखीही कांहीं मुलें अल्पवयी असतांच गेलीं.

( ११ ) लग्नांतील हर्शेल, पंचमांतील गुरु व चंद्राच्या नवमांतील रवि, शुक्र, बुध यामुळें वेदांत व तत्त्वज्ञान या विषयांकडे प्रवृत्ति झाली. स्वभाव परोपकारी झाला.

( १२ ) नवमावर गुरूची दृष्टी, दशमांत जलराशींत चंद्र, तृतीयेश शुक्रयुक्त ( चंद्राच्या नवमांत ) व्ययस्थानावर रवि, शुक्र, बुध, राहू यांची दृष्टी व व्ययस्थानांत केतु यामुळें एकंदरींत यांना हिंडण्याफिरण्याचा नाद फार होता. तीर्थयात्रेचेही योग आले. गंगास्नान झालें.

( १३ ) लाभेश मंगळ व धनेश चंद्र दोघेही दशमांत यामुळें मोठमोठ्या अधिकाऱ्यांशीं व पुढाऱ्यांशीं यांच्या ओळखी होत्या व त्यांचा उपयोगही होत असे. त्याचप्रमाणें मंगळ हा षष्ठेश असून दशमस्थानावर शनिदृष्टीही आहे म्हणून कधीं अधिकाऱ्यांकडून थोडासा त्रासही झाला.

( १४ ) सप्तमेश गुरु शत्रुगृहीं व त्याच्या पाठीशीं अष्टमेश शनि, तसेंच शुक्र रवीचा षष्ठांत योग व तोही शनीच्या दृष्टींत यामुळें यांना क्वचित् वातपीडा होती व मूत्रपिंडाचीही विकृति होती.

( १५ ) १९०८ सालीं दसऱ्याचे दिवशीं यांची पत्नी वारली. त्या वेळीं सप्तमेश गुरूच्या द्वादशांत रविमंगळ होते. अष्टमेश शनि नवमांत वक्र झाला होता व राहू लग्नांतून सप्तमावर पाहात होता. केतु तर अर्थात्च सप्तमांत होता. हे सर्व योग पत्नीच्या मृत्यूस कारण झाले. सहजाधिपति शनीच्या दृष्टींत, पण शुभग्रहयुक्त आहे यामुळें बंधु असूनही विशेष बंधुसौख्य नाहीं. शिवाय सहजाधिपतीस जागा मिळाली तीही षष्ठांत, त्यामुळेंही बंधुसौख्य मिळालें नाहीं.

( १६ ) चंद्राच्या अष्टमांत गुरु, अष्टमेश व नवमेश एकच शनि व त्याच्या नवमांत व्ययस्थानीं केतु, रवीच्या पंचमांत चंद्र यामुळें दीर्घायुष्य लाभून अंतकाळ शांतपणें हरिचिंतनांत स्वात्मबोधाच्या जागृतींत झाला.



## वंशवृक्ष

चिंचाळकर घराण्याचा वंशवृक्ष जरूरीपुरता खालीं दिलेला आहे. सदरहू वंशवृक्ष गोविंदसुतांनीं माहिती दिल्याप्रमाणें लिहून घेतला आहे, शिवाय नागपूर येथील चिंचाळकरांच्या माहितीशींही तो जुळत आहे.




## कुलवृत्तांत

या वंशवेलींतील मूळ पुरुष रघुनाथ. याचा वडील मुलगा महादेव. याच्या घराण्याचा ५।६ वर्षांपूर्वी निर्वंश झाला आहे. शिवराम हरी व त्याचे नंतरचे वंशज आम्ही स्वतः पाहिले आहेत. त्यांची स्थिति अत्यंत हलाखीची होती. महादेव शिवराम ऊर्फ माधवदादा मरणापूर्वी बरेच दिवस अंध झालेले होते. ते ८।१० वर्षांपूर्वी निवर्तले व त्यांचें कुटुंब १९२९ च्या मेमध्यें निवर्तलें व त्यांचे मुलगे त्यांच्या हयातींतच निवर्तले होते. ही वडील शाखा ७५

वर्षांपासून जरी आमच्यापासून विभक्त होती तरी ही आपल्या घराण्याची वडील शाखा म्हणून तिचा मान ठेवण्याच्या सद्‌बुद्धीनें व त्यांची हलाखीची स्थिति जाणून गोविंदसुत हे दरसाल १०।१२ रुपये १९२९ सालपावेतों त्यांस पाठवून मदत करीत असत. आमच्या मौंजीबंधनाचे कार्यांतच बाबू महादेव याची धर्मार्थ मुंज म्हणून गोविंदसुतांनीं लावली व गणेश महादेव हा मुलगा पुण्यास आला असतां आपल्या वशिल्यानें वासुकाकांच्या चित्रशाळेंत त्यास नोकरी लावून दिली व नेहमीं त्याचा परामर्ष घेत. या वडील शाखेविषयीं या ठिकाणीं अशा रीतीनें उल्लेख करण्याचें कारण इतकेंच कीं हल्लींच्या काळांत कायद्याप्रमाणें ज्या इसमांचें पालनपोषण करण्याची व परामर्ष घेण्याची जबाबदारी आपल्यावर आहे अशा इसमांकडे सुद्धां दुर्लक्ष करणारे पुष्कळ लोक आपण समाजांत पाहातों. आर्थिक दारिद्र्याबरोबर सद्भावनांचेंही दारिद्र्य झाल्यामुळें लांबच्या अगर जवळच्या नातेवाईकांचीही कोणी विचारपूस करीत नाहीं. पूर्वींच्या जुन्या पिढींत आपल्या घराण्याविषयीं अभिमान व आपल्या घराण्यांतील दुबळ्या लोकांस सहाय्य करण्याची बुद्धि अधिक प्रमाणांत जागृत असे. निदान गोविंदसुतांची तरी आपल्या सर्व आयुष्यांत अशा प्रकारची निरंतर प्रवृत्ति होती याबद्दल पुढेंही आणखी उदाहरणें दिसून येतील.

रघुनाथचा दुसरा मुलगा नारायण. यांचे चिरंजीव बाळाजी ऊर्फ बल्लाळ हे इ. स. १८३५ चे सुमारास नागपूरला गेले. सांवर्डें-डेरवण येथील राजे शिर्के यांची कन्या श्री. काशीबाईसाहेब यांचा विवाह त्या वेळचे नागपूरचे संस्थानिक राजे रघूजीराव ( तिसरे ) यांच्याशीं ठरल्यामुळें व बाळाजीपंत हे शिर्केराजे यांचे खास कारभारी असल्यामुळें त्यांच्याबरोबर तेही नागपूरला लग्नासाठीं गेले. श्री. काशीबाईसाहेबांचा व बाळाजीपंतांचे घराण्याचा फारच घरोब्याचा-संबंध. श्री. काशीबाईंनीं विशेष गळ घातल्यावरून राजे रघूजीराव यांचे खासगी कारभारी व निकट स्नेही रा. आत्मारामपंत ऊर्फ नरसोबा तात्या बखले यांस पुढें बाळाजीपंतांची मुलगी देण्यांत आली. राजेशाहींत बखले घराण्याकडे " जामदार " ची तैनात असे. हें जामदार घराणें नागपुरास प्रसिद्ध आहे. चिंचाळकर घराण्याची ही शाखा वरील निमित्तानें नागपुरास गेली ती तिकडेच वास्तव्य करून राहिली. सुमारें ८० वर्षे कोंकणप्रांतांत अगर पुण्याकडे या शाखेबद्दल आम्हांस विशेष माहिती मिळत नसे. परंतु १९१२ सालीं आम्ही खानदेशांत वकिलीसाठीं आल्यानंतर व आमचे बंधू कै. श्रीरामपंत वऱ्हाडांत हायस्कूल शिक्षक म्हणून गेल्यानंतर गोविंदसुतांचें वऱ्हाड व मध्यप्रांतांत नेहमीं जाणें येणें होऊं लागलें

व आपल्या चौकसबुद्धीमुळें वामन लक्ष्मण व रामचंद्र लक्ष्मण यांचा त्यांस नागपूर येथें सहजगत्या शोध काढतां आला व त्यांची भेट घेतां आली व उभयतांसही फार वर्षांनीं परस्परांची इत्थंभूत माहिती समजल्यामुळें विशेष आनंद झाला. रा. वामन लक्ष्मण यांचें बी. ए. पर्यंत शिक्षण झालें असून मुलकीखात्यांत अधिकारी, सहकारी बँकेचे मॅनेजर व कांहीं जमीनदारीचे मॅनेजर असे व्यवसाय करून हल्लीं नागपुरास सुखवस्तु आहेत. त्यांचे वडील चिरंजीव रा. श्रीपाद वामन यांनीं अनेक स्कॉलरशिपा व पदकें मिळविलीं असून ते नागपूर विश्वविद्यालयाचे M. Sc. आहेत व नागपूरच्या सायन्स कॉलेजमध्यें कांहीं वर्षें ते असिस्टंट प्रोफेसर होते. हल्लीं कलकत्ता येथें ते शास्त्रीय संशोधनाकरतां त्यांस स्कॉलर्शिप असलेमुळें तिकडे राहातात व नागपूर विश्वविद्यालयानें त्यांच्या संशोधनकार्यांचा गुणगौरव करण्यासाठीं म्हणून त्यांस नुकतीच D. Sc. ची पदवी दिली आहे. यांचे इतर बंधूही सुविद्य आहेत. रा. रामचंद्र लक्ष्मण हे मेकॅनिकल इंजिनिअर आहेत. गोविंदसुतांच्या ठिकाणीं आपल्या घराण्याविषयीं जी स्वाभिमान बुद्धि व चौकसपणा असे त्यामुळेंच आमच्या घराण्याच्या या शाखेचें व आमच्या शाखेचें पुष्कळ वर्षें बंद झालेलें दळणवळण पुनः सुरू झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रघुनाथाचा तिसरा मुलगा बहिरव. यास कोणीच वंशज नाहींत. चवथा मुलगा सदाशिव. सदाशिवच्या चार मुलांपैकीं विष्णूचे वंशज बडोद्याकडे गेलेले होते व अंताजीच्या नंतर तो वंश खुंटला आहे. सदाशिवचे दुसरे चिरंजीव गणेश यांच्यापासूनच गोविंदसुतांच्या प्रत्यक्ष पूर्वजांची माहिती मिळते. गणेश सदाशिव हे गोविंदसुतांचे आजे. हे गणपतीचे फार मोठे भक्त होते व त्यांच्या पोटीं जन्मास आलेले गोविंदसुतांचे वडील हेही भगवद्भक्तीकडे प्रवृत्ती असलेले निपजावे यांत नवल नाहीं.



## गोविंदसुतांचे आईबाप व चुलते

गोविंदसुतांना परमेश्वरभक्तीचे आनुवंशिक संस्कार आईचें घराणें व वडिलांचें घराणें अशा दोन्ही बाजूंनीं प्राप्त झालेले होते. गोविंदसुतांच्या मातोश्री राधाबाई या मु. ओंबळी तालुके चिपळूण येथील रामचंद्र केशव परकी यांच्या वडील कन्या होत. गोविंदसुत हे अतीशय मातृभक्त होते. वयाच्या २७ व्या वर्षापर्यंत त्यांस मातेचें छत्र लाभलें होतें. आपल्या मातेच्या थोरवीविषयीं जेव्हां जेव्हां ते आम्हांस व इतर लोकांस गोष्टी

सांगत तेव्हां तेव्हां त्यांस फारच गहिंवर येत असे. पहाटे ४ वाजल्यापासून रात्रीं १० वाजेपर्यंत " हरेराम हरेराम राम राम हरे हरे " या मंत्राचा जप राधाबाईच्या तोंडीं एकसारखा चालू असे. हा जप तोंडानें चालू असतांनाच घरांतील प्रपंचाचीं सर्व कामें यथायोग्य चालू असत. कधीं कधीं जपाची संख्या मोजून ठेवण्यासाठीं सहस्र जप झाला म्हणजे भिंतीवर गंधाचा एक ठिपका लावावयाचा अशा पद्धतीनें मोजून जप करीत. गोविंदसुतांना त्यांच्या पारमार्थिक संपत्तीचें बरेंचसें भांडवल त्यांच्या मातोश्रीकडून मिळालेलें आहे असें ते सांगत व प्रापंचिक आणि पारमार्थिक अशा दोन्ही दृष्टींनीं अशा नमुनेदार वर्णनाची माउली हल्लींच्या काळीं सांपडणें दुर्मिळ आहे याबद्दल चालू समाजस्थितीचा त्यांस खेद वाटत असे. आपल्या मातोश्रींबद्दल गोविंदसुतांस किती प्रेम व धन्यता वाटत असे याबद्दल परमार्थ विचारमाला आवृत्ति पहिली पृष्ठ ४७ व आवृत्ती दुसरी पृष्ठ ४३ यांतील एकच उतारा पुरे आहे. ते लिहितात ." विषयांत असतांनाच विषयांतर होऊन अंतरांतील आत्मारामाकडे लक्ष वेधेल तर रामरूपच आपण होऊं. रामाचें हें वेड लागणें फार दुर्लभ आहे....जनक राजा म्हणतात प्रपंच व परमार्थ दोन्ही एकदमच चालवीत होता आणि पुनः आपला विदेही तो विदेही, करून अकर्ता! आमची मातोश्री असे ती पहांटे ४ वाजल्यापासून ते रात्रीं दहा वाजेपर्यंत ' हरे राम हरे राम......कृष्ण कृष्ण हरे हरे " अशा प्रेमोद्गारांच्या टकळीनें सारखी लाखोली वाहून घरचें प्रपंचकृत्य व्यवस्थित रीतीनें चालवीत असे ! अशा मातोश्रीच्या उदरीं नारायणानें जन्म दिला ही धन्यताच होय, पण त्या जन्माचें आपण सार्थक करूं तर उपयोग ! तथापि सार्थक केलें तरी त्यांत धन्यता ती कसली ?......हीं आपलीं अवश्य कर्तव्येंच आहेत. " राधाबाई स्वभावानें फार करारी व बाणेदार होत्या. गोविंदसुत व त्यांचे बंधु यांस वडिलांचें छत्र फार दिवस लाभलें नाहीं. गोविंदसुतांच्या ९ व्या वर्षी त्यांचे वडील वारले. मातोश्रीनें १८ वर्षें वैधव्य दशेंत काढलीं. या मुदतींत ती आपलें घर सोडून दुसऱ्या कोणाच्याहि घरीं कधीं गेली नाहीं. घरामध्यें नेहमीं कामकाजांत व ईशचिंतनांत निमग्न असे. १८ वर्षांत फक्त तीनच वेळां शेजारीं रामभाऊ नानल यांच्या घरीं गेली व अत्यवस्थ माणसांच्या समाचाराला वगैरे अशा विशेष प्रसंगानेंच त्या वेळीं गेली. वडील रामचंद्र परकी यांनीं आपल्या आजारीपणांत व वार्धक्यदशेंत शुश्रूषेसाठीं त्यांस ओंबळीस बोलावलें असतां तेथें न जातां त्यांनीं वडिलांसच सांवर्डे येथें बोलावलें व ३ वर्षें त्यांची सेवा केली. या मुदतींत राधाबाई एकदां अत्यवस्थ आजारी पडल्या होत्या व सर्वांस वाटलें कीं हें त्यांचें शेवटचें दुखणें आहे.

परंतु त्यांनीं आत्मविश्वासानें सर्वांस सांगितलें कीं माझ्या वडिलांची योग्य व्यवस्था माझ्या हातून लावल्याखेरीज मी कांहीं मरणार नाहीं व अखेर तसेंच झालें. याला म्हणतात " वुइल्-पॉवर " अगर निश्चयाचें बळ. राधाबाई त्या दुखण्यांतून खरोखरच उठल्या. रामचंद्र पत्की यांनीं मरणापूर्वीं कांहीं दिवस अगोदर संन्यास घेतलेला होता. आमच्या वडील घराण्यांतील हरी महादेव यांनींही संन्यास घेतलेला होता. त्यांच्या समाधीजवळच रामचंद्र पत्की यांचीही समाधि सांवडें येथें आमच्या वास्तूंतील एका जुनाट पिंपळाच्या वृक्षाखालीं आहे. आपल्या वडिलांच्या पश्चात् राधाबाई लवकरच निवर्तल्या. गोविंदरावांच्या पश्चात् गोपाळ गणेश हे जरी आपल्या मुलांवर वडिलाप्रमाणेंच प्रेम करून त्यांचें संगोपन, शिक्षण वगैरे उत्तम तऱ्हेनें करीत होते तरी " मुलांनो, तुम्ही आपल्या स्वतःच्या पराक्रमावर उभे राहा, चुलत्याचे ओशाळे होऊन राहूं नका " असा बाणेदार उपदेश त्या आपल्या मुलांस नेहमीं करीत असत.

गोविंदपंत हे त्या काळच्या मानानें व त्या वेळच्या कौटुंबिक परिस्थितींत एक मोठेच पराक्रमी व तेजस्वी पुरुष होऊन गेले. वर मातोश्रींबद्दल व आतां वडिलांबद्दल जी माहिती दिली जात आहे ती माहिती गोविंदसुतांच्या तोंडूनच आम्ही अक्षरशः मिळविलेली आहे व आमचे चुलते ती. नरसूबाबा यांच्याकडूनहि या माहितीला दुजोरा मिळालेला आहे. गोविंदपंत हे एक स्नानसंध्याशील व तेजस्वी ब्राह्मण होते. ते दररोज एकादष्णी ( रुद्राचीं अकरा आवर्तनें ) करीत व दररोज विष्णुसहस्रनाम म्हणत, त्याशिवाय अन्नग्रहण करीत नसत. ते मुलकी खात्यांत नोकर होते. रत्नागिरी जिल्ह्यांत एल्फिन्स्टन नांवाचे साहेब प्रांताचे हुद्यावर होते त्या वेळीं गोविंदपंत बरेच दिवस या साहेबांच्या हाताखालीं शिरस्तेदाराचें काम करीत होते. गोविंदपंतांची हुषारी, बुद्धिमत्ता व चोखपणें काम करण्याची हातोटी पाहून एल्फिन्स्टन साहेबाची गोविंदपंतांवर विशेष भक्ति बसली होती. या साहेबांचा पुढें गोविंदसुतांच्या चरित्राशींही निकट संबंध येणार आहे हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें गोविंदपंत दापोली तालुक्याच्या मामलेदार कचेरींत बरेच दिवस हेडकारकून होते व त्या वेळीं मुंबई हायकोर्टांतील सुप्रसिद्ध वकील कै. दाजी आबाजी खरे यांचे वडील आबाजी धोंडदेव हे मामलेदार असत. डाव्या डोळ्यांत वडस असलेले, हातांत फार लांब लेखणी नेहमीं धरून लिहिणारे व उत्तम प्रकारचें वळणदार अक्षर असलेले असे दापोलीचे हेडकारकून गोविंदपंत चिंचाळकर कित्येक वर्षें जुन्या लोकांच्या स्मरणांत राहिलेले होते. आमच्या लहानपणीं दापोलीकडील वृद्ध रहिवाशांनीं त्यांच्या प्रत्यक्ष माहितीचें

असें वर्णन गोविंदपंतांबद्दल दिलेलें आहे व तें ऐकतांना आम्हांस आनंद वाटे. ते दिसण्यांत उंच व भव्य पुरुष होते. स्वभावानें फार कनवाळू व लोकांच्या उपयोगी पडण्यांत धन्यता मानणारे होते असें त्यांच्याबद्दल लोक आम्हास सांगत असत. गोविंदसुत सांगत असत कीं लहानपणीं आम्हां सर्व भावंडांना वडिलांचा फार धाक वाटत असे. त्यांची शिस्त कोणी मोडीत नसे व त्यांची अवज्ञा करण्याचेंहि कोणाचें धाडस होत नसे. राजापूर येथें हेडकारकून असतांना जलोदरानें आजारी पडून गोविंदपंत सांवर्ड्यास रजा घेऊन आले व त्या दुखण्यांतच १८७१।७२ सालीं गोविंदपंत वारले. त्यावेळीं त्यांचें वय ४७।४८ वर्षांचें होतें.

गोविंदपंतांच्या मृत्यूनें कुटुंबावर दुःखाचा मोठाच डोंगर येऊन कोसळला. पांच अज्ञान मुलगे व त्यांची मातोश्री यांनीं पुढें काय करावें हा बिकट प्रश्न उभा राहिला. गोविंदपंतांचा नोकरींत कांहीं वर्षांपासूनच जम बसला होता, परंतु त्यांनीं मागें शिलक अशी कांहींच टाकली नव्हती अथवा कांहीं स्थावर इष्टेटही मिळविली नव्हती. त्यांस शेवटीं पगार दरमहा रु. ५० होता. धाकटे बंधु गोपाळ यांचें धैर्य अगदींच खचून गेलें व डोक्यावर हात ठेवून ते रडूं लागले, कारण एवढ्या कुटुंबाच्या चरितार्थाची कांहींच सोय नव्हती. या बिकट प्रसंगांत कै. रामभाऊ नानल हे गृहस्थ गोपाळरावांस धीर देणारे निघाले. " तूं पुरुष असून रडतोस काय ? मला तूं भावाच्या ठिकाणीं समज. " असें बोलून त्यांनीं समजूत घातली. रत्नागिरीचे सुप्रसिद्ध जुने वकील श्री. भास्करबाबा नानल यांचे रामभाऊ हे वडील होत. या हकीगतीनंतर रामभाऊ नानल व गोपाळ चिंचाळकर या दोघांनींही दीर्घ परिश्रम करून समाईकींत सर्व मिळकत मिळविली. या दोन व्यक्ती शरीरानें भिन्न परंतु अंतःकरणानें एक होत्या. यापूर्वी सांवर्डे येथें घराखेरीज चिंचाळकरांची इष्टेट कांहींच नव्हती म्हटलें तरी चालेल. या दोन व्यक्तींनीं आसपासच्या २।३ गांवांत खाजगी शेती संपादन केली व नजीकच्या मांडकी गांवांत ४।५ आणे खोती तक्षीमही संपादन केली. या दोन कर्तबगार पुरुषांच्या हयातींतील भरभराटीच्या स्थितीचे शेवटचे कांहीं दिवस आम्हींही पाहिले आहेत. वडील वारल्यानंतर ७।८ वर्षांत या पांचही भावंडांचीं लग्नकार्यें झालीं. रामचंद्र नानल यांनीं आपली वडील मुलगी नरसो चिंचाळकर यांस देऊन भागीदारींतील इष्टेटसंपादनाला नात्याच्या दुव्याचाही संबंध जुळवून दृढीकरण आणलें. रामभाऊ नानल १८९९ च्या सुमारास वारले व गोपाळपंत चिंचाळकर १९०५ सालीं वारले. तोंपर्यंत दोघांच्या मिळकती समाईकच होत्या. त्यानंतर खाजगी इष्टेटींत वांटण्या पडल्या, परंतु खोती तक्षीम मांडकीची १९२२ सालपर्यंत समाईकच

होती. गोपाळपंतांच्या तोंडून आम्ही एकदां असे उद्गार ऐकले होते कीं माझे बंधू हयात असते तर ते मामलेदारीच्या हुद्यापर्यंत चढले असते, मीही मामलेदाराच्या पगाराइतकें उत्पन्न येणारी इष्टेट कमावली आहे व माझ्याही हाताखालीं चार दोन गडी माणसें असतातच, तेव्हां माझ्यांत व मामलेदाराच्या हुद्यांत मला फरक वाटत नाहीं. गोपाळपंतांचें पहिलें कुटुंब निवर्तल्यानंतर पांच पुतण्यांच्या भवितव्यतेची त्यांच्यावर जबाबदारी आली यामुळें दुसरें लग्न करण्याच्या खटाटोपांत ते पडले नाहींत व पांचापैकींच शेवटचा मुलगा दत्तक घेऊन आपली इष्टेट पांच इसमांत सारखी वांटण्याचें ठरवून गेले व जन्मभर या पांच बंधूंकरतांच सर्व काबाडकष्ट करून त्यांचे कल्याणार्थ झटले; यामुळें या सर्व बंधूंना आपलें पालन करणारे खरे पिते गोपाळकाकाच आहेत असें वाटल्यास नवल काय? गोपाळकाकांच्या शेवटच्या दुखण्यांत परमेश्वराचें त्यांस चिंतन घडावें म्हणून गोविंदसुतांनीं रामनामस्मरणाचे कांहीं अभंग त्यांस वाचून दाखविण्यासाठीं म्हणून लिहून पाठविले होते. गोपाळकाकांनीं ते अभंग वाचून पाहून गोविंदसुतांस विनोदानेंच उत्तर लिहिलें "रामभाऊंची आठवण तुम्ही त्यांच्या पश्चात् चांगलीच जागृत ठेवली आहे असें रामनामाच्या पाठविलेल्या अभंगांवरून दिसतें, माझ्या पश्चात् माझे नांवाचीही आठवण अशीच जतन करा!" १९०५ सालीं गोपाळ काका निवर्तले त्या वेळीं पुण्याच्या प्लेगमुळें चिंचवडनजीक आकुर्डी गांवीं आम्ही राहात होतों व गोविंदसुत दररोज रेलवेनें पुण्यास ऑफिसला जाऊन येत. आजारीपणांत गोविंदसुत त्यांची शेवटची भेट घेऊन आलेच होते. परंतु निवर्तल्याचें पत्र ऑफिसमध्यें मिळतांच त्यांस शोक आंवरेना. ही दुःखद बातमी लवकरच येणार असल्याचें ऑफिसच्या मंडळींस त्यांनीं अगोदर सांगून ठेवलेंच होतें. तथापि प्रत्यक्ष बातमी येऊन पोंचल्यावर त्यांस रडें दाबतां येईना व घरीं आल्यावर तर आम्हांस बराच वेळ त्यांच्या दुःखाचा उलगडा होईना. आपले जनक आईबाप व पितृतुल्य पालक गोपाळ काका यांच्यावर गोविंदसुतांची किती निःसीम भक्ति होती याचा एकच दाखला देऊन हा भाग संपवितों. परमार्थ-विचार-मालेची पहिली व दुसरी आवृत्ति, तसेंच आत्मानुसंधान ग्रंथ यांतील पहिलेंच अर्पणपत्रिकेचें पान काढून पाहिल्यास सर्व ठिकाणीं गोविंदसुतांनीं आपल्या मायबापांस व चुलत्यांस परमेश्वराइतकाच मान दिला आहे. "जगच्चालकानें राधागोविंदरूपानें मायबाप होऊन मानवदेहत्व दिलें, गोपाळरूपानें पितृव्य होऊन संगोपन करून लहानाचें मोठें केलें" हीं व अशाच अर्थाचीं गौरवयुक्त वचनें अर्पणपत्रिकेंत आहेत. धन्य ते भाग्यशाली धर्मनिष्ठ पूर्वज व धन्य ते कृतज्ञ आर्यपुत्र! त्या सर्वांस वंदन करून पुढील भागाकडे वळूं या.

---

## गोविंदसुतांचे बंधु

गोविंदसुतांच्या सद्गुणांचें स्मरण करीत असतां त्यांस बंधु किती व कोण आहेत व त्यांच्यांत व गोविंदसुतांत कांहीं समान गुण आढळतात किंवा नाहीं याविषयीं वाचकांस जिज्ञासा वाटणें साहजिक आहे, सबब त्याबद्दल माहिती निवेदन करतों.

गोविंदसुतांचे सर्वांत वडील बंधु सदाशिवराव ऊर्फ सदूबाबा हे ५ वर्षांपूर्वी सांवडें येथें निवर्तले. त्या वेळीं त्यांचें वय ७२।७३ वर्षांचें असेल. त्यांचें सर्व आयुष्य सांवडें येथेंच खेडेगांवच्या राहाणींत गेलें. ते लहानपणीं चिपळूण येथें शिक्षणासाठीं राहिले होते व पुढील वयांत १५।२० वर्षें शेजारच्या डेरवण गांवचें पोलीसपाटीलकीचें काम करीत होते त्या कामानिमित्त कधीं कधीं चिपळूणच्या मामलेदार अगर फौजदार कचेरींत त्यांस जावें लागत असे. याशिवाय शहराच्या राहणीचा त्यांस संपर्क नव्हता. सर्व आयुष्यांत ते एकदोनदांच आगगाडींत बसले असतील. एकदां आम्ही कोंकणांतून पुण्याकडे जात असतां कऱ्हाडपर्यंत ते आम्हांस पोंचविण्यास आले होते. त्या वेळीं कऱ्हाड ते मसूर पावेतों मुद्दाम आम्ही त्यांस आगगाडींत बसविलें व एकदां पंढरपूरच्या यात्रेस गेल्यावेळीं. त्यांना गायनकलेचा विशेष नाद असे. परंतु संगीत नाटकांतील शृंगारिक पदें, वगैरे प्रकार चुकून सुद्धां त्यांच्या तोंडीं कधीं येत नसत. कै. बाबा गर्दे यांच्या गीतामृतशतपदींतील कांहीं विशेष पदें किंवा कीर्तनकारांच्या आख्यानांतील ईशभक्तिपर पद्यें हींच दिवसांतून २।३ वेळां तरी मुक्तकंठानें म्हटल्याशिवाय ते राहात नसत. गांवांत अगर आसपास कोणी कीर्तनकार आला कीं त्यास साथ धरण्याचें काम हटकून सदूबाबांकडेच यावयाचें. यांचा स्वभाव नेहमीं आनंदी, निगर्वी व उद्योगशीलतेचा होता व राहणी अत्यंत साधी व नियमितपणाची असे. तरुणपणांत शेतीचीं व प्रपंचाचीं काबाडकष्टाचीं कामें व पोलीसपाटीलकीचें काम यांनीं केलें व उतारवयांत जरूर तेवढी विश्रांति घेऊन बाकीच्या वेळांत हातानें कांहीं तरी उपयुक्त काम केल्याखेरीज त्यांस चैन पडत नसे. वडाचीं पानें आणून चोया तयार करून द्रोण पत्रावळी लावीत बसतील किंवा चाती फिरवून कापसाचें सूत काढून त्याचीं जानवीं करीत बसतील किंवा लहान मुलांस तोंडानें पर्वचा अगर देवाचे श्लोक शिकवीत बसतील; परंतु अगदीं रिकामे चकाट्या पिटीत किंवा आळसलेले कधींही सांपडावयाचे नाहींत. मानवी स्वभावास व कोंकणप्रांतांतील पीठिकेस अनुसरून घरांत व गांवांत भाऊबंदकीचे तंटे नेहमीं चालावयाचेच, परंतु आसपास कितीही खवळलेलें वातावरण असलें तरी सदूबाबांची निसर्गदत्त शांत वृत्ति कधींही ढळत नसे व या एका गुणामुळें सुद्धां ते सर्व लहानथोरांस

सारखेच आदरणीय वाटत. सर्व कनिष्ठ बंधू सदूबाबांपुढें आदरानें मान लववीत असत व त्यांच्या हयातीपावेतों त्यांची शुश्रूषा उत्तम प्रकारें करून त्यांस कांहीं कमी पडूं देत नसत. गोविंदसुत यांनीं कोंकणांतील आपल्या वडिलार्जित इस्टेटीचें उत्पन्न आपल्या स्वतःसाठीं कधींही घेतलें नाहीं. आपल्या पांचव्या हिश्श्याचें जें उत्पन्न त्यांस यावयाचें त्यापैकीं निम्में उत्पन्न वडील बंधू सदूबाबा यांस त्यांच्या हयातीपावेतों ते देत होते व निम्में उत्पन्न आपले कनिष्ठ बंधू वासुअण्णा यांस ते देत असत. इतकेंच नव्हे तर आपल्या पेन्शनांतून वेळोवेळीं रकमा पाठवून मूळ ठिकाणीं राहाणाऱ्या आपल्या गरजू बंधूंस गोविंदसुत मदत करीत असत. सदूबाबांच्या मुलानें सावकाराचें कर्ज करून त्याबद्दल मुलावर हुकुमनामे झाले असें समजतांच आपल्या वडील बंधूंस त्यांच्या हयातींत उपसर्ग पोंचूं नये म्हणून गोविंदसुतांनीं सुमारें ५०० रुपये स्वतःच्या पेन्शनांतून ३।४ वर्षें एकसारखे वेळोवेळीं मिळून भरून मोने आडनांवाच्या एका सावकाराची भरपाई केली. गोविंदसुतांच्या परिस्थितीच्या दृष्टीनें हा स्वार्थत्याग व ही झीज फारच मोठी म्हणावी लागते. याचें श्रेय बहुतेक अंशीं गोविंदसुतांच्या लोकोत्तर बंधुप्रेमाला आहेच. परंतु ती. सदूबाबांचें वर्तनही तितकेंच आदरणीय व सहानुभूति उत्पन्न करण्याजोगें होतें हें विसरतां कामा नये.

दुसरे बंधू तीर्थरूप नरसूबाबा. यांचें वय हल्लीं ७५ चे वर असून रत्नागिरी जिल्ह्यांत मुलकी खात्यांत यांनीं ३०।३२ वर्षें कारकुनाची नोकरी उत्तम प्रकारें केली असून सुमारें २२।२३ वर्षें पेन्शन घेऊन सांवडें येथेंच राहात आहेत. आमचे चुलत आजोबा कै. गोपाळ गणेश यांनीं आपल्या पांचही पुतण्यांचा लहानपणीं पोटच्या मुलांप्रमाणें प्रतिपाळ केला, त्यांस शिक्षण दिलें, त्यांचीं लग्नकार्यें केलीं व जगांत स्वतंत्रपणें आपल्या पायांवर उभें राहण्यास समर्थ केलें व त्यांचा पराक्रम पाहाण्यास कांहीं वर्षें जगलेही. ते नेहमीं म्हणत असत कीं हे माझे पांच पुतण्ये म्हणजे मला पांच पांडवांप्रमाणें वाटतात. याच दृष्टांताच्या अनुरोधानें सदूबाबा हे धर्मराज शोभतात, नरसूबाबा हे भीमसेनाप्रमाणें भासतात व तिसरे परशुरामभाऊ हे अर्जुनाची उपमा देण्यास योग्य ठरतात असे उद्गार ते अभिमानानें काढीत. ती. नरसूबाबा हे फार बुद्धिमान्, विद्याव्यासंगी व अविश्रांत मेहनत करणारे आहेत. नियमित आहारविहार व वैद्यशास्त्राचीं तत्वें स्वतः समजावून घेऊन तदनुसार वर्तन यामुळें या वयांतही त्यांची शरीरप्रकृति सुदृढ असून तरुण लोकांसही लाजविणारी अशी त्यांची उद्योगप्रियता आहे. ती. नरसूबाबा इ. स. १८९५ ते १८९७ सालीं तालुका खेड जिल्हा रत्नागिरी येथें मामलेदारकचेरींत कारकून असतांना

प्रस्तुत लेखकाचें मराठी चार इयत्तांचें शिक्षण नरसूबाबांकडे राहून झालेलें आहे व त्या वेळीं त्यांनीं अत्यंत प्रेमानें व कळकळीच्या हितबुद्धीनें आम्हांस शाळेबाहेरही जें घरगुती शिक्षण दिलें व शिस्त लावली त्याबद्दल त्यांच्याबद्दल अद्यापही आम्हांस आदर व कृतज्ञता वाटते. ती. नरसूबाबांवर अनेक प्रकारचे प्रापंचिक आघात येऊन गेले व अनेक दैवी व मानवी आपत्तींशीं त्यांस झगडावें लागलें आहे, परंतु अलौकिक मानसिक धैर्य व स्वार्थत्याग यांमुळें त्यांनीं दुःखांची व संकटांची कधींच पर्वा केली नाहीं. स्वभाव फार कडक व बोलणें स्पष्टोक्तीचें व सडेतोड असल्यामुळें जरी व्यावहारिक दृष्ट्या सर्वांशीं सारखीच लोकप्रियता त्यांस संपादन करतां आली नाहीं, तरी गोविंदसुत हे त्यांची योग्यता व कर्तृत्वशक्ति पूर्णपणें जाणत असत व त्यांच्याबद्दल नेहमीं वडिलांप्रमाणें पूज्यबुद्धि बाळगत असत व त्यांस नांवें ठेवणारांस गोविंदसुत सांगत असत कीं त्यांच्या चांगल्या गुणांचें तुम्ही अनुकरण करा व त्यांच्या शतांश तरी पराक्रम स्वतः करून दाखवा. ती. नरसूबाबाही गोविंदसुतांची योग्यता व अधिकार जाणून असत. गोविंदसुतांच्या मृत्यूनंतर अकराव्या दिवशीं सांवड्यांहून त्यांनीं पाठविलेल्या दुखवट्याच्या पत्रांत ते लिहितात "मुंबईहून बर्वे बंधूंनीं नवाकाळ मुद्दाम माझ्याकडे अगत्यानें पाठविला. त्यांतील लेख व वर्णन वाचून मला फार गहिंवर आला व त्यांतील परशुरामभाऊंचे फोटो पाहून ते प्रत्यक्ष समोर असल्याप्रमाणें वाटलें व त्या फोटोवर मी मनमुराद प्रेमाश्रु ढाळले. इकडील प्रांतांतील आम्हां सर्वांस त्यांच्या नांवलौकिकामुळें भूषण वाटत होतें. आपणांस अत्यंत प्रिय अशा माणसास मृत्यू येऊन जो वियोग होतो त्याचें दुःख फार असह्य आहे. गेल्या वर्षी चि. श्रीरामाचें निधन झालें, त्यानंतर आतां परशुरामभाऊंची वार्ता आली. अशीं कर्तबगारीचीं माणसें घराण्यांत आतां राहिलीं नाहींत. पुढें होतील. नाहीं होणार असें कां म्हणावें ! परंतु आज नाहींशीं झालीं व जीं राहिलीं त्या सर्वांचेंच भूषण व आधार नाहींसा झाला. माझ्या मनाच्या खंबीरपणाचाच मला जो कांहीं आधार मिळेल त्यावरच मला काळ दवडणें भाग आहे." ती. नरसूबाबांस परमेश्वराचें भजन, पूजन व कीर्तन यांचा नाद विशेष आहे. कधीं कधीं स्वतः कीर्तन व निरूपण करतांनाही त्यांस आम्ही ऐकलें आहे. त्यांस वक्तृत्वशक्ति व लेखनशक्ति यांची चांगली देणगी आहे.

तिसरे व मधले बंधू परशुरामपंत. हे आपल्या ग्रंथलेखनानें विशेष प्रसिद्धीस आल्यामुळें अनेक लोकांच्या जिज्ञासेस्तव त्यांचें हें अल्प चरित्र जनताजनार्दनाला सादर होतच आहे. चवथे बंधु वासुअण्णा. यांचें वय हल्लीं ७० वर्षांचें आहे. यांचें सर्व आयुष्य सांवडें येथेंच शेतीवाडीच्या व्यवस्थेंत व

खोतीगांवच्या वहिवाटींत गेलें. वयोमानामुळें अलीकडे ८।१० वर्षांपासून यांच्याकडून कोणतेंहि दगदगीचें काम होत नाहीं. तथापि वडील बंधूंची शुश्रुषा व घराण्यांतील मिळकतीचे मूळ संपादक चुलते गोपाळ गणेश यांचीही अत्यंत आस्थेनें शुश्रुषा केल्याचें श्रेय त्यांनीं मिळविलें आहे. गोपाळ गणेश १९०५ सालीं निवर्तले. त्यापूर्वीं बरेच दिवस ते पराधीन स्थितींत होते. त्या दुखण्यांत अहोरात्र चुलत्यांच्या सन्निध बसून सर्व प्रकारची खडतर शुश्रुषा वासुअण्णांनीं केली व ज्या गोपाळ गणेश यांस वासुअण्णा हे आपले खरे अन्नदाते समजत असत त्यांचा अखेरचा आशीर्वाद व धन्यवाद वासुअण्णांनीं मिळविला आहे व हीच ते आपल्या आयुष्यांतील सर्वांत मोठी कमाई समजतात. त्यांनीं आपल्या एका मुलाचें नांव गोपाळ असेंच ठेवून त्यास लहानपणापासून पालन-पोषण-शिक्षणासाठीं गोविंदसुतांकडे पाठवून दिलें. चि. गोपाळचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण होऊन अमळनेर येथें तो शिवणकामाचें दुकान चालवीत आहे. गोविंदसुतांच्या अखेरच्या दुखण्यांत चि. गोपाळ यानें त्यांची फारच सेवाशुश्रुषा केली व दूर अंतरामुळें आपण स्वतः जरी कांहीं करूं शकलों नाहीं तरी आपला मुलगा गोविंदसुतांच्या उपयोगी पडला याबद्दल वासुअण्णा यांस दुःखांत सुद्धां थोडें समाधान वाटलें. आपल्या हिश्श्यापैकीं निम्में उत्पन्न गोविंदसुत हे वासुअण्णांस देत असत हें पूर्वीं सांगितलेंच आहे. गोविंदसुतांच्या निधनोत्तर ती. वासुअण्णांनीं आपल्या पत्रांत उद्गार काढले आहेत तेः—" आमचे मायबाप राधा गोविंद यांच्या पवित्र उदरीं जन्मून सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेला दीप ता.८।१।३४ रोजीं मालवला. सर्व लहानथोरांवर आईप्रमाणें सारखें प्रेम त्यांनीं केलें. माझ्यावर तर त्यांची कृपादृष्टि त्यांच्या अंतकालापर्यंत होती. ता. ३१।१२।३३ चें त्यांच्या हातचें मला शेवटचें पत्र आलें त्यांत माझ्या निर्वाहाकरतां १० मण भात देण्याची त्यांनीं व्यवस्था केली. त्यांच्या मृत्यूच्या बातमीनें आम्हांस किती हळहळ लागली तें लिहितां येत नाहीं. आमची आईच आज आम्हांस सोडून कायमची निजधामास गेली. ईश इच्छा. "

शेवटचे बंधु जनार्दनपंत ऊर्फ कृष्णाजीपंत. यांच्या लहानपणींच यांस चुलते गोपाळ गणेश यांनीं दत्तक घेतलें होतें म्हणून वंशवृक्षांत गोपाळ गणेशाचे चिरंजीव म्हणून यांचें नांव दाखल आहे. कोंकणप्रांतांत आमची जी वडिलार्जित इस्टेट आहे ती सर्व गोपाळ गणेश यांनीं स्वकष्टानें मिळविलेली आहे. त्यांनीं कृष्णाजीपंतांस दत्तक घेतल्यामुळें त्या इस्टेटीची कायद्याप्रमाणें सर्व मालकी कृष्णाजीपंत व त्यांचे वंशज यांच्याकडेच जावयाची. परंतु गोपाळ गणेश यांचें सर्व पुतण्यांवर सारखेंच प्रेम असल्यामुळें आपण

मिळविलेल्या इष्टेटींत पांच भावांनीं सारखे हिस्से वांटून द्यावे असें व्यवस्थापत्र गोपाळ गणेश यांनीं करून ठेवलें. कृष्णाजीपंतांनीं यत्किंचित्‌ही आढेवेढे न घेतां त्या मृत्युपत्रावर आपली संमतिदर्शक साक्ष टाकली. या एकाच गोष्टीवरून कृष्णाजीपंतांची निःस्वार्थबुद्धि, बंधुप्रीति व वडिलांच्या आज्ञेस मान देण्याची तत्परता हे गुण दिसून येतात. हल्लींच्या तीव्र जीवन-कलहांत हे गुण फारच दुर्मिळ आहेत. ती. नरसूबाबा व गोविंदसुत यांनीं जनार्दनपंतांच्या शिक्षणास बरीच मदत केली व त्या वेळची इंग्रजी पब्लिक सर्व्हिसची परिक्षा ते पास झाले होते. रत्नागिरी व कुलाबा जिल्ह्यांत सुमारें १७।१८ वर्षें पब्लिक वर्क्स खात्यांत त्यांनीं कारकुनाची नोकरी केली व वयाच्या ४७ व्या वर्षीं प्लेगनें पनवेल येथें त्यांस अकालीं देवाज्ञा झाली ( इ. स. १९१५ ). केसरीवर व लोकमान्यांवर त्यांची विशेष भक्ति होती. त्यांच्या पश्चात्‌ त्यांच्या एकुलत्या एक चिरंजीवांचें कॉलेजपर्यंतचें शिक्षण गोविंद-सुतांनीं केलें व चि. गोविंद कृष्ण हा सुमारें १० वर्षांपासून धुळें म्युनिसिपालिटींत अकौंटंटचे जागेवर नोकरी करीत आहे.

## गोविंदसुतांचें बालपण व शिक्षण

गोविंदसुत यांस लहानपणीं वयाच्या तिसऱ्या चौथ्या वर्षानंतर आई-बापांचा विशेष ओढा नव्हता म्हटलें तरी चालेल. वडील दापोली, राजापूर वगैरे तालुक्याच्या ठिकाणीं नोकरीवर असत व तेथेंच त्यांच्या मातोश्रीही असत व गोविंदसुत हे घरींच सांवर्डें येथें आपले चुलते गोपाळ गणेश व चुलत आजी यांच्याबरोबर राहत. ७ व्या वर्षाच्या सुमारास मौंजीबंधन झालें तोंपर्यंत सांवर्डें येथेंच गांवठी पंतोजींच्या हाताखालीं गोविंदसुतांनीं ११२ वर्षें शिक्षण घेतलें. मौंजीबंधनानंतर शाळेचें शिक्षण पाहिजे म्हणून वडिलांनीं गोविंदसुतांस राजापूर येथें आपल्या बरोबर नेलें व तेथील मराठी शाळेंत गोविंदसुतांचें नांव घालण्यांत आलें. परंतु दुर्दैवानें वडिलांचें छत्र त्यांस फार दिवस लाभलें नाहीं. गोविंदसुतांच्या ९ व्या वर्षींच त्यांचे वडील जलोदरानें सांवर्डें येथें निवर्तले व वडिलांचा आधार तुटल्यावर चुलते गोपाळ गणेश यांनीं आपल्या शिरावर सर्व जबाबदारी घेतली हा वृत्तांत पूर्वीं दिलाच आहे. सदाशिव, नरसो व परशुराम या तिघांची शिक्षणाकरतां चिपळूण येथें राहा-ण्याची सोय गोपाळरावांनीं करून दिली व या तिघां मुलांवर देखरेख ठेवण्यासाठीं व त्यांस जेवण करून घालण्यासाठीं आपली चुलती आनंदीकाकू म्हणजे दिनकर सदाशिव यांचें कुटुंब या पोक्त बाईची त्यांनीं योजना केली. या आनंदीकाकूंनीं आपणांस फारच ममताळूपणानें वागविलें असें गोविंदसुत

नेहमीं सांगत असत. आई सांवड्यांस राहिली, परंतु आईपेक्षांही ही चुलत आजी आम्हां भावांचें अधिक कोडकौतुक करीत असे व आमचे बाळपणचे हट्ट पुरवीत असे अशाबद्दल गोविंदसुत अनेक प्रकारचीं उदाहरणें देऊन सांगत असतां त्यांच्या डोळ्यांत प्रेमाश्रू येत असत व अशीं प्रेमळ माणसें हल्लींच्या नव्या युगांत कोठेंही दृष्टीस पडत नाहींत असें ते म्हणत असत. चिपळूणला राहिलेल्या तिघां भावांत गोविंदसुतच सर्वांत लहान म्हणून या माउलीपाशीं त्यांचाच हट्ट सर्वांत जास्त चालत असे. सदाशिव व नरसो हे दोन इयत्ता पुढें होते. या आनंदीकाकूंना एकच मुलगी होती व सप्रे नांवाच्या गरीब भिक्षुक घराण्यांत ती दिलेली होती. गोविंदसुतांना नोकरी लागल्यानंतर या आजीच्या उपकारांचें अंशतः तरी उतराई व्हावें म्हणून तिच्या मुलीचा तिच्या हयातीपावेतों गोविंदसुत परामर्ष घेत असत व वर्षांतून १०।५ रुपये तरी पाठवून तिला मदत करीत असत. कधीं कधीं आमच्या हातून ही मदत गोविंदसुतांनीं पोंचविलेली आहे त्या वेळीं ही मदत काय म्हणून अशी चौकशी आम्ही केली असतां आपल्या लहानपणची सर्व हकीगत गोविंदसुत सांगत असत. यांत गोविंदसुतांचाही पूर्वी वर्णन केलेला प्रेमळ व कृतज्ञ स्वभाव दिसून येतो. मुलांच्या हिताविषयीं आत्यंतिक कळकळ असल्यामुळें आनंदीकाकूंची मुलांवर शिस्तही कडक असे. मुलांनीं सकाळीं लवकर उठलें पाहिजे, स्नान संध्या लवकर केली पाहिजे, अभ्यास नियमितपणें केला पाहिजे, उनाडक्या करूं नये अगर कोणत्याही वाईट संवयी लावून घेऊं नये याबद्दल आनंदीकाकू फार सावधगिरी ठेवीत. इकडे गोपाळराव जरी सांवड्यांस होते तरी त्यांचें सर्व लक्ष चिपळुणास ठेवलेल्या मुलांकडे असे. शहरांतून आपण हल्लीं असें पाहतों कीं आपल्या घरांतच राहून आपलीं मुलें अभ्यास करीत असलीं तरी त्यांच्या अभ्यासाकडे व वर्तनाकडे फारच थोड्या पालकांचें योग्य रीतीनें लक्ष असतें. गोपाळराव हे आंतून अत्यंत प्रेमळ हृदयाचे परंतु बाह्यतः फार कडक शिस्तीची नजर ठेवणारे असे पालक होते. आपल्या गांवचा कोणीही इसम चिपळुणास जाऊन आला म्हणजे गोपाळराव त्यास भेटून सहज विचारावयाचे कीं आमच्या मुलांपैकीं तुम्हांस कोणी कोठें दिसले होते काय? त्या इसमानें अमुक मुलगा बंदरावर दिसला होता असें सांगितलें कीं दुसरे दिवशीं कोणाबरोबर तरी मुलांस चिठी यावयाची कीं तुम्ही काल रोजीं बंदरावर जाण्याचें कारण काय व यावरून तुम्ही अभ्यास न करतां उनाडक्या करतां असें दिसतें, तरी पुनः असें करूं नये. सांवड्यांचा कोणी इसम दिसला कीं त्याचा डोळा चुकवून जावयाचें असें मुलें करूं लागलीं. तरीही

गोपाळरावांच्या कानावर सर्व गोष्टी जातच असत असें आढळून येत असे. त्यावरून आपला चुलता जरी ६ कोसांवर राहातो तरी आपल्या वर्तनावर त्याची पूर्ण पाळत असते अशी मुलांची खात्री होऊन त्या धाकानें ते फारच जपून वागत. जुन्या रोमन साम्राज्याच्या काळीं घरांतील कर्त्या पुरुषाचा इतर सर्व इसमांवर अतीशय करडा एकतंत्री अंमल चालत असे व समाजहिताच्या दृष्टीनें तीच पद्धति चांगली असें म्हणून कायद्यानेंही ती सत्ता मान्य केली जात असे असें आपण वाचतों. तशाच पद्धतीनें चुलत्यांचा धाक व दरारा आपण अखेरपर्यंत बाळगून चाललों व त्यांची कधींही शिस्त मोडली नाहीं व त्यापासूनच आपलें जन्माचें कल्याण झालें असें गोविंदसुत सांगत असत व पूर्वीची तीं समाजबंधनें आजच्या युगांत फारच शिथिल झालेलीं आढळतात म्हणून त्यांस फार वाईट वाटे.

चिपळूणच्या शाळेंत शिकत असतांना गोविंदसुत हे वर्गांत चांगले हुषार विद्यार्थी म्हणून नांवाजलेले होते. विशेषेंकरून भाषाविषय व गणित यांत त्यांचा हातखंडा असे. शुद्धलेखन विषयांत त्यांची कधींच चूक निघत नसे असें ते सांगत. त्या वेळच्या त्यांच्या वर्गबंधूंपैकीं माधवराव दाबके व भिकाजीपंत देशपांडे अशीं दोन नांवें ते प्रामुख्यानें सांगत असत. पैकीं रा. भिकाजीपंत देशपांडे हे त्यांचेबरोबर पुण्यास मुलकी खात्यांतच नोकर होते व डेप्युटी कलेक्टरच्या हुद्यापर्यंत जाऊन नंतर वारले. परशुरामपंत मराठी चवथ्या इयत्तेंत होते व सदाशिवराव व नरसूबाबा सहावे इयत्तेंत शिकत होते, अशा वेळीं पूर्वीं वर्णन केलेला गोविंदपंतांचा वरिष्ठ एल्लफिन्स्टन साहेब हा रत्नागिरी जिल्ह्याचा कलेक्टर झालेला होता व त्याचा मुक्काम चिपळूण येथें असतां तो तेथील मराठी शाळा पाहाण्यास आला. हा साहेब मिशनरी होता, त्यास मराठी भाषा चांगली येत असे व मुलांची परीक्षा घेण्याचा त्यास मोठा नाद असे. चवथ्या इयत्तेंत येऊन त्यानें सत्तराशिकाचें एक उदाहरण घातलें व जो मुलगा हें उदाहरण तोंडीं करील व प्रथम पाटी टाकील व बिनचूक उत्तर मांडील त्यास एक पुस्तक बक्षीस देऊं केलें; तें उदाहरण परशुरामानें सर्वांच्या अगोदर सोडविलें व पाटी टाकली व उत्तर बरोबर आलें. आपले पूर्वीचे शिरस्तेदार गोविंदपंत यांचा हा मुलगा आहे असें साहेबांस समजून येतांच त्यास फारच गहिंवर आला. गोविंदपंतांस आणखी मुलें किती, तीं कोठें असतात, त्यांच्या विद्याभ्यासाची काय तरतूद आहे वगैरे सर्व चौकशी साहेबानें केली. तीन मुलगे याच शाळेंत शिकत आहेत व घरची सांपत्तिक स्थिति फारच हलाखीची आहे असें साहेबास समजतांच शाळेचे हेडमास्तर मोरो विश्वनाथ लोवलेकर

यांस साहेबानें हुकुम दिला कीं या मुलांना फी पुस्तकें वगैरेसाठीं जो दरमहा खर्च लागेल तो मला कळवीत जा, मी पाठवून देत जाईन व या मुलांची सहावी इयत्ता पास झाली म्हणजे मला कळवा, मी त्यांस मुलकी खात्यांत नोकरीस लावीन असें बजावून गेला. या मिशनरी साहेबानें या मुलांना अशा रीतीनें २५ रुपये मदत शिक्षणाकरतां केली. पुढें नरसोपंतांची सहावीची परीक्षा पास होतांच त्या वेळीं एलिफन्स्टन हा धारवाड येथें कलेक्टर होता, तेथें ते त्यास भेटले. त्यानें त्या वेळच्या रत्नागिरीच्या क्रॉफर्ड कलेक्टरास शिफारसपत्र देऊन नरसोपंतांस रवाना केलें. तें पत्र पाहून क्रॉफर्ड साहेबानें तावडतोब नरसोपंतांची नेमणूक एका तालुक्यास केली. येथपासून वाईट ग्रहदशा संपून या कुटुंबास थोडथोडी ऊर्जितावस्था येऊं लागली. हल्लीं-प्रमाणें रेलवे वगैरेचीं प्रवासास साधनें त्या काळांत नव्हतीं हें लक्षांत घेतां नरसोपंतांस नोकरी मिळण्यास किती प्रयास पडले, परंतु वडिलांच्या पुण्याईमुळें त्यांचें काम खात्रीशीर कसें साधलें हें दिसून येईल. त्या काळींही गरीबीच्या स्थितींत अभ्यास करावा लागणाऱ्या विद्यार्थ्यांचा वर्ग होता व केवळ मराठी शिक्षण असलेल्या लोकांस नोकरी मिळण्याची अडचण असे हें विसरून चालणार नाहीं. हल्लीं इंग्रजी पदवीधरांची नोकरी मिळण्याबाबत जी परिस्थिति आहे तीच त्या वेळीं निव्वळ मराठी शिक्षण असलेल्या लोकांची होती.

गोविंदसुतांच्या मराठी शाळेंतील शिक्षणक्रमाबद्दल आणखी विशेष असें लिहिण्याजोगें कांहीं नाहीं. १८७९ च्या सुमारास रत्नागिरी येथें ते मराठी स्कूल फायनलचे परीक्षेस बसले व पहिले खेपेसच पास झाले. इंग्रजी अगर संस्कृत पाठशाळेंत ते कधींच गेले नाहींत. इंग्रजी शिक्षण मिळविण्याला बौद्धिक अनुकूलता पुष्कळ असली तरी सांपत्तिक स्थिति सर्वथैव प्रतिकूल होती, यामुळें इंग्रजी शाळेंत जाण्याचें ध्येय मनांत सुद्धां आणण्याची सोय नव्हती. इंग्रजी वर्तमानपत्रांतील ठळक मथळे व तारा वाचतां येण्याइतकें अथवा मुलकी खात्यांतील इंग्रजी प्रकरणें समजण्याइतकें इंग्रजी भाषेचें ज्ञान त्यांनीं मिळविलें होतें ही गोष्ट खरी. परंतु तें ज्ञान त्यांनीं पुढें स्वतःच्या प्रयत्नानें खाजगी रीतीनें मिळविलेलें होतें. मुलकी प्रकरणांतील इंग्रजी भाषेची त्यांच्या कानांना इतकी संवय झालेली होती कीं आम्ही वकील झाल्यानंतर सुद्धां एखाद्या मुलकी स्वरूपाच्या अर्जांत अपरिचितपणामुळें आम्ही एखादा चुकीचा शब्द घातला तर ते लगेच त्याऐवजीं अमुक पारिभाषिक शब्द पाहिजे असें बिनचुक सांगत असत. ती. नरसूबाबानंतर दोन वर्षांनीं परशुरामपंतांची मराठी सहावी इयत्ता पास झाली व त्या वेळीं त्यांचें वय अजमासें १७ वर्षांचें असेल.

परमार्थविचारमाला पृष्ठ ३७ वर दृष्टांतादाखल म्हणून गोविंदसुतांनीं एक चुटका दिला आहे त्याचा उल्लेख करून हा भाग संपवितों. “ लहानपणीं शाळेंत असतांना आम्हा लहान मुलांच्या मनांतून मास्तरांना कांहीं लेखी विनंति करावयाची होती. पण पहिल्यानें सही करावी कोणी हा पडला प्रश्न ! तेव्हां युक्ति निघाली कीं वाटोळया सह्यांचें चक्र काढावें. त्याप्रमाणें करून पत्र लिहिलें तेव्हां मास्तरांना पत्र लिहिण्यांत म्होरप्या कोण हें कांहीं उमगेना ! उघडच आहे, सर्वांच्या संघानें मिळून जें चक्र बनलें, त्याचा म्होरप्या म्हणजे सर्व चक्रच होय. ”

## विवाह

गोविंदसुतांचें लग्न त्यांच्या वयाच्या १५।१६ व्या वर्षीं म्हणजे शिक्षण पुरें होण्यापूर्वींच झालें. आमच्या मातोश्री ती. सौ. सावित्रीबाई या खेर्डी तालुके चिपळूण येथील रा. गणेश बापूजी शेंबेकर यांच्या कन्या होत. गणेशपंत शेंबेकर यांनीं अतिशय गरीब स्थितींतून स्वतःच्या मेहेनतीनें व कर्तबगारीनें वर डोकें काढलें होतें व शेती, सावकारी व परोपकारार्थ वैद्यकीही ते करीत असत. पुढें त्यांच्या चिरंजीवांनींही वडिलांचा धंदा दक्षतेनें व सचोटीनें वाढवून आज चिपळूण तालुक्यांत तरी पांढरपेशा वर्गांत अशा प्रकारचें धनधान्यसंपन्न घराणें दुसरें आढळणार नाहीं अशी ख्याति मिळविलेली आहे. आमचे सर्वांत वडील मामा रा. धोंडोपंत हे २॥ वर्षांपूर्वीं निवर्तले. ते घरची शेती व सावकारी सांभाळून असत. त्यांच्यापेक्षां धाकटे बंधू रा. पांडुरंग गणेश यांनीं ३० वर्षे मुलकी खात्यांत महालकऱ्याच्या दर्जापर्यंत नोकरी करून हल्लीं रत्नागिरीस सुखवस्तु पेन्शनर म्हणून असतात व सर्वांत धाकटे बंधु रा. सखाराम गणेश हे चिपळूण तालुक्यांत नामांकित वैद्य म्हणून प्रसिद्ध आहेत. सौ. सावित्रीबाईंचा जन्म शके १७८९ भाद्रपद शु॥ १० चा आहे, म्हणजे लग्नाचे वेळीं त्यांचें वय १०।११ वर्षांचें होतें व त्यांच्या व गोविंदसुतांच्या वयांत ५ वर्षांचें अंतर होतें. त्या काळांत आपल्या समाजांत बालविवाहाचीच चाल सर्वत्र रूढ होती व त्या रूढीला अनुसरूनच हा विवाह झाला.

## सत्समागम व सद्ग्रंथवाचन

गोविंदसुतांना परमेश्वरभक्तीचे आनुवंशिक संस्कार आईचें घराणें व वडिलांचें घराणें अशा दोन्ही बाजूंनीं प्राप्त झालेले होते याचा उल्लेख मागें

आलाच आहे. गोविंदसुतांचे आजे गणेशभक्त, वडील व मातोश्री दोघेही ईश्वरसेवेंत काळ घालविणारीं व आईचे वडीलही देवभक्तच व अखेर संन्यास घेतलेले. " बीज तसा अंकुर " हा न्याय सृष्टींत अबाधित आहे. भगवद्भक्त-कोटींत ज्यांची गणना झाली आहे असे गोविंदसुत अशा पुण्यपुरुषांच्या उदरीं यावे व लहानपणापासूनच भक्तिमार्गाकडे त्यांचा ओढा वळावा यांत नवल नाहीं. वयाच्या ८ व्या वर्षापासून समर्थांचा दासबोध ग्रंथ वाचण्याची गोविंदसुतांस आवड लागली. दररोज एक अगर निदान अर्धा दशक नियमानें वाचावयाचाच, त्याशिवाय झोंपीं जावयाचें नाहीं असा क्रम अव्याहत सुरू झाला. अशा रीतीनें दासबोधग्रंथाचीं गोविंदसुतांकडून १०।१२ वर्षांत किती पारायणें झालीं असतील याचा वाचकांनींच हिशोब करावा. १८८२ च्या मार्चमध्यें म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी गोविंदसुत आपला जिल्हा सोडून नगर जिल्ह्यांत नोकरीसाठीं गेले त्या वेळीं दासबोधाचे सर्व समास त्यांस मुखोद्गत झालेले होते व ज्ञानेश्वरीचेंही त्यांचें वाचन नित्य नियमानें चालू झालें होतें. कथा, कीर्तनें, पुराणें असतील तेथें श्रवणाचा लाभ घेण्यास लहानपणापासूनच गोविंदसुत उत्सुकतेनें जात असत. चिपळूण येथें अक्कल-कोटकर स्वामींचे एक शिष्य ह. भ. प. गोपाळबुवा केळकर हे मार्कंडीवर शके १७९६ च्या ज्येष्ठ महिन्यापासून एक मठ स्थापन करून राहात असत. तेथें रामनामसप्ताह, दत्तजयंती वगैरे अनेक उत्सव होत, त्या प्रसंगीं गोपाळ-बुवांचीं व इतर सद्भक्तांचींही प्रेमळ भजनें, कीर्तनें, निरूपणें वगैरे होत. या मठांत गोविंसुतांचें नेहमीं जाणें येणें असे व येथें येणाऱ्या सज्जनांच्या सहवासाचा लाभ घेतल्यावांचून गोविंदसुत राहात नसत. गोपाळबुवांच्या सहवासांत श्रीभद्भगवद्गीता व ज्ञानेश्वरी या ग्रंथांतील विचारही आत्मसात् करून घेण्याची गोविंदसुतांस गोडी लागली. गोपाळबुवा १४।१५ वर्षांपूर्वीं निवर्तले. या मठाबद्दल गोविंदसुतांस त्यांच्या ह्यातीपावेतों आदर असे. गोविंदसुत कोंकणप्रांतीं फिरतीवर गेले कीं प्रथम या मठांत पाऊल टाकून मूर्तीचें दर्शन घेऊन सर्व विचारपूस केल्याशिवाय राहात नसत. कित्येक प्रसंगीं तर अनेक दिवस मठांत मुक्काम करीत व तेथें राहून सर्व मित्रांस व आप्त मंडळींस भेटत असत. गोपाळबुवांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव दत्तबुवा ( यांचा मठ अलीकडे रत्नागिरीस आहे ) व हरीबुवा हे मठाची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें चालवितात. कै. गोपाळबुवा केळकर यांचें नमुनेदार चरित्र या मथळयाखालीं गोविंदसुतांनीं मुमुक्षु साप्ताहिकांत चार विस्तृत लेखांक लिहिलेले आहेत. पहिला लेख ८।१०।२० च्या मुमुक्षूंत आहे व शेवटचा लेख ५।११।२० च्या मुमुक्षूंत आहे. त्या लेखांवरून अगदीं लहानपणापासून तों अखेरपावेतों गोपाळबुवांविषयीं गोविंदसुतांच्या

अंत:करणांत किती पूज्यबुद्धि असे तें स्पष्ट दिसून येतें. गोविंदसुत लिहितात, " गोपाळबुवांच्या सत्संगतींत ज्या ज्या वेळीं मी असें त्या त्या वेळीं वेदांत-चर्चेच्या किंवा सिद्ध पुरुषांच्या वर्तनाबाबतींत त्यांच्या माझ्या बोलण्यांत पुष्कळ मतविरोध असत. तथापि त्यांच्याबद्दल माझ्या अंत:करणांत जी लहानपणापासून पूज्यबुद्धि वास करीत होती व अद्यापही आहे तिला त्या विरोधानें यत्किंचितही धक्का लागलेला नाहीं. त्यांच्या माझ्यामध्यें एका काळीं चर्चात्मक सुखसंवादाचा गमतीदार पत्रव्यवहार पुष्कळ झालेला आहे ! " गोपाळबुवा हे पुण्यासही १।२ वेळां गोविंदसुतांस भेटण्यास आलेले होते.

गोविंदसुतांच्या पूर्ववयांत ज्या अधिकारी सत्पुरुषांचा त्यांस सहवास घडला होता व ज्यांच्या वृत्तीचा व वर्तनाचा त्यांच्या अंतःकरणावर कायमचा ठसा उमटलेला होता अशा आणखी दोन सत्पुरुषांचा उल्लेख करून हा भाग संपवितों. पहिले सत्पुरुष मुरडुवें येथील ह. भ. प. धोंडोपंत आंबेकर हे होत. यांनीं क्षेत्रसंन्यास घेतलेला होता असें सांगतात म्हणजे ते आपला गांव सोडून कोठेंही कधीं जात नसत. परंतु त्यांचें वाचन व मनन जबर असे व संतांच्या ग्रंथांतील गूढ प्रमेयें स्वात्मानुभवानें मुमुक्षूंस सुबोधपणें उकलून दाखविण्याची त्यांची शैली चांगली असे. कित्येक आधुनिक विद्वानांना ज्या संतवचनांचा बरोबर अर्थ लागलेला नाहीं अथवा ज्या वचनांचा अर्थ अगदीं चुकीच्या पद्धतीनें आधुनिक विद्वान् लावतात त्या वचनांचा यथार्थ व निःसंदेह बोध धोंडोपंत यांच्या तोंडून मिळत असे असें त्यांचे दर्शनाचा व सहवासाचा लाभ घडलेले लोक सांगतात. दुसरे सत्पुरुष म्हणजे ताम्हनमळें तालुके चिपळूण येथील ह. भ. प. यदुबाबा गोखले. यांनीं १३ कोटी रामनामाचा जप केलेला होता व हे एक ईश्वरी साक्षात्कार मिळविलेले पुरुष आहेत अशी कोंकणप्रांतांत प्रख्याति होती. सांवर्डें येथें वर्षांतून २।३ खेपा तरी त्यांच्या होत असत व त्यांचीं रसभरित कीर्तनें व निरूपणें आम्ही आमच्या लहानपणीं ऐकलेलीं आहेत. सांवर्डें येथें दत्तजयंतीचे उत्सवास ते बहुधा दरसाल येत व त्या वेळीं त्यांचीं कीर्तनें होत. पारमार्थिक विषयांत या पुरुषाचा फार मोठा अधिकार होता यांत शंका नाहीं.

## नोकरीपूर्वीची उमेदवारी

परशुरामपंतांची मराठी सहाव्या इयत्तेची परीक्षा पास झाल्यावर ते कोठें तरी नोकरी पाहाण्याच्या उद्योगास लागले. घरच्या खालावलेल्या परिस्थितींत नोकरीशिवाय त्यांस दुसरा मार्गच नव्हता. निव्वळ मराठी शिकलेल्या मनुष्यास त्या काळांतही कांहीं तरी वशिल्याशिवाय नोकरी

मिळणें दुरापास्त असे. एल्फिन्स्टन साहेब हा त्या वेळीं कुलाबा जिल्ह्याचा कलेक्टर झालेला होता, सबब त्यास अलीबाग येथें जाऊन भेटण्याचें परशुराम-पंतांनीं ठरविलें. परंतु साहेबाची भेट अलीबागेस झाली नाहीं. तेथून माणगांव येथें दादांस जावें लागलें. साहेबानें सांगितलें कीं माझी बदली अहमदनगर येथें झालेली आहे व तेथें जाण्याचे तयारींत मी आहें. वाटल्यास मी अलीबाग जिल्ह्यांत दरमहा रु. २० ची जागा तुम्हांस देतों, परंतु मी हा जिल्हा सोडून गेल्यानंतर तुम्हांस प्रेमानें वागवून घेईल असा येथें कोणी नाहीं, करतां रत्नागिरी जिल्ह्याचा कलेक्टर वुड्लसन यास मी पत्र देतों व तो रत्नागिरी जिल्ह्यांत तुमची कोठें तरी सोय करून देईल. त्याप्रमाणें एल्फिन्स्टन साहेबाचें वुड्लसन साहेबास शिफारसपत्र घेऊन परशुरामपंत परत घरीं आले. एल्फिन्स्टन साहेबानें या वेळीं परशुरामपंतांस घरीं परत जाण्याचे वाटखर्चास म्हणून स्वतःचे पदरचे १० रुपये दिले. वुड्लसन साहेबाची भेट दापोली येथें झाली. परंतु त्यास दिलेल्या शिफारसपत्राचा फारसा उपयोग झाला नाहीं, कारण त्यानें परशुरामपंतांचें नांव चिपळूण कचेरींत उमेदवार म्हणून दाखल करण्यास परवानगी दिली इतकेंच. मुलकी कामाची माहिती तरी होईल व पुढें मागें पगारी नोकरी मिळेल या आशेनें परशुरामपंतांनीं चिपळूण कचेरींत उमेदवार म्हणून काम करण्यास सुरवात केली. १–१॥ वर्षपर्यंत उमेदवार म्हणून काम केल्यावर जसीदार तलाठी म्हणूनही कांहीं दिवस त्यांनीं काम केलें. परंतु या जिल्ह्यांत कायम नोकरी मिळण्याचा संभव दिसेना म्हणून हा जिल्हा सोडून दुसरीकडे कोठें तरी खटपट करावी असें परशुरामपंतांच्या मनांत आलें व एल्फिन्स्टनसाहेब हा त्या वेळीं अहमदनगर येथें कलेक्टर होता सबब प्रथम त्यास भेटावें असें त्यांनीं ठरविलें.

## अहमदनगर जिल्ह्यांत नोकरी

परशुरामपंत व रा. कमळाकर बल्लाळ जठार हल्लीं पेन्शनर सबरजिष्ट्रार मु. कान्हें तालुके चिपळूण असे दोघे इसम १८८२ च्या मार्चमध्यें चिपळूणहून बरोबर च निघून अहमदनगर येथें नोकरीच्या शोधार्थ आले. दोघेही चिपळूणच्या शाळेंत वर्गबंधु होते व या वेळीं दोघेही विशीच्या आंतबाहेर होते. या वेळेपावेतों दोघांनींही कोंकण प्रांताबाहेर पाऊल टाकलेलें नव्हतें व देशावरील भाषा, राहणी, रीतरिवाज वगैरे गोष्टीस उभयतांही अनभिज्ञ होते. या वेळची एक गमतीची आठवण गोविंदसुत सांगत असत. कोंकणांत पाऊस जास्त यामुळें सर्व घरें कौलारू अगर अन्य तऱ्हेनें आच्छादित असतात. परंतु देशावर

पाऊस थोडा यामुळें धाब्यांचीं घरें बऱ्याच ठिकाणीं असतात. अहमदनगरकडे आल्यावर या इसमांना धाब्यांचीं घरें जिकडे तिकडे पाहून मोठा अचंबा वाटला व या बाजूला नुकतीच एखादी वावटळ येऊन घरांचे वरचे मजले सगळे कोसळून पडले कीं काय अशी कल्पना मनांत आली! अहमदनगर येथें आल्यावर दोघेही इसम कलेक्टर एल्फिन्स्टन यास भेटले व त्यानें दोघांसही आपल्या कचेरींत उमेदवारांच्या जागा दिल्या. रा. कमळाकरपंत हे रत्नागिरीच्या नानल वकीलांचे मेहुणे म्हणजे रा. नानल यांची वडील बहीण ती. नरसूबाबा चिंचाळकर यांस दिलेली होती व धाकटी बहीण रा. कमळाकरपंत यांस दिलेली आहे. रा. कमळाकरपंत यांस पुढें गांव रजिष्ट्रारची नोकरी मिळाली व त्याच खात्यांत पुढें ते कारकून झाले व जरी ते निव्वळ मराठीच शिकलेले होते तरी त्यांच्या हुषारीमुळें कालांतरानें त्यांस सबरजिष्ट्रारची जागा कायमची मिळाली व त्या जागेवरच त्यांनीं बरींच वर्षें नोकरी केल्यावर पेन्शन घेतलें. रा. परशुरामपंत यांस बायजाबाईचें जेऊर तालुके नगर येथें दरमहा रुपये ५ वर व्हिलेज रजिष्ट्रार नेमण्यांत आलें. त्यानंतर ७।८ महिन्यांनीं त्यांची बदली मिरजगांव तालुके कर्जत येथें गांव-रजिष्ट्रारचे जागेवर झाली. येथें कांहीं महिने काम केल्यानंतर १८८४ सालचे सुमारास परशुरामपंतांची मुलकी खात्यांत कायमची नेमणूक दरमहा रु. १२ पगारावर झाली. १८८५ चे मार्च महिन्यांत त्यांची बदली राहुरी येथें मामलेदार कचेरींत कारकुनीच्या जागेवर झाली. याप्रमाणें नगर जिल्ह्यांत निरनिराळया मामलेदारकचेरींत नोकरी झाल्यानंतर परशुरामपंत यांनीं १८९१।९२ सालचे सुमारास आपली बदली पुणें जिल्ह्यांत करून घेतली. याप्रमाणें अहमदनगर जिल्ह्यांतील नोकरीची हकीगत आम्हांस रा. कमळाकरपंत जठार यांचेकडून लिहून आली त्याप्रमाणें दिली आहे. रा. कमळाकरपंत व गोविंदसुत यांचा परस्पर प्रेमाचा संबंध सख्ख्या भावांप्रमाणें होता. दोघेही अहमदनगर येथें नोकरीनिमित्त बरोबर आले; परंतु पुढें दोघांच्याही बदल्या निरनिराळया ठिकाणीं होत गेल्यानें त्यांच्यांत दूरपणा येत गेला तरी दर पंधरा दिवसांनीं एकमेकांचें पत्र एकमेकांस आलेंच पाहिजे व प्रत्यक्ष भेटीची संधि आल्यास ती एकमेकांनीं कधींही घालवावयाची नाहीं याप्रमाणें उभयतांचेंही वर्तन गोविंदसुतांच्या हयातीपर्यंत चाललें होतें.



## पुण्यास जाण्याची जबर इच्छा

अहमदनगर जिल्ह्यांतील नोकरीच्या मुदतींत वर्तमानपत्रें व मासिकें वाचण्याची गोविंदसुतांस विशेष आवड लागली. तालुक्याच्या व जिल्ह्याच्या

ठिकाणीं नोकरीवर असतांना मिळतील तेवढीं वृत्तपत्रें व मासिकें गोळा करून वेळांत वेळ काढून तीं ते वाचीत असत. तसेंच दासबोध, ज्ञानेश्वरी, संतांच्या अभंगांच्या गाथा यांचेंही वाचन दररोज चालूच असे. आयुष्यांतील पहिले दिवस कोंकणप्रांतांत गेलेले, यामुळें रत्नागिरी जिल्ह्यांतील वृत्तपत्रें हटकून मिळविल्यावांचून ते राहात नसत, परंतु त्या वेळीं पुण्यास विशेष नांवाजलेले बुद्धिमान् पुढारी बाळ गंगाधर टिळक, विष्णुशास्त्री चिपळूणकर, माधवरावजी रानडे वगैरेचे विचार समजून घेण्याची गोविंदसुतांच्या ठिकाणीं वाढती जिज्ञासा उत्पन्न झाली. पुण्यांतील व्याख्यानांचे अहवाल केवळ वर्तमानपत्रांत वाचून त्यांस समाधान वाटत नसे. पारमार्थिक वाङ्मय व प्रचलित विषयांवर वर्तमानपत्रीय लेख यांच्या वाचनांत जरी ते आवडीनें कांहीं वेळ घालवीत तरी त्यामुळें कचेरींतील मुलकी कामकाजांत त्यांच्याकडून कधींही कसुरी होत नसे व कोणी कसाही वरिष्ठ अधिकारी आला तरी काम करण्याच्या चोख व नियमित पद्धतीमुळें परशुरामपंतांवर प्रत्येक अधिकाऱ्याची ताबडतोब स्वाभाविक मर्जी बसत असे. अहमदनगर जिल्ह्यांत असतांना ज्या अनेक अधिकाऱ्यांच्या हाताखालीं गोविंदसुतांनीं काम केलें त्यांपैकीं पुष्कळांचीं नांवें ते आम्हांस सांगत असत व त्यांपैकीं कित्येक अधिकाऱ्यांच्या हाताखालीं पुनः पुणें जिल्ह्यांतही काम करण्याचा त्यांस प्रसंग आला असतां ते अधिकारी आपल्याबद्दल भरंवसा व अभिमान कसा बाळगीत असत याबद्दल गोविंदसुतांच्या तोंडून आम्ही ऐकत होतों एवढेंच नव्हे तर आम्ही वकील झाल्यानंतर त्यांपैकीं कांहीं जुन्या मुलकी अधिकाऱ्यांसमोर वकील या नात्यानें काम करण्याचे प्रसंग आले असतां त्यांच्या तोंडून गोविंदसुतांविषयीं प्रेमाचे उद्गार आम्हांस ऐकण्यास मिळत. अहमदनगर जिल्ह्यांत असतांना परशुरामपंतांस नेहमीं वाटत असे कीं जर पुणें जिल्ह्यांत व विशेषतः पुणें शहरांत आपली बदली होण्याचा योग आला तर आपल्या अत्यंत आवडीच्या वाचनव्यवसायाला चांगलाच अवसर मिळेल व त्यापासून आपकी बौद्धिक व मानसिक व आध्यात्मिक उन्नति होण्यासही मदत मिळेल. पुण्यांत ठिकठिकाणीं ज्ञानेश्वरीवाचनाचे अड्डे आहेत तेथें आपला प्रवेश करून घेतां येईल व मोठमोठ्या पुढाऱ्यांचीं व्याख्यानें ऐकण्यास मिळून आपणांस देशस्थितीचें चांगल्या तऱ्हेनें ज्ञान करून घेतां येईल असें त्यांस वाटे. " कोणत्याही गोष्टीबद्दल दृढ निश्चय असला म्हणजे ती साध्य करण्यास मार्गही निघतोच " अशा अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे त्याप्रमाणें थोड्याशा खटपटीनें हा हेतु साध्य करण्यांत गोविंदसुतांस यश आलें. नोकरींत गोविंदसुतांच्याच दर्जावर असलेला पुणें जिल्ह्यांतील एक कारकून त्याचें घर

नगर जिल्ह्यांत असल्यामुळें पुण्याहून नगरास येण्यास तयार होता, त्याच्याशीं पत्रव्यवहार करून वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या संमतीनें गोविंदसुतांनीं आपसांत एकमेकांच्या जागीं एकमेकांच्या बदल्या करून घेतल्या व अशा रीतीनें आपल्या अंतःकरणांतील अत्यंत आवडीच्या पुण्यपत्तनांत १८९१।९२ च्या सुमारास गोविंदसुत येऊन दाखल झाले व या शहरांत आल्या-नंतर त्यांस आपल्या आयुष्यांतील उच्चतम ध्येयें कशीं साध्य करून घेतां आलीं याचें आपणांस पुढें दिग्दर्शन होईल.



## पुण्यांतील वास्तव्य

गोविंदसुत प्रथम पुण्यास येतांच हवेली तालुक्याच्या मामलेदार कचेरींत कारकुनाच्या जागेवर रुजू झाले. १८८४ सालापूर्वींची त्यांची सर्व नोकरी ही कायम स्वरूपाची नसल्यामुळें सरकारी नोकरीच्या नियमाप्रमाणें पेन्शनसाठीं ती जमेस धरतां येत नाहीं. ३० वर्षें ही नोकरीची पुरी मुदत गणली जाते व त्या नियमाप्रमाणें १९१३।१४ सालींच त्यांस पेन्शन मिळावयास पाहिजे होतें. परंतु त्यांच्यासारख्या मुलकी कामांतील वाकबगार इसमानें आणखी शक्य तितके दिवस नोकरींत असणें इष्ट आहे असें वरिष्ठ अधिकाऱ्यांस वाटून ३।४ वर्षें नोकरीच्या मुदतींत त्यांस वाढ मिळून १९१६ सालीं म्हणजे वयाच्या ५५ व्या वर्षापर्यंत नोकरी करून मग त्यांस पेन्शन मिळालें. या नोकरीच्या मुदतींतील विशेष मौजेची गोष्ट ही आहे कीं एवढ्या २४।२५ वर्षांच्या अवधींत गोविंदसुतांस पुणें शहर सोडण्याचा व पुण्यांतील बिऱ्हाड मोडण्याचा कधींच प्रसंग आला नाहीं व ही गोष्ट त्यांच्या इच्छेस अनुसरून अशीच झाली. प्रथम कांहीं वर्षें हवेली कचेरींत, नंतर कांहीं वर्षें प्रांत ऑफिसांत व शेवटीं १५।१६ वर्षें कलेक्टर ऑफिसांत याप्रमाणें गोविंदसुतांची सर्व नोकरी पुण्यांतच झाली. १।२ वेळां जुन्नर वगैरे तालुक्यांतील मामलेदार कचेरींत त्यांच्या बदल्या झाल्या होत्या. परंतु तेथें रुजू होऊन महिना पंधरा दिवस होतात न होतात तोंच त्यांस पुण्यास आणण्याबद्दल वरिष्ठ अधिकारी शिफारस करीत व त्यांस तावडतोब पुण्यास परत यावें लागे, यामुळें पुण्याखेरीज बाहेर तालुक्याच्या ठिकाणीं त्यांस बिऱ्हाड करून राहण्याचा कधींच प्रसंग आला नाहीं. प्रस्तुत लेखक व त्याचे धाकटे बंधु कै. श्रीरामपंत या उभयतांसही आपलें हायस्कूलचें व कॉलेजचें शिक्षण पुण्यास बिऱ्हाडीं राहून पुरें करतां आलें हीही संधि या योगायोगामुळेंच मिळाली. नाहीं तर बाहेर तालुक्याच्या ठिकाणीं राहून

शिक्षणाचा व कॉलेजवसतिगृहाचा खर्च तेथून पुण्यास पाठवीत जाणें गोविंदसुतांस शक्यच नव्हतें. पेन्शन घेतल्यानंतरही १६ वर्षें म्हणजे १९३२ च्या जुलैपर्यंत गोविंदसुतांनीं पुण्यास आपल्या बिऱ्हाडाची जागा कायमच ठेविली होती व वर्षांतून जास्त दिवस ते पुण्यासच लेखनवाचनांत व पुण्याच्या उच्च बौद्धिक वातावरणांत संचार करण्यांत घालवीत. वडील चिरंजीव ( प्रस्तुतचे चरित्रलेखक ) १९१२ सालींच खानदेशांत वकिलीच्या धंद्यानिमित्त कायमचे जाऊन राहिले होते व धाकटे चिरंजीव कै. श्रीरामपंत हेही गोविंदसुतांनीं पेन्शन घेण्यापूर्वींच वऱ्हाडांत शिक्षणखात्यांत कायम नोकरीवर गेले होते. अशा स्थितींत १९१६ सालानंतर व्यावहारिक दृष्ट्या गोविंदसुतांस पुण्यास राहाण्याची कांहींच अवश्यकता उरली नव्हती. परंतु ज्या पुणें शहरांत नोकरीचीं २५ वर्षें घालविलीं त्याच पुणें शहरांत सेवानिवृत्त झाल्यानंतरही शक्य तितकीं वर्षें घालवावीं असा पुणें शहरांतील वास्तव्याचा त्यांस लोभ जडला, यामुळें शक्य तोंवर त्यांनीं पुणें सोडलें नाहीं व पुणें शहरानेंही म्हणजे तेथील त्यांच्या मित्रमंडळींनींही त्यांस पुणें सोडूं दिलें नाहीं. वर्षांतून कांहीं दिवस ते कोंकणप्रांत, मुंबई, खानदेश, वऱ्हाड वगैरेकडे फिरतीवर जात, अथवा तीर्थयात्रा वगैरे करण्यास जात, परंतु पुनः कायम मुक्काम पुण्यासच ठेवीत. तेथील बिऱ्हाडांत नेहमीं कोणीना कोणी तरी आप्तवर्गांपैकीं विद्यार्थी शिक्षणाप्रीत्यर्थ त्यांच्यापाशीं राहात असत.



## नोकरींतील दिनचर्या

सुमारें १८९९ सालापासून गोविंदसुतांच्या चरित्राबद्दल आम्हांस आमच्या प्रत्यक्ष माहितीवरून व आठवणीवरून लिहितां येण्याजोगें आहे. पहांटे ५-५॥ वाजण्याचे सुमारास ते उठत असत. सकाळीं उशीरां उठणें त्यांस कधींच माहीत नव्हतें. नोकरीवर असतांना ऑफिसांतील कामकाजाचें बरेंच मोठें दप्तर शिपायाबरोबर दररोज घरीं येत असे. पहांटे तास दीड तास बसून एकाग्र चित्तानें त्यापैकीं बरेंचसें काम ते आटोपीत असत. नंतर प्रातर्विधि, स्नान, संध्या, देवपूजा वगैरेमध्यें सुमारें एक तास जाई. नंतर सवड असल्यास राहिलेलें दप्तरचें काम पुरें करून ८॥ अगर ९ चे सुमारास ते घरांतून जे बाहेर पडत ते ११ वाजण्याच्या सुमारास परत येत. सकाळीं स्नान केल्याशिवाय घरांतून कधींही बाहेर पडत नसत. या दोन अडीच तासांच्या फेरफटक्यांत ते पुणें शहराच्या किती पेठा ओलांडून जात असत व या मुदतींत किती निरनिराळ्या कामांचे व्याप त्यांच्यामागें असत व ते सर्व कशा रीतीनें पुरे पाडीत असत, याचा कितीही तपशील दिला तरी अपुराच

पडेल व कित्येकांस तो खराही वाटणार नाहीं. दररोज तीन चार कोस फिरणें सहज व्हावयाचें व तें अगदीं निरलसपणें. या दररोजच्या फेरफटक्याचा गोविंदसुतांच्या शरीरप्रकृतीवर फार चांगला परिणाम झाला हें निर्विवाद आहे. या सकाळच्या फिरण्यांत तुळशीबाग, रामेश्वर, बेलबाग, कसब्याचा गणपती, जोगेश्वरी, ओंकारेश्वर वगैरे प्रसिद्ध देवालयांपैकीं सर्व अगर बरींचशीं वाटेंत लागावयाचींच व त्या वेळीं देवळांत जाऊन दर्शन घेऊन प्रदक्षिणा घालून मग पुढील रस्त्याचें आक्रमण होत असे. कधीं केसरी-कचेरींत अगर शिवरामपंतांच्या काळऑफिसांत जाऊन आठवड्यांतील सर्व वृत्तपत्रांचें निरीक्षण करीत व शिवरामपंतांकडून कांहीं मासिकें अगर अभिप्रायार्थ आलेलीं पुस्तकें घरीं वाचावयास आणीत, कधीं वासुकाकांच्या चित्रशाळेंत जात तर कधीं मुमुक्षुकचेरींत जाऊन पारमार्थिक वाङ्मयाचें आलोडन करीत, कधीं महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या दर्शनास जात तर कधीं विठ्ठलभक्त पांगारकर, ह. भ. प. विष्णुबुवा जोग अगर केशवराव महाराज देशमुख किंवा केशवशास्त्री दामले व अशा प्रकारची परमार्थ विचार-मार्गांतील जी जी मंडळी पुण्यास असल्याचें माहीत पडे त्यांचें दर्शन घेऊन त्यांच्या बैठकींत थोडाफार सुखसंवाद करून घरीं परत येत. नंतर दुपारचें जेवण आटोपून फार उशीर होतो असें दिसलें तरच टांग्यांतून ऑफिसला जात, नाहीं तर पायींच कचेरीचा रस्ता धरीत. घरापासून ऑफिस १-१॥ मैल लांब असे. हल्लींच्या तरुण पिढींतील फारच थोडे लोक गोविंदसुतांच्या दररोजच्या पायीं चालण्याच्या मजलेची बरोबरी करूं शकतील. शारिरिक श्रमाप्रमाणें बौद्धिक श्रमही ते अतोनात करीत व त्यांत त्यांस थकवा कधींही वाटत नसे. त्यांच्या बाबतींत विश्रांति म्हणजे कामाची अदलाबदल असा अर्थ असे. लँड रेव्हेन्यू कोड व वतन ॲक्ट हे दोन कायदे त्यांस मुखोद्गत होते व या बाबतींत सरकार ठरावांची आजतागायत माहिती त्यांस असे. अत्यंत भानगडीचीं व गुंतागुंतीचीं प्रकरणें नेहमीं परशुरामपंतांकडेच अभिप्रायार्थ अगर तजविजीस यावयाचीं. इंग्रजी प्रकरणें सुद्धां जरूर तर कोणाच्या मदतीनें वाचून यांनींच अभिप्राय तयार करून ठेवावयाचा. कनिष्ठ ऑफिसांतील कारकून लोक सुद्धां महत्त्वाच्या कामीं परशुरामपंतांचा सल्ला घेत असत व त्यांचा निर्णय म्हणजे बिनचूक असलाच पाहिजे असा सर्वांचा भरंवसा असे. जिल्ह्याच्या जमाबंदीचें आंकडेमोडीचें किचकट काम यांच्याकडेच यावयाचें. परंतु कोणत्याही कामाची थोड्या वेळांत बरोबर मुद्देसूद समजूत करून घेऊन बिनचूकपणें तें पार पाडण्यांत गोविंदसुतांचा हातखंडा असे. यामुळें सबंध पुणें जिल्ह्यांत मुलकी

कामाचा पूर्ण माहितगार व हुशार कारकून परशुरामपंतांइतका दुसरा कोणीही नाहीं अशी कित्येक वर्षें आम्ही त्याती ऐकत होतों. पुणें जिल्ह्यांतील ८ तालुके व ३ पेटे येथील मुलकी कचेरींत परशुरामपंतांचे हातचें कांहीं लिखाण आलें कीं " हा परशुरामाचा बाण आहे " असें सर्व कारकून लोक म्हणत व त्याचा अर्थ इतकाच असे कीं या प्रकरणाकडे बारकाईनें लक्ष दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. इतक्या वर्षांच्या नोकरींत गोविंदसुत द्रव्याच्या मोहांत कधींच सांपडले नाहींत, त्यामुळें अगदीं न्यायानें व सरळपणानें काम करणारे म्हणून मुलकी खात्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांपासून कनिष्ठांपर्यंत सर्वांस त्यांच्याबद्दल सारखाच आदर व वचक वाटत असे. ऑफिसांत काम करण्याची तडफ फार व कामाचा उरक चांगला, यामुळें आळसानें अगर कुचराईनें कोणतेंही काम दप्तरांत कधीं शिल्लक राहावयाचें नाहीं. सायंकाळीं कचेरींतून परत येतांना सार्वजनिक सभेंत अगर दुसरीकडे कोठें जाहीर व्याख्यान असेल तर थोडा वेळ तरी तेथें उभें राहून त्यांतील तात्पर्यार्थ ग्रहण करून घरीं यावयाचे. सायंसंध्या करून भोजनोत्तर एक तासभर तरी दासबोध, ज्ञानेश्वरी, संतांचे अभंगांचे गाथे यांचें वाचन नित्य चालत असे. या वेळीं कोणी श्रोते जिज्ञासेनें येत तेव्हां आमचेकडून ग्रंथ वाचून घेत व स्वतः सोप्या भाषेंत अनेक दृष्टांत देऊन विषय चटकदारपणें समजावून देत. बहुधा कोणीना कोणी तरी आवडीचा श्रोता नेहमीं असावयाचाच. रात्रौ एखाद्या चांगल्या कीर्तनकाराचें कीर्तन अगर धार्मिक प्रवचन असल्याचें समजल्यास तेथें गोविंदसुत हटकून जावयाचे व वेदांताची अगर अध्यात्म विषयाची पद्धतशीर मांडणी असेल तर त्यांत रंगून जात असत, परंतु केवळ भाकड कथा चालू आहे असें आढळल्यास वेळ वृथा न दवडतां परत येत. नाटक सिनेमादि प्रकारांना ते चुकून सुद्धां कधीं जात नसत. पुण्यास मुक्काम असतांना साधारणपणें वरीलप्रमाणें कार्यक्रम असे. कलेक्टर ऑफिसबरोबर फिरतीवर जाणाऱ्या मंडळींत परशुरामपंतांची निवड नेहमींच व्हावयाची, कारण त्यांच्याशिवाय ऑफिसचें महत्त्वाचें काम कधींच व्हावयाचें नाहीं. तालुक्यांतील कारकुनांच्या कामांची कसून तपासणी परशुरामपंतांकडूनच व्हावयाची व त्यांच्या कसोटीला उतरून त्यांचें प्रशस्तिपत्र मिळालें म्हणजे प्रत्येकाला बरें वाटे. फिरतीवर असतांना पोथीचा कार्यक्रम चालूच असे; परंतु प्रत्येक ठिकाणीं संतवाङ्मयाचे व परमार्थाचे भोक्ते कोण कोण आहेत याची बारीक छाननी होऊन त्यांच्या सहवासाचा लाभ घेतल्याशिवाय गोविंदसुत कधींही राहात नसत, मग त्या लाभासाठीं २।४ कोस पायीं जावें लागलें तरी त्याची त्यांस पर्वा नसे.

यासंबंधानें श्रीवासुदेवस्वामी धामणीकर यांच्या चरित्रांत गोविंदसुतांनीं एक प्रकारें आत्मचरित्रच लिहून ठेविलें आहे त्यापैकीं कांहीं मजकूर त्यांच्याच शब्दांत येथें देऊन हा भाग पुरा करतों. गोविंदसुत लिहितात, " १८९६।९७ सालीं फिरत्या नोकरीवर असतांना माझा जुन्नर रस्त्यावरील मंचर गांवीं कांहीं दिवस मुक्काम पडला. त्याच वेळीं सुदैवेंकरून वासुदेवबुवांचा मुक्काम दीड दोन मैलांवर अवसरी खुर्द गांवीं होता. यामुळें दररोज रात्रीं मंचरहून अवसरीला जावें, तीन तीन तास बुवांच्या कीर्तनश्रवणाचा लाभ घ्यावा आणि मंचरला परत यावें असा योग अनायासें जुळून आला. त्यानंतर मी सुमारें चोवीस वर्षें फिरत्या नोकरीवर असतांना दरसाल ज्या ज्या वेळीं खेड, शिरूर, जुन्नर या प्रांतांत फिरण्याचा मला प्रसंग येई त्या त्या वेळीं बुवांच्या दर्शनाचा, त्यांच्या कीर्तनाचा व संभाषणसुखाचा मनमुराद लाभ घेतां येत असे. "



## पारमार्थिक ध्येयाची सिद्धि

पुण्यास येण्यांत गोविंदसुतांच्या अंतरंगांतलि एक मुख्य हेतु असा होता कीं येथें आल्यावर पारमार्थिक दृष्टीनें आपणांस सत्संगतीचा लाभ होईल व आध्यात्मिक प्रश्नांसंबंधानें आपल्या अंतःकरणांतील सर्व शंका व तळमळी नाहींशा होतील. ज्ञानेश्वरी आणि दासबोध या ग्रंथांच्या खऱ्या रहस्याचें आकलन आपणांस चांगल्या रीतीनें झालेलें आहे असें गोविंदसुतांस वाटत असे, परंतु पुण्यास येईपर्यंत अध्यात्म विचारांची त्यांची बैठक असावी तशी स्थिर झालेली नव्हती. सद्गुरुमुखानेंच यथार्थ बोधाचें श्रवण झाल्याखेरीज व सद्गुरूकडून उपासना प्राप्त करून घेतल्याखेरीज अंतःकरणांत आत्मज्ञानाचा ठसा कायमपणानें उमटणार नाहीं असा त्यांच्या मनानें निश्चय केला व या दृष्टीनें पुण्यांत त्या वेळीं असलेले अध्यात्मचर्चा करणारे २५।३० आखाडे त्यांनीं धुंडाळून पाहिले, परंतु त्यांच्या अंतकरणाचें आत्यंतिक समाधान त्यांपैकीं कोणत्याही ठिकाणीं होऊं शकलें नाहीं. (तीस वर्षांपूर्वी अध्यात्मचर्चा करणारे २५।३० आखाडे पुण्यांत असत, परंतु आतां वावदूक मतभेदाच्या वितंडवादांचा व मताभिमानाचा आणि संस्थांचा सुळसुळाट झाल्यामुळें १।२ ठिकाणांखेरीज सर्व शुकशुकाट आहे, अशी माहिती धामणीकर बुवांच्या चरित्रांत गोविंदसुतांनीं दिलेली आहे.) परंतु " सर्व वेदांताचें आलोडन करून शुद्ध भूमिकेवर निःसंदेहपणानें स्थित असलेल्या अध्यात्मज्ञानसंपन्न " अशा कांहीं सत्पुरुषांचा सहवास त्यांस पुण्यपत्तनांत घडत गेला. अशा पुरुषांपैकीं एक पुरुष कै. वासुदेवराव

वैशंपायन हे होत. हे गृहस्थ प्रथम कलेक्टरकचेरींत कारकून होते त्या वेळीं गोविंदसुतांची व त्यांची ओळख झाली होती. नंतर आपल्या वडिलांच्या पश्चात् ते पुरंदऱ्यांचे कारभारी झाले. त्यांना वेदांताचा फारच नाद होता. ते पुण्यांतील कीर्तन पुराण एकही सोडीत नसत. शास्त्री, पंडित, वेदांती, धादांती, हल्लींचे आधुनिक तत्ववेत्ते या सर्वांच्या बुद्धिवादाचा ठावठिकाण, खोली, उंची त्यांनीं पूर्णपणें जाणलेली होती. त्यांच्याकडे गोविंदसुत कांहीं दिवस रात्रीं दासबोध वाचण्यास जात असत. सदरहू वैशंपायन यांस आम्ही लहानपणीं पाहिलेलें आहे व त्यांचें एक कीर्तन व निरूपणही आम्ही ऐकलेलें आहे. १९०० सालच्या सुमारास अल्पवयांत म्हणजे ३०।३२ वर्षांचे असतांनाच वैशंपायन निवर्तले. धामणीकर बुवांच्या चरित्रांतच ओघानें वासुदेवराव वैशंपायन यांच्याबद्दलही सर्व माहिती गोविंदसुतांनीं दिली आहे व त्यांत त्यांचा व आपला पारमार्थिक दृष्टया कशा प्रकारचा जिव्हाळयाचा संबंध होता याचेंही वर्णन त्यांनीं केलें आहे. सदरहू वैशंपायन यांच्याकडे दासबोध वाचण्याच्या वेळीं त्यांचे लहानपणाचे स्नेही पुण्यास हल्लीं पेन्शन घेऊन सुखवस्तु राहिलेले श्री. श्रीधर वामन ऊर्फ दिगंबरराव जोशी वकील पोलिस प्रॉसिक्यूटर हे येत असत. वैशंपायन व दिगंबरराव जोशी दोघांनाही पारमार्थिक शुद्ध विचारांची मनापासून अत्यंत आवड. दोघांचीही बुद्धिमत्ता दांडगी. उभयतांची विचार-भूमिका एक असे. पुण्यास आल्यामुळेंच ज्यांच्या सद्विचारांचा गोविंदसुतांस लाभ झाला असे हे दुसरे गृहस्थ होत. तिसरे सत्पुरुष म्हणजे वर वर्णन केलेले धामणीकर बुवा. हे " आचारशुद्ध व विचारशुद्ध असल्यामुळें दर्शनीय व संभाषणीय सत्पुरुष होते. " गोविंदसुतांचा व त्यांचा कशा प्रकारचा जिव्हाळयाचा संबंध होता हें सर्व वर्णन बुवांच्या चरित्रांत गोविंदसुतांनीं केलेलें आहे. वासुदेवबुवांची माहिती श्री. दिगंबरराव जोशी व वैशंपायन यांस गोविंदसुतांनीं सांगतांच त्यांनीं बुवांस धामणीहून पुण्यास आणविलें व त्यांचीं पुण्यांत पुष्कळ कीर्तनें करविलीं. ही गोष्ट १८९७।९८ सालची आहे. त्यानंतर १०।१२ वर्षांत बुवांच्या ५।७ खेपा पुण्यास झाल्या. " शास्त्रप्रचीति, गुरुप्रचीति व आत्मप्रचीति यांच्या एकवाक्यतेनें आपलाच स्वानंद, निजानंद, आत्मानंद आपणच सद्गुरुकृपेनें प्रगट करून भोगावयाचा आहे हें वासुदेवबुवा उत्कृष्ट रीतीनें प्रतिपादन करीत असत. " बुवांच्या विचारांची उच्च भूमिका व परमार्थाचें सुलभतेचें बालबोध प्रतिपादन याचें वर्णन बुवांच्या चरित्रांत गोविंदसुतांनीं विस्तारानें केलेलें आहे. वासुदेव-बुवांचा व गोविंदसुतांचा प्रथम परिचय इ. स. १८९५ सालीं झाला व त्यांच्या मार्फतीनेंच धोमवासी परमपूज्य विश्वनाथदादा पाटणकर ( ज्यांचें

चरित्र गोविंदसुतांनीं आत्मानुसंधान पुस्तकांत प्रारंभीं दिलें आहे ) यांचे उपासक ह. भ. प. दत्तात्रेय यशवंत बापट, पेन्शनर हेडमास्तर, हल्लीं मु. आवास जि. कुलाबा यांचा व गोविंदसुतांचा परिचय झाला. श्री. बापट व गोविंदसुत यांचें नातें गुरुबंधूंचें आहे. दोघेही वासुदेवउपासक. ही उपासना गोविंदसुतांस श्री. विश्वनाथदादा पाटणकर यांचे लेखक व सच्छिष्य रा. गोविंदबुवा वेल्हाणकर यांच्याकडून पुणें येथें इ. स. १८९५।९६ सालच्या सुमारास मिळालेली होती व गुरुवर्य बापट यांस ही उपासना पाटणकर यांच्या परंपरेंतील दुसऱ्या एका सच्छिष्याकडून मिळालेली होती. गोविंदसुतांचे नगर जिल्ह्यांतील नोकरीच्या वेळचे एक स्नेही कै. वामनराव गोरे यांच्या मार्फत सदरहू गोविंदराव वेलणकर यांचा गोविंदसुतांस शोध लागला. त्यांचीं प्रवचनें ऐकून गोविंदसुतांनीं त्यांचें शिष्यत्व स्वीकारलें व या अप्रसिद्ध परंतु आत्मसाक्षात्कारी पुरुषाच्या उपदेशापासून गोविंदसुतांची अध्यात्माची बैठक स्थिर झाली. सदरहू गोविंदबुवा वेलणकर हे १८९८।९९ चे सुमारास निवर्तले. परशुरामपंतांनीं "गोविंदसुत" असें जें टोपण नांव आपल्या लेखनाकरतां धारण केलें त्यांत आपल्या पित्याचा व गुरूचाही एकदमच उल्लेख व्हावा असा उद्देश होता. आम्ही स्वतः अध्यात्मविषयांत सर्वस्वीं अननुभवी आहों ही गोष्ट गोविंदसुतांचें प्रत्येक पुस्तक प्रकाशित करतांना प्रत्येक प्रस्तावनेंत नमूद करून ठेवलेली आहे. तथापि धामणीकर बुवांच्या चरित्रांत गोविंदसुतांच्या लेखांतून व अशाच इतर प्रेमी अधिकारी पुरुषांकडून जी माहिती मिळाली त्यावरून हा भाग आम्हीं लिहिला आहे व या भागांत उल्लेख आलेल्या सर्व सज्जनांच्या सहवासानें व कृपेनें आपण निःसंदेह होऊन आपल्या आयुष्याचें आपणांस पारमार्थिक दृष्ट्या सार्थक करतां आलें असें गोविंदसुत मानीत असत हें निश्चित आहे.



## फलज्योतिषाचा व्यासंग

गोविंदसुतांच्या स्नेही मंडळींत अनेकविध व्यवसायांतील लोकांचा भरणा होता. पुणें शहर म्युनिसिपालिटींत रा. दामुअण्णा ढेरे हे कारकून होते व त्यांचा फलज्योतिषावरील जबर व्यासंग पुण्यांत प्रसिद्ध आहे. १९०३।४ सालापासून रा. ढेरे यांचा व गोविंदसुतांचा विशेष परिचय झालेला होता. रा. ढेरे यांचें घर कसब्याचे गणपतीपाशीं आहे. वेळ फावेल तेव्हां गोविंदसुत हे रात्रीं रा. ढेरे यांजकडे दोन दोन तास बसत व अनेक कुंडल्यांची चर्चा करून फलज्योतिषाची माहिती घेत. धामणीकर बुवांच्या चरित्रांत गोविंदसुत

एके ठिकाणीं ओघानें लिहितात, " मला कांहीं ज्योतिष येत नाहीं व मी त्याचा अभ्यासही केलेला नाहीं. परंतु त्या वेळीं पुण्यांत प्रसिद्ध असलेले ज्योतिषी कै० दामुअण्णा ढेरे यांच्या संगतींत माझे कांहीं दिवस गेल्यानें बरेचसे आडाखे त्या वेळीं लक्षांत होते. दामुअण्णा निवर्तल्यावर संगति सुटली आणि ज्योतिषाचा नादही सुटला. " या लिहिण्यांत गोविंदसुतांच्या विनयाचाच बराचसा भाग आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं फलज्योतिषाचा व्यासंग सुरू झाल्यापासून ६०।७० वर्षांपासूनचीं सर्व जुनीं पंचांगें त्यांनीं गोळा केलीं होतीं व जन्मवेळेवरून शेंकडों लोकांच्या पत्रिका त्यांनीं तयार करून दिल्या आहेत व पत्रिका चुकीच्या आढळल्यास त्या दुरुस्त करून दिल्या आहेत. गोविंदसुत चार मंडळींत बसले कीं पांच पंचवीस पत्रिका त्यांच्यासमोर येऊन पडत असत व आपआपल्या ग्रहांचीं फळें लोक कुतूहलपूर्वक ऐकत असत. कित्येक वेळां पत्रिकांवरून गतगोष्टींचे ठोकताळे आश्चर्यकारक रीतीनें पटलेले आढळून येत. गोविंदसुतांनीं ज्योतिषविषया-वरील बरेचसे ग्रंथ स्वतः विकत घेऊन त्यांचा अभ्यास करून संग्रहीं ठेवलेले आहेत व त्यांच्या ज्योतिषाच्या बाडांत श्रीकृष्ण, श्रीरामचंद्र, युधिष्ठिर, अर्जुन, धर्मराज अशा पौराणिक पुरुषांपासून तों पेशव्यांच्या घराण्यांतील सर्व प्रसिद्ध पुरुष व हल्लींचे स्वदेशांतील व परदेशांतील सर्व राजकारणी पुरुष अशा सर्वांच्या कुंडल्या संग्रहीं ठेवलेल्या आढळतात. वेदांतविषयाच्या खालोखाल ज्योतिषविषयाबद्दल गोविंदसुतांचा जबर पत्रव्यवहार अनेक लोकांशीं चालत असे. लग्नसराईच्या दिवसांत अनेक मित्रमंडळी वधूवरांच्या पत्रिका त्यांच्या अभिप्रायासाठीं घेऊन येत व तेही निरलसपणें वेळ मोडून अभिप्राय देत असत. गोविंदसुतांनीं पैसे मिळविण्याचा धंदा म्हणून ज्योतिषाच्या ज्ञानाचा उपयोग करण्याचें मनांत आणलें असतें तर या धंद्यावर त्यांस शेंकडों रुपये मिळवितां आले असते. परंतु त्यांनीं कधींही फलज्योतिषाच्या ज्ञानाचा असा विक्रय केला नाहीं. कित्येक वेळां हे धंदेवाईक ज्योतिषी असतील असें समजून त्यांच्यासमोर लोक द्रव्य ठेवीत, परंतु तें द्रव्य ते साभार परत करीत. परमार्थविषयक लेखांत गोविंद-सुतांनीं ठिकठिकाणीं फलज्योतिषांतील आडाख्यांचे दृष्टांत देऊन विषय-प्रतिपादनाला चटकदारपणा आणला आहे. प्रपंचांत अनेक आधिव्याधींनीं ग्रस्त होऊन निराश झालेले कित्येक लोक चार समाधानपर विचार ऐकण्या-साठीं गोविंदसुतांकडे धांव घेत त्या वेळीं ते त्यांस समयोचित पारमार्थिक विचार सांगत अथवा तेवढ्यानें काम न झाल्यास फलज्योतिषदृष्ट्या एखाद्या वेळीं त्यांच्याशीं संभाषण करून त्यांस हुरूप आणीत. एकंदरींत

फलज्योतिषाचा व्यासंग गोविंदसुतांच्या आध्यात्मिक विचारसरणीला पोषक असाच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. गोविंदसुतांनीं अनेक ठिकाणीं आपल्या ग्रंथांत ज्योतिषशास्त्रांतील आडाख्यांचा उल्लेख केला आहे त्यांपैकीं नमुन्यादाखल २।३ उदाहरणें देऊन हा भाग संपवितों. आधिभौतिक सुधारणा, प्रस्तावना पान ४० मध्यें गोविंदसुत लिहितात, " लेखकाच्या पचंमस्थानीं गुरु असल्यामुळें जिकडेतिकडे ईश्वरपरायण मनुष्यें दिसावीं अशी त्याची तीव्र इच्छा असणें स्वाभाविक आहे. दशम म्हणजे राजकीय स्थानीं चंद्रयुक्त मंगळ असल्यामुळें लेखक हा न जहाल, न मवाळ, या कोटींतील असला तरी त्याला लोक स्वातंत्र्यसुख भोगीत असतांना पाहावें, असें मनापासून वाटणें, हा त्या मंगळाचा गुण असल्यानें स्वाभाविक आहे. अर्थात् हरिभजन आणि राजकारण व तदनुषंगानें चाललेल्या सर्व सुधारणा यासंबंधानें त्याला अंतःकरणापासून जें वाटत आहे, तें त्याच्या षष्ठस्थानीं बुध-शुक्राचा योग असल्यामुळें ग्रंथद्वारा सहज बाहेर पडत आहे. सर्व कर्माच्या दोऱ्या ग्रहाधीन असल्यामुळें ग्रंथकाराचें यांत कर्तृत्व कांहींच नाहीं!" रहस्यनिरीक्षण, प्रस्तावना पृष्ठ ८ मध्यें गोविंदसुत लिहितात, " ज्योतिष-शास्त्रदृष्ट्या पाहिलें तर रास ही चंद्रावर अवलंबून असते. चंद्र ही मनाची देवता आहे. अर्थात् लोकमान्यांची व आमची रास ऊर्फ मनोदेवता एकच आणि तीही मीन असल्यामुळें आमच्या मनांत लोकमान्यांबद्दल विरोध असणें शक्यच नाहीं. शिवाय राशीस्वामी गुरु लोकमान्यांच्या भाग्यस्थानीं असून आमच्या बुद्धींत आहे. ते उभयतां नवपंचमदृष्टीनें पाहात असल्यामुळें आमच्या बुद्धींत लोकमान्यांसंबंधानें विकल्प येणें शक्य नसून उलट त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि, आस्था व प्रेम इकडेच कांटा झुकणें स्वाभाविक आहे." परमार्थविचारमाला आवृत्ति २ री पृष्ठ ४९ येथें गोविंदसुत लिहितात " ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें हा काल ग्रहरूपानें आमच्या हाडामांसांत, सुखदुःखांत, लाभहानींत, पापपुण्यांत, धर्मकर्मांत, आप्तेष्टांत, संपत्तिसंततींत, जन्ममृत्यूंत इत्यादिकांत घुसून जखडून बसला आहे व आमच्या कर्मांच्या दोऱ्या हलवीत आहे. हाडांचा मालक रवि हा कुंडलींत सुधारला असेल तर मनुष्य हाडस असतो; स्नायु व शिर यांचा मालक शनि यांचा संबंध, सप्तम स्थान हें गुह्यांग आहे त्याच्याशीं असला कीं अंतर्गळाची व्यथा असते. अष्टमस्थान हें पश्चिमद्वार आहे, तेथें रवि, मंगळ, शनि, राहू यांचा संबंध असेल तर मूळव्याध असते. पंचमस्थानीं गुरूचा संबंध असेल तर बुद्धि वेदांताकडे धांव घेते. कर्मस्थानीं म्हणजे नवमस्थानीं शनि, राहु अगर केतु एकटा असल्यास योगाकडे, ब्रह्मचर्याकडे, तीर्थयात्रेकडे प्रवृत्ति असते.

पितृस्थानचा मालक अगर कारक रवि नीचीचा असल्यास दत्तकाचा योग येतो. असे अनुभव घेतलेले ठोकताळे किती तरी सांगतां येतील. यावरून एवढा सिद्धांत बसतो कीं आपल्या देहाचीं व देहापासून घडणाऱ्या कर्मांचीं सर्व सूत्रें ग्रहरूपानें म्हणा, कालरूपानें म्हणा विश्वंभराच्या हातीं आहेत आणि तीं नियमबद्ध आहेत." इ. इ.

## पत्नीवियोग

आमच्या मातोश्रींस शके १८३० आश्विन शु. १० ( इ. स. १९०८ ) रोजीं पुणें मुक्कामीं वयाच्या ४१ व्या वर्षीं देवाज्ञा झाली त्या वेळीं आम्ही मुंबईस सेकंड एल्. एल्. बी. चा अभ्यास करीत होतों व आमचे धाकटे बंधु कै. श्रीरामपंत इंग्रजी पांचवे सहावे इयत्तेत असतील. आम्हां दोन बंधूंपेक्षां दोन लहान बहिणी अविवाहित होत्या. आमच्यापेक्षां एक वडील बहीण व आणखी २।३ लहान भावंडें मातोश्रींच्या हयातींतच निवर्तलीं होतीं. २।३ महिन्यांपासून मातोश्री अस्वस्थ आजारी असल्यामुळें दर ८।१० दिवसांनीं आम्ही मुंबईहून पुण्यास येत होतों व दसऱ्याच्या सुट्टीनिमित्त आम्ही पुण्यास आल्यावर कांहीं तासांनीं पूर्ण शुद्धींत असतांना त्यांचें प्राणोत्क्रमण झालें, यामुळें मातोश्रींच्या अंत्य दर्शनाचें भाग्य आम्हांस लाभलें. सौ. सावित्रीबाई प्रपंचांत अतिशय दक्ष असत. त्यांच्या माहेरची मंडळी श्रीमंत असली तरी त्यांच्या मदतीची व आधाराची मुळींच अपेक्षा न धरतां आपला प्रपंच अगदीं गरिबींत काटकसरीनें कसा करावा या बाबतींत त्यांचें उदाहरण कित्ता घेण्यासारखें आहे. कायम नोकरीच्या सुरवातीस गोविंदसुतांस प्रथम १२ रुपये दरमहा पगार होता व १९०८ सालीं प्रपंच वाढल्या वेळीं दरमहा ४५ रुपयांपर्यंतच त्यांस पगारवाढ झाली होती. महिन्याचा पगार हातीं येतांच गोविंदसुत तो पत्नीच्या हवालीं करीत व आदा पाहून तिनें काटकसरीनें महिन्याचा खर्च चालवावा व जरूरीच्या वेळप्रसंगासाठीं त्यांतूनच दोन पैसे राखून ठेवावे. अशा रीतीनें प्रपंचाची बाजू तिनें उत्तम रीतीनें सांभाळलेली होती व यामुळें आपल्या पत्नीच्या हयातींत गोविंदसुतांस प्रापंचिक व्यवस्थेची काळजी कधींच करावी लागली नाहीं. आम्हांला समजूं लागल्यापासून सर्व बाजारहाट मातोश्री आमच्याकडूनच करून घेत असे व हिशोब वगैरे सर्व आम्हीच ठेवीत होतों. गोविंदसुतांनीं फक्त ऑफिसचें काम करावें व बाकी सर्व वेळ आपल्या आवडीप्रमाणें परमार्थचिंतनांत व इतर व्यवसायांत घालवावा असा क्रम चालू असे. पत्नीवियोगापासून गोविंदसुतांच्या पुढील आयुष्यक्रमांत एक प्रकारचा महत्त्वाचा फरक पडलेला

दिसून येतो. पत्नी असतांना प्रापंचिक गोष्टींत त्यांचें चित्त विशेष गढलेलें असे असें मुळींच नाहीं. परंतु पत्नीवियोगानंतर त्यांची प्रापंचिक बाबतींत विन्मुखता व उदासीनता विशेष दिसून येई एवढें मात्र खरें. मुलींच्या लग्नाच्या जबाबदारींतून मोकळें होईपर्यंत सरकारी नोकरी करावयाची व नंतर राहिलेलें आयुष्य परमार्थचिंतनांत, परोपकारांत व आत्मोन्नतींत घालवावयाचें असा त्यांनीं अंतःकरणांत निश्चय केल्याचें दिसतें व त्या निश्चयाप्रमाणें त्यांनीं आपला पुढील आयुष्यक्रम पार पाडला.



## लेखनव्यवसायाला सुरवात

गोविंदसुतांच्या परमार्थविषयक लिखाणाला प्रारंभ १९११ सालापासून म्हणजे वयाच्या ४९ व्या वर्षापासून झाला व प्रथम मुमुक्षूंतून त्यांचे लेख " गोविंदसुत " अशा नांवानें येऊं लागले. गोविंदसुतांच्या आयुष्याचे ४८ व्या वर्षअखेर एक व त्यापुढें ७२ व्या वर्षापर्यंत दुसरा असे स्थूलमानानें दोन स्वतंत्र विभाग करण्यास हरकत नाहीं. ४८ व्या वर्षापर्यंत आपलीं प्रापंचिक कर्तव्यें उत्तम तऱ्हेनें पार पाडून त्याबरोबरच तीन तपांच्या संत-वाङ्मयाच्या दृढ अभ्यासानें त्यांचें अंतरंग परमार्थविचारांतही चांगलेंच रंगून गेलें होतें व मुरलेलें होतें. आपण लेख लिहून जगासमोर लेखक म्हणून पुढें यावें व प्रसिद्धी मिळवावी अशी त्यांची केव्हांच इच्छा नव्हती अथवा आपल्या लेखांनीं आतां जगास आपण उपदेश करून जगाचा उद्धार होणार आहे किंवा जगाची कांहीं सुधारणा करून आपण जगाचें कल्याण करणार आहों अशा अहंकाराची भावना त्यांच्या मनास कधींच शिवली नाहीं. त्यांच्या अंतरंगांतील विचारांचे तरंग लेखणींतून कागदावर उमटविण्यास ह. भ. प. पांगारकर हेच मुख्यतः कारण झाले हें निःसंशय आहे. तथापि मुखानें नामस्मरण करावयाचें त्याऐवजीं लेखणीनें भगवंताचें स्मरण करावयाचें व आपल्या मनाशीं चाललेले विचार आपल्या स्वतःच्याच आवडीसाठीं व स्वतःच्याच मननासाठीं व उन्नतीसाठीं लिहून काढावयाचे अशा भावनेनेंच ही विचारमाला गुंफण्यास सुरवात झाली. परमार्थविचारमाला आवृत्ति पहिली पृष्ठ ३० वर गोविंदसुत " माला " शब्दावर कोटी करून विनोदानें लिहितात, " पण मी हें एवढें अकांडतांडव करून ही माला कोणाकरतां म्हणून निर्माण केली याचा उलगडा ' परमार्थविचारमाला ' या नांवांतूनच होत आहे ! हा परमार्थविचार कोणाकरतां आहे ? तर ' माला ' म्हणजे माझा मलाच ! माझ्या अंतःकरणांत जें अहं आणि ममत्व भरलें आहे त्यालाच हे पारमार्थिक विचार वारंवार सांगावयाचे आहेत. कारण, हा सर्व संसार त्या

अहंममत्वांतच भरलेला आहे म्हणून त्यालाच जागृति द्यावयाची आहे. नाहीं तरी कोण कोणाला काय सांगणार आणि त्याचा कोणाला काय उपयोग होणार ? आपल्या मनाशींच विचार करावयाचा आहे. समर्थांनीं तरी आपल्या मनालाच उपदेश केला आहे." आपल्या लेखनव्यवसायाची मीमांसा खुद्द गोविंदसुतांनींच आत्मानुसंधानांत पृष्ठ ३ वर दिली आहे ती फार सूचक व बोधप्रद आहे. ते लिहितात, "माझा लहानपणापासून काळयाचे पांढरे होण्यापर्यंतचा जवळजवळ तीन तपें काळ केवळ लेखणीनें पांढऱ्यावर काळें करून पोटाची खळगी भरण्यासाठीं परवशतेच्या तिखट पाशांत जाऊन शेवटीं पेन्शनीचा काळ आला आणि आतां फक्त शेवटचा काळ येण्याचा राहिला आहे ! पांढऱ्यावर काळें करण्याला जिनें सतत आपलें काळें तोंड करून घेऊन जन्मभर मदत करून शेवटीं अंतकाळापर्यंत खुशाल हरिहरि म्हणून काल कंठण्याला पेन्शन करून दिलें त्या लेखणीला सोडून भजनपूजनांत काळ घालविण्याकडे प्रवृत्ति होणार कशी ? शिवाय आपण लेखणी हरिचरणीं वाहिली तरी ती थोडीच स्वस्थ बसणार ? तिला दुसराच कोणी हरीचा लाल भेटून लिहीतच बसणार ! आपल्याला तरी लहानपणापासून लवलव लिहिण्याची लागलेली लकब लागलीच लोपून लयाला जाणार कशी ? म्हणून ज्या लेखणीनें आजपर्यंत पोटोबाची सेवा केली त्याच लेखणीनें आतां विठोबाची सेवा यथामति करावी आणि लेखनाच्या लहरींत हरिगुणलीला लिहून हरीला लेखांतून मुखांत आणून त्याच्या चिंतनानें सुखांत राहावें या हेतूनें लेखणीनें देवाचें चिंतन करीत आहे ! "



## गोविंदसुत कोण

वर्ष दोन वर्षपावेतों गोविंदसुतांची लेखमाला मुमुक्षूंतून चालूच होती. समर्थांचे शिष्य 'दिनकर' यांचा 'स्वानुभव दिनकर' ग्रंथ गोविंदसुतांनीं वाचला, त्यांतील मतामतांच्या गलबल्याचा उतारा देऊन तात्पर्यार्थेही गोविंद-सुतांनीं मुमुक्षूंत दिला; येथपासून पहिला लेख सुरू होऊन आत्मशोधन, ज्ञानोत्तर भक्ति, उपासना, वैराग्य वगैरे एकापेक्षां एक सरस असे अनेक लेख येऊं लागले व उपासनेच्या दृढतेमुळें आध्यात्मिक विषयांत त्यांची लेखणी जास्तच रंगत गेली, तेव्हां 'गोविंदसुत' कोण अशी जिज्ञासा वाचकांस होऊन पुष्कळ लोक त्यांच्या नांवाची चौकशी करूं लागले त्यांस १८।१।१९१२ च्या मुमुक्षूंत गोविंदसुतांनीं पारमार्थिक भाषेंत जें विनोदी व मार्मिक उत्तर दिलें आहे तें पुनः थोड्या संक्षेपानें येथें देण्याचा मोह

आम्हांस आंवरत नाहीं. गोविंदसुत लिहितात, “ माझ्या नांवाची कित्येक प्रेमळ वाचक पृच्छा करीत असल्याचें समजल्यावरून मी त्यांचा आभारी आहें, परंतु हें ऐकून अनेक विचार माझ्या मनांत येऊन मौज वाटली ! (१) समुद्रकांठीं लांबून एक पदार्थ येत होता, तें गलबत असावें अशा आशेनें व्यापारी वाट पाहात होता, जरा जवळ आल्यावर ती होडी आहे असें वाटलें, परंतु अगदीं जवळ आल्यावर तो लांकडाचा ठोकळा आहे असें पाहून निराशा झाली. तद्वतच माझें नांव समजल्यावर निराशा होईल म्हणून अभावाचा भोंपळा फोडण्यापेक्षां तो कायम ठेवण्यांतच मौज आहे. ( २ ) मी कांहीं साधु, जपी, तपी, संन्याशी, विद्वान्, योगी नाहीं. एक प्रापंचिकच असल्यामुळें अशाच्या क्षणिक देहाच्या क्षणभंगुर नांवांत काय अर्थ आहे ? ( ३ ) मी जो विषय आपल्यापुढें ठेविला त्यांत गोडी नाहीं. आपण आपलेपणानें त्या विषयाला गोडी आणीत असतों. या न्यायानें प्रिय वाचकांनीं स्वस्वरूपाच्या गोडीनें माझ्या लेखाला गोडी आणली आहे ! ( ४ ) पुरुष प्रकृतीच्या संयोगांत उत्पन्न झालेल्या पुरुषानें मी नुसताच पुरुष म्हणणें वेडेपणाचें नाहीं काय ? लेखकवाचकांच्या संयोगांतच उत्पन्न झालेल्या लेखकास स्वतंत्र नांव कोठून असणार ? लेखकवाचकांची इच्छा हेंच त्याचें नांवरूप ! ( ५ ) स्वरूपाच्या अनुभवानें प्रियवाचक गोविंदसुतास भेटूं इच्छित असल्यास समर्थ म्हणतातः— तुम्हां आम्हां मुळीं झाली नाहीं तुटी। तुटीविण भेटी इच्छितसां ॥ ( ६ ) छत्तीस तत्त्व प्रकृतीकडून पाहिलें तर “ बांधली आहे तो गांठोडी । जो कोणी विचारें सोडी । विचार पाहातां गांठोडी । आढळेना ॥ ” या न्यायानें कोणत्या तत्त्वांवर बोट ठेवून नामधारी दाखवावा ? ( ७ ) ‘ विश्वरूप परिपूर्ण । अवघा एकचि नारायण । ’ त्या परिपूर्ण विश्वाहून गोविंदसुत वेगळा राहिला काय ? किंवा नारायणाच्या एका नामाचें वजन करण्याकरतां सर्व विश्वरूप दुसऱ्या ताजव्यांत घातल्यावर नामरूपातीत, विश्वातीत असें जें कांहीं मग राहिलें त्याहून तरी गोविंदसुत वेगळा राहूं शकेल काय ? नसेल तर वाचकांनीं आपल्याच नांवाचा शोध करीत करीत आपला थांग लावला असतां गोविंदसुत व प्रिय वाचक यांत भेद आहे काय ? अनेक उद्भवलेल्या विचारांपैकीं ही स्नेहसंवर्धक सप्तपदी आत्मज्योत पेटवण्यासाठीं वाचकांस अर्पण करून परमात्मपदीं लीन होतों. ”

## परमार्थविचारमालेची प्रसिद्धी

मुमुक्षूंतून दीड वर्ष चाललेली लेखमाला अनेक वाचकांच्या आग्रहास्तव पुस्तकरूपानें छापण्याच्या दृष्टीनें मजकुरांत थोडा फार फरक करून व कित्येक

ठिकाणीं प्रकरणें मागें पुढें करून शके १८३५ ( इ. स. १९१३ ) मध्यें " परमार्थविचारमाला " या नांवानें प्रसिद्ध करण्यांत आली. १५०० प्रतींची पहिली आवृत्ति ३।४ वर्षांत खलास होऊन कांहीं वाचकांच्या मागण्या चालूच राहिल्या यावरून जनतेनें या पुस्तकाचें प्रेमानें स्वागत केलें हें उघड दिसतें. केसरी ( ११।११।१३ ), मुमुक्षु ( ६।११।१३ ), श्रुतिबोध, ज्ञानांजन, महाराष्ट्र इत्यादि वर्तमानपत्रें व मासिकें यांच्या विद्वान् संपादकांनीं व सुप्रसिद्ध विद्वद्वर्य प्रो. शि. म. परांजपे यांनीं ( चित्रमयजगत् दिसेंबर १९१३ ) अनुकूल अभिप्राय देऊन प्रेम व्यक्त केलें. वेदांतरत्न सुप्रसिद्ध प्रो. रा. द. रानडे एम्. ए. यांना तर ही विचारमाला फार प्रिय होऊन ते आपल्या परमप्रिय मातोश्रींना ती नित्य वाचून दाखवीत असत. या पुस्तकावर अत्यंत प्रतिकूल अभिप्राय फक्त विविधज्ञानविस्ताराच्या १९१५ च्या ऑक्टोबरच्या अंकांत आला आहे व तो 'गच्चीवरील गप्पां' चे कर्ते विद्वद्वर्य ना. गो. चाफेकर यांनीं लिहिला आहे व या लेखाला ज्ञानांजनच्या १९१५ डिसेंबरच्या अंकांत वेदांतप्रवीण कै. रामकृष्ण वासुदेव बर्वे, बी. ए. यांनीं परभारें उत्तरही दिलें आहे. परमार्थविचारमालेच्या कांहीं प्रकरणांतील पृष्ठेंच्या पृष्ठें तोंडपाठ करून त्यांच्या आधारानें आपल्या कीर्तनाचा पूर्वरंग उत्कृष्टपणें सजविणाऱ्या कित्येक कीर्तनकारांचीं कीर्तनें आम्हीं ऐकलीं आहेत. त्याचप्रमाणें परमार्थविचारमालेची पहिली आवृत्ति खलास झाल्यावर महाराष्ट्रांतील कांहीं नामांकित कीर्तनकारांनीं गोविंदसुतांकडे येऊन त्यांच्या खाजगी प्रतीवरून पृष्ठेंच्या पृष्ठें मजकूर हातानें उतरून घेऊन आपल्या बाडांत संग्रहीं ठेवलेला असल्याची आम्हांस माहिती आहे. सुमारें ५०० पानांची ही लेखमाला मुमुक्षूंत चालू असतांना व त्यानंतर ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत असतांना गोविंदसुत हे कलेक्टर कचेरींत खर्डेघांशीची नोकरी करीत होते व ती नोकरी सांभाळून मुमुक्षूच्या प्रत्येक आठवड्याच्या अंकांत नियमितपणें मजकूर लिहून देण्यांत कधींही खंड पडला नाहीं हें लक्षांत घेण्याजोगें आहे. १९११ च्या डिसेंबर महिन्यांत आम्ही पुण्यास प्लेगनें अत्यवस्थ आजारी होतों. त्या वेळीं ऑफिसचें काम, घरांतील प्रापंचिक काम व आमची वेळच्या वेळीं औषधपाण्याची व्यवस्था इतक्या सर्व गोष्टी सांभाळून आमच्या उशाशीं बसून अत्यंत स्थिर बुद्धीनें मुमुक्षूंतील कांहीं लेख गोविंदसुतांनीं लिहिले आहेत याचा उल्लेख करणें अवश्य आहे. पुस्तकाचें काम चालू असतां व तें बाहेर पडल्यावर मुमुक्षूंतील गोविंदसुतांच्या लेखांस कांहीं दिवस खंड पडला होता. त्या वेळीं अनेक वाचक मुमुक्षुकारांस आग्रहानें लिहीत कीं गोविंदसुतांना आणखी लेख लिहिण्यास

लावा. त्याप्रमाणें मधून मधून मुमुक्षूंत लेख येतच असत. परंतु सेवानिवृत्त होईपर्यंत गोविंदसुतांनीं आपलें नांव कोणत्याच लेखांत प्रगट केलें नाहीं. पेन्शन घेतल्यानंतर गोविंदसुतांनीं १९१७ सालीं 'रहस्य-निरीक्षण' हा आपला दुसरा ग्रंथ प्रसिद्ध केला त्या वेळीं यांनीं आपलें समग्र नांव या ग्रंथाच्या मुखपृष्ठावरच प्रगट केलें आहे.

## रहस्यनिरीक्षणाचें प्रकाशन

परमार्थविचारमालेप्रमाणेंच रहस्यनिरीक्षण हा सुमारें ३०० पानांचा ग्रंथही क्रमशः मुमुक्षूंतून प्रथमतः प्रसिद्ध होत गेला व बोलून चालून ही टीकात्मक व खंडणपर लेखमाला असल्यामुळें व वर्तमानपत्रांत आगाऊ प्रसिद्ध होऊन तिची वाफ अगोदरच निघून गेली असावी असें वाटल्यामुळें हे लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा मुळींच इरादा नव्हता. परंतु हे लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध व्हावे अशा सूचना बऱ्याच वाचकांकडून आल्या व कित्येकांनीं आगाऊ ग्राहक होऊन व इतर लोकांकडूनही आश्वासनें मिळवून देऊन प्रकाशनास प्रोत्साहन दिलें, तथापि भीतभीत १००० प्रतींचीच आवृत्ति काढली. परंतु अनपेक्षितपणें १।२ वर्षांतच सर्व प्रती खलास होऊन त्यानंतर एकसारख्या चालू असणाऱ्या असंख्य मागण्यांस नाइलाजानें नकार कळवून नाराज करावें लागलें. या ग्रंथावरही वर्तमानपत्रांतून व मासिकांतून अनेक अनुकूल व प्रतिकूल अभिप्राय आले व कित्येक वादविवादात्मक सभांतून कोणी या पुस्तकाचा आधार घेत तर कोणी या पुस्तकावर तुटून पडत. गीतारहस्याचें खंडण अगर मंडण चालू आहे व त्यांत गोविंदसुतांच्या टीकाग्रंथाचाही उल्लेख होत आहे अशा कित्येक चर्चात्मक वादळी सभांस गोविंदसुत हजर असण्याचाही योग येई व त्यांस भाषण करण्याबद्दल कधीं आग्रहही होत असे. परंतु जाहीर सभांतून वक्तृत्व त्यांनीं कधींच केलें नाहीं. नोकरींत असतांनाही लेखक म्हणून त्यांची प्रसिद्धी पुष्कळ झाली होती, परंतु त्या वेळीं त्यांस जाहीर सभांत भाग घेण्यास कोणी आग्रह करीत नसत हें स्वाभाविक आहे. परंतु आतां सेवानिवृत्त झाल्यावर व रहस्यनिरीक्षणांत स्वतःचें नांव प्रगट केल्यावर त्यांस वस्तुतः जाहीर सभांतून भाषण करण्यास हरकत नव्हती. वक्तृत्वकला त्यांस अगदींच पारखी होती असें नाहीं. १०।५ लोकांच्या खाजगी बैठकींत अध्यात्मावर चर्चा करून निरूपण करणें ही गोष्ट तर त्यांच्या दररोजच्या व्यासंगापैकीं होती. परंतु ज्या ठिकाणीं विविध हेतूंचे व विविध प्रकारच्या अधिकाराचे लोक जमतात त्या ठिकाणीं अध्यात्मचर्चा करणें अप्रशस्त अशा समजुतीनें जाहीर

सभांतून भाषण करण्याचा व वादविवाद करण्याचा आपल्या सर्व आयुष्यांत गोविंदसुतांनीं कधींच प्रयत्न केला नाहीं. अमळनेर येथें ह. भ. प. पांगारकर यांच्या एका जाहिर व्याख्यानाचे वेळीं त्यांस येथील रहिवाशांनीं आग्रह-पूर्वक अध्यक्ष केलें होतें व नाशिक येथें एका प्रसंगीं त्यांचें प्रवचन झाल्याचें वृत्तपत्रांत आम्हीं वाचलें होतें याखेरीज जाहिर सभांत त्यांनीं कधींच तोंड उघडल्याचें आम्हांस माहीत नाहीं. लेखनद्वारा विचार मांडण्याची गोष्ट थोडी भिन्न असते. ज्या जिज्ञासूला त्या विषयाची गोडी असेल तोच सहसा त्या विषयावरील लेख बारकाईनें वाचणार. सभेला कित्येक लोक शुद्ध करमणुकीसाठीं जमतात, त्याप्रमाणें केवळ करमणुकीसाठीं कोणीही अध्यात्मासारख्या गंभीर विषयावरील लेखांकडे सहसा वळणार नाहीं. तथापि विनोदी गोष्टी व चटकदार दृष्टांत यांचा आश्रय करून वेदांतासारख्या गहन विषयाचेंही प्रतिपादन गोविंदसुतांनीं आपल्या लेखनशैलीनें सामान्य वाचकांसही आकर्षक केलें होतें यांत शंका नाहीं. केसरीनें आपल्या अभिप्रायांत एकदां लिहिलें होतें कीं गोविंदसुतांच्या पुस्तकांतील प्रसंगोपात आलेले दृष्टांत व चटकदार गोष्टी एवढ्याच निवडून एकत्रित केल्या तरी त्या वाचनीय होतील. नाटकें व कादंबऱ्याच वाचण्याचा शोक असलेल्या एका वाचकानें एकदां रहस्यनिरीक्षण पुस्तक व्ही. पी. नें मागविलें. पुस्तक उघडून पाहातांच त्यानें गोविंदसुतांस पत्र लिहिलें कीं रहस्यनिरीक्षण ही एक शृंगारिक कादंबरी असेल अशी पुस्तकाच्या नांवावरून समजूत झाल्यामुळें आम्ही पुस्तक मागविलें परंतु त्यांत निराळाच विषय निघाला व त्यांत आमची गति मुळींच नाहीं तरी पुस्तक परत घ्याल काय ? आम्ही त्यांस लिहिलें कीं अशा प्रकारची दिशाभूल होण्याजोगी जाहिरात आम्हीं कोठेंच दिली नव्हती, तथापि आपण पुस्तक वाचण्याचा प्रयत्न करा व आपणास त्यांत कांहींच गोडी वाटण्याजोगी नसेल तर आम्ही परत घेण्यास तयार आहों व किंमतही परत देऊं. यानंतर पुस्तक आमचेकडे परत आलें नाहीं. लोकशिक्षण मासिकाच्या जून १९१८ च्या अंकांत विद्वद्वर्य श्री. न. चिं. केळकर यांनीं ‘रहस्य-निरीक्षणाचें निरीक्षण’ या शीर्षकाखालीं या पुस्तकाच्या गुणदोषां-बद्दल विवेचनात्मक असा एक सुंदर लेख लिहिला आहे त्यांतील उतारा देऊन हा भाग संपवितों. श्री. तात्यासाहेब केळकर लिहितात, “गीतारहस्यावर आजवर अनेक टीकात्मक लेख लिहिले गेले आहेत, पैकीं कांहीं अंधभक्तांनीं अतएव सर्वस्वीं स्तुतिपर व कांहीं अंधविरोधीयांनीं लिहिलेले अतएव केवळ निंदापर असे आहेत....गोविंदसुत यांचें रहस्यनिरीक्षण हा अंधभक्तीचा किंवा अंधविरोधाचा परिणाम नाहीं ही गोष्ट या टीका ग्रंथासंबंधानें प्रथमच लक्षांत

येते....गोविंदसुत यांनीं हा जो टीका ग्रंथ लिहिला त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणेंच योग्य आहे....स्तुति करण्यांत ते जितके मर्मपटु आहेत तितकेच प्रतिकूल टीकेचा हल्ला चढवितांना त्यांना निष्ठुर होतां येतें. इंग्रजी ग्रंथांच्या परिशीलनानें येणाऱ्या आगंतुक विद्वत्तेचा जरी त्यांच्या ठिकाणीं कोठें मागमूसही दिसत नाहीं, तसेंच संस्कृत भांडाराशींही जरी त्यांचा विशेष परिचय दिसत नाहीं तरी वेदांतज्ञानांत ते पुरे मुरलेले असले पाहिजेत असें त्यांच्या कोणत्याही ग्रंथवाचकांस कबूल करावें लागेल. समर्पक उपमा व दाखले देणें व मधून मधून हळूच लौकिक गोष्टी सांगून सिद्धांत पटविणें या कामीं लेखकाची चतुराई विशेष दिसून येते....गीतारहस्यकारांशीं दोन हात करण्याचें धैर्य व आत्मविश्वास रा. चिंचाळकर यांनीं बाळगिला व दीर्घ परिश्रमानें हा टीकाग्रंथ निर्माण केला याबद्दल आम्ही त्यांचें फिरून एकवार अभिनंदन करतों. आदरयुक्त प्रेम आणि सत्यान्वेषणापुरती खरमरीत टीका व विरोध करण्याचें धैर्य यांचा समुच्चय जर कोठें कोणास पाहावयाचा असेल तर हा ग्रंथ त्याचा एक उत्तम नमुना आहे असें आम्ही म्हणतों." परमार्थविचारमाला व रहस्यनिरीक्षण या दोन ग्रंथांमुळें एक आध्यात्मिक वाङ्मयलेखक म्हणून पुण्यांत व महाराष्ट्रांतही गोविंदसुतांची बरीच प्रसिद्धी झाली होती यांत शंका नाहीं. कै. हरी रघुनाथ भागवत यांनीं पुणें शहराचें १९०१ ते १९२० सालचें वर्णन म्हणून एक पुस्तक १९२४ सालीं प्रसिद्ध केलें आहे. त्यांत पुण्यांतील बौद्धिक क्षेत्रांतील प्रसिद्ध व्यक्ती म्हणून या वीस वर्षांच्या मुदतींत पुण्यास वावरणाऱ्या सुमारें १२५ हयात व दिवंगत व्यक्तींची माहिती दिली आहे त्यांत वरील पुस्तकांचे कर्ते म्हणून गोविंदसुतांचा उल्लेख आलेला आहे.

## सेवानिवृत्तीनंतर

कित्येक पेन्शनर लोकांना सेवानिवृत्त झाल्याबरोबर वेळ कसा घालवावा याबद्दल मोठी पंचाईत पडते व ज्यांच्या डोक्यांत नोकरींतील कामकाजाशिवाय रात्रंदिवस दुसरा कांहींच विषय नसतो ते तर पेन्शन घेतल्यावर शून्यमनस्क होतात. यामुळें वेळ जाण्यास साधन या दृष्टीनें अथवा सांपत्तिक नुकसान भरून काढण्याच्या उद्देशानें पुष्कळ पेन्शनर लोक खाजगी अगर निमसरकारी संस्थांत अगर संस्थानांतून पुनः नोकऱ्या धरतात व यावज्जीव नोकरीचें वातावरण त्यांस सोडवत नाहीं. गोविंदसुत सेवानिवृत्त झाल्यानंतर दक्षिण महाराष्ट्रांतील एका संस्थानांत त्यांच्या विशेष स्नेहांतील असे एक पेन्शनर डेप्युटी कलेक्टर मोठ्या हुद्यावर होते. त्या संस्थानांतील मुलकी खात्यांतील एक वरिष्ठ दर्जाची जागा दरमहा रु. ७५ पगाराची त्यांनीं गोविंदसुतांस देऊं केली होती. गोविंदसुतांची



गोविंदसुतांना ( खुर्चीवर डावीकडून नं. ३ ) सेवानिवृत्त झाल्यावेळीं पानसुपारी झाली त्या समारंभाचा घेतलेला फोटो.

होकार दिला असता तर सहजगत्या ती जागा त्यांस मिळाली असती, कारण जरी त्या जागेसाठीं पुष्कळ पदवीधरांची खटपट होती तरी गोविंदसुत हे मुलकी खात्यांतील मुरब्बी आहेत अशी त्यांची लायकी जाणूनच त्यांस त्या स्नेह्यांनीं त्या जागेचा स्वीकार करण्यास सुचविलें होतें. परंतु गोविंदसुतांच्या अंतःकरणांत द्रव्यतृष्णेचा अभाव व स्वातंत्र्याची लालसा असल्यामुळें " मला मीठभाकरीपुरतें पेन्शन मिळतें त्यांतच मी संतुष्ट आहें " असें सांगून गोविंदसुतांनी ती नोकरी साभार नाकारली. त्यांनीं मनांतच आणलें असतें तर पेन्शन घेतल्यानतर १०।१२ वर्षें त्यांस अशी नोकरी सहज करतां आली असती. परंतु असें करण्यानें त्यांच्या आयुष्यक्रमांतील जें विशेषत्व आज जनतेसमोर दिसत आहे तें दिसलें नसतें. ज्या पेन्शनर लोकांना अवांतर वाचनलेखनाचा अगर विचार करण्याचा नाद नसतो त्यांस पेन्शनानंतर वेळ कसा जाईल याची पंचाईत पडते अथवा केवळ ख्यालीखुशालींत व रिकामटेंकड्या गप्पागोष्टींत ते आपल्या वेळेचा अपव्यय करतात किंवा ते लवकरच मृत्युमुखीं पडतात. परंतु गोविंदसुतांवर पेन्शन घेतल्यानंतर अशी कांहींच आपत्ति ओढवली नाहीं, उलट त्यांच्या कार्याचा व्याप इतका कांहीं वाढला होता कीं दिवसाचे चोवीस तास त्यांस पुरत नसत. या कार्यव्यापाचे मुख्यत्वें करून तीन प्रकार सांगतां येतील. ( १ ) वाचन ( २ ) लेखनव्यवसाय व ( ३ ) प्रवास.



## वाचनव्यवसाय

वाचनाच्या प्रकारांत दररोजचीं वृत्तपत्रें हा विषय अवश्य असे. अमळनेरला गोविंदसुतांचा मुक्काम असला म्हणजे वर्तमानपत्रांचें सर्व टपाल प्रथम त्यांचेकडेच यावयाचें व त्यांचें वाचन एक तासाच्या आंत होऊन मग वाचनालयाच्या जागेंत सर्व वृत्तपत्रें जावयाचीं अशी मुद्दाम व्यवस्था येथील सार्वजनिक वाचनालयाचे चिटणीस श्री. भिडे वकील ठेवीत असत व वाचनालयाचा जास्तींत जास्त फायदा घेणारा गोविंदसुतासारखा वाचक कोणीच मिळावयाचा नाहीं असें चिटणीस मोठ्या कौतुकानें व अभिमानानें सांगत असतात. मराठी वृत्तपत्रें वाचून झाल्यावर इंग्रजी दैनिकांत जरा ताजी बातमी असते सबब त्यांतील ठळक मथळ्यावरून आपली सूक्ष्म नजर फिरविल्यावांचून ते राहात नसत. मासिकें १।२ दिवस ठेवून सविस्तर वाचीत व आपल्या विचारसरणीला पोषक असा मजकूर जर कोठें आला तर तो नेमका आपल्या स्मरणवहींत उतरून घेतल्याशिवाय राहात नसत.

" आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा " हा गोविंदसुतांचा ग्रंथ वरवर जरी वाचून पाहिला तरी गोविंदसुतांचें वाचन किती जबर होतें तें दिसून येईल. प्रस्तावना पृष्ठ ४३।४४ वर आधारभूत ग्रंथ व ग्रंथकार वगैरेची यादी देण्यापूर्वी गोविंदसुत लिहितात, " प्रस्तुत ग्रंथांत अध्यात्मविचार जसे समर्थ, तुकाराम, ज्ञानोबा, नाथ इत्यादि संतांच्या अनुभवी वाणीद्वारा स्फुरले आहेत तसे आधिभौतिक विचार प्रगट करण्याला पुष्कळ ग्रंथ, मासिकें, वर्तमानपत्रें यांचें बहुमोलाचें सहाय्य झालें आहे त्यांचीं नांवें ठिकठिकाणीं ग्रंथांत दिलीं आहेत." नाटकें, कादंबऱ्या व गोष्टी अशा वाङ्मयाची गोविंदसुतांस मुळींच आवड नसे, किंबहुना केवळ करमणुकीपलीकडे प्राय: अशा वाङ्मयाचें ध्येय नसतें म्हणून या " रजोगुणात्मक रंजना " वर " संत आणि त्यांचे ग्रंथ " या प्रकरणांत व अन्यत्रही गोविंदसुतांनीं पुष्कळच कडक टीका केली आहे व अशा वाङ्मयाचे प्राय: जे नमुने पुढें येतात त्यांस अनुलक्षून ही टीका आहे व शेवटीं कोणाच्याही अंतराला धक्का लावूं नये म्हणून समारोप करतांना लिहिलें आहे " जग हें अनंत असून ' भिन्नरुचिर्हि लोकः ' हें असावयाचेंच. म्हणून हल्लींचीं रंजनें आणि करमणुकी पारमार्थिक दृष्टीनें त्याज्य असलीं तरी प्रापंचिकांच्या या करमणुकीच होत. म्हणून त्यावर बोलण्याचा आपल्याला अधिकार नसून उपयोगही नाहीं. यासाठीं या करमणुकांचे चालक, मालक व वाचक यांच्या मार्गाच्या आड आपण न जातां ' चलती है सो चलना देव ' अशी त्यांना विनंति करून पारमार्थिक दृष्टीनें ग्रंथ कसा असावा तें सांगतों " वगैरे. नवाकाळकर्ते लिहितात " गोविंदसुतांना जशी वाचनाची जबर हौस होती तसाच लेखनाचा नाद अतिशय होता. अलीकडे प्रकृति खालावली असतांही मिळतील तेवढीं वृत्तपत्रें, मासिकें आणि नवीं निघणारीं पुस्तकें मार्मिक दृष्टीनें वाचण्याचें काम अखंड चाललें होतें. प्रवासांतही त्यांच्या व्यासंगाला खळ पडत नव्हता. मिळेल तेवढें वाङ्मय वाचावें आणि जुळेल तेथें चर्चा करावी हेंच त्यांना जणूं काय व्यसन होतें. त्यांचें शिक्षण अवघें मराठी सहा इयत्तांपर्यंत झालें होतें परंतु वाचनाची आवड जबर असल्यानें त्यांनीं आपलें ज्ञान वाढविण्याचा क्रम अखेरच्या घटकेपर्यंत चालविला होता." एखाद्या वेळीं प्रवासांत असतां कांहीं वृत्तपत्रें व मासिकें त्यांस मिळालीं नाहींत तर ते मागील अंक जपून ठेवण्याबद्दल अमळनेर येथील वाचनालयाला मुद्दाम सूचना देऊन येथें आल्यावर त्यांचें अवलोकन करीत. वर्तमानपत्रासारख्या हलक्या वाङ्मयाकडे दिवसांतून २।२॥ तास दिल्यानंतर गंभीर व भारदस्त वाङ्मयाचेंही ते नित्यशः वाचन करीत. नेहमीं एखाद दुसऱ्या नवीन पुस्तकाचें वाचन चालूच असे. अमळनेरला



गोविंदसुत लिहीत बसले आहेत.

मुक्काम असला म्हणजे सकाळची अगर सायंकाळची सहल ४।२ दिवसांनीं येथील तत्त्वज्ञानमंदिराकडे ठरलेली असे व तेथें नवीन आलेल्या पुस्तकांचा शोध करून कांहीं पुस्तकें तेथल्या तेथेंच व कांहीं घरीं आणून वाचीत. येथील सार्वजनिक वाचनालयांतील जुन्या व नव्या पुस्तकांच्या याद्या ते दरसाल चाळीत व एकाच वेळीं वाटेल तितकीं पुस्तकें वाचण्यासाठीं घेऊन जाण्यास त्यांस मुभा असे, कारण त्यांच्यापाशीं पुस्तकें उगीच रिकामीं कधींही पडावयाचीं नाहींत व वाचन झाल्याबरोबर तीं ताबडतोब बिनचूक वाचनालयांत परत जावयाचीं अशी खात्री असे शिवाय त्यांच्या निवडीचीं पुस्तकें म्हणजे बहुधा भारदस्त वाङ्मयाचीं असत व अशा पुस्तकांची मागणी नेहमीच्या वाचकांकडून फारशी नसावयाचीच. पाश्चिमात्य तत्त्ववेत्यांचे जेवढे विचार मराठींतून वाचावयास मिळतील तेवढे ते वाचीत असत. आधिभौतिक सुधारणेच्या प्रस्तावनेंत गोविंदसुत लिहितात, “ मनुष्याचें अंतःकरण हें एक ज्ञानमधाचें पोळें आहे व कल्पना ही मधुमक्षिका आहे ज्ञानाचा मधुमेवा बाहेरच्या अनुभवानें अंतःकरण-पोळ्यांत ही कल्पना मधुमक्षिका सांठविते व त्याचा आस्वाद यथामति घेऊन पोळें थबथबूं लागलें म्हणजे ग्रंथाच्या किंवा वक्तृत्वाच्या रूपानें तो बाहेर टाकून अंतःकरण मोकळें करीत असते. ” गोविंदसुतांचा लेखनव्यवसाय हा त्यांच्या दीर्घवाचनाचा व मननाचा अगदीं स्वाभाविक परिणाम आहे असें प्रत्ययास येतें व वयाच्या ४८ व्या वर्षापर्यंत ज्ञान अंतःकरणांत पूर्ण मुरल्या-नंतर मग तें लेखनरूपानें प्रगट झालें आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जाहीर सभांतून वक्तृत्वरूपानें गोविंदसुतांनीं आपलें ज्ञान कधींच प्रगट करण्याचा प्रयत्न केलेला नाहीं याचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे. परंतु त्यांचा मुक्काम कोठेंही असला तरी परमार्थ मार्गांतील मुमुक्षु व साधक त्यांस नेमके हुडकून काढीत व सकाळ, सायंकाळ व रात्रींही पारमार्थिक विषयांवर ग्रंथांच्या आधारानें बोधपर चर्चा, निरूपण व सुखसंवाद त्यांच्या समवेत नेहमीं चालत असे.



## लेखनव्यवसाय

सेवानिवृत्त होण्यापूर्वीं ५।६ वर्षांपासून गोविंदसुतांच्या लेखन-व्यवसायाला सुरवात झाली होती हें वर सांगितलेंच आहे. रहस्यनिरीक्षणांत नांव प्रगट केलें होतें तरी त्यानंतर सुद्धां ‘ गोविंदसुत ’ अशा नांवानेंच ते मुमुक्षूंत व इतर मासिक पुस्तकांतून व वर्तमानपत्रांतून लेख लिहीत असत व गोविंदसुत कोण हें वाङ्मयक्षेत्रांत संचार करणाऱ्या विद्वान् लोकांस

बहुधा जाहीर असल्यामुळें कित्येक मासिकें आपल्या विशेष अंकांकरतां अगर एरवींही चालू अंकांसाठीं गोविंदसुतांकडे लेखांची मागणी करीत व सवडी-प्रमाणें मुमुक्षूखेरीज पुण्याचें ज्ञानसंग्रह, औंध येथील पुरुषार्थ, अमळनेर येथील तत्वज्ञानमंदिर, इंदूर येथील आत्मबोध वगैरे मासिक पुस्तकांतून व नवाकाळ वगैरे वर्तमानपत्रांतून गोविंदसुतांनीं वेळोवेळीं लेख लिहिलेले आहेत. मुमुक्षूंत १९२० सालीं चिपळूण येथील ह. भ. प. गोपाळबुवा केळकर या प्रेमळ हरिभक्तांचें चरित्र गोविंदसुतांनीं लिहिलें आहे तसेंच जानेवारी ते एप्रिल १९३० च्या मुमुक्षु मासिकांत गोविंदसुतांची ज्यांच्यावर विशेष भक्ति होती त्या ब्रम्हीभूत श्री वासुदेवस्वामी धामणीकर यांचें चरित्र त्यांनीं लिहिलें आहे. जानेफळ ( प्रांत वऱ्हाड ) येथील श्री अवधूतानंद स्वामी यांचें गोविंदसुतांवर व त्यांच्या ग्रंथांवर फार प्रेम असे. सदरहू स्वामी शके १८४३ सालीं समाधिस्थ झाले. स्वामींच्या हयातींतच त्यांचें एक गद्य चरित्र स्वामींच्या शिष्यांनीं प्रसिद्ध केलें होतें तें गोविंदसुतांच्या नजरेखालीं घालून व त्यांच्या चार प्रास्ताविक शब्दांसह प्रसिद्ध करण्यांत आलें होतें व स्वामींच्या पश्चात् शके १८५२ सालीं स्वामींच्या शिष्यांनीं जें पद्यमय चरित्र प्रसिद्ध केलें तेंही गोविंदसुतांच्या खास देखरेखीखालींच अमळनेर येथें छापून प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. वऱ्हाडांत गोविंदसुत गेले म्हणजे जानेफळ संस्थानांतील कांहीं प्रेमळ शिष्यवर्गाच्या आग्रहावरून ते कधींकधीं जानेफळ येथें जात असत.

सेवानिवृत्तीनंतर गोविंदसुतांचे महत्वाचे असे दोन ग्रंथ लिहून प्रकाशित झाले आहेत. आत्मानुसंधान हा ग्रंथ शके १८४२ इ. स. १९२० सालीं लिहून प्रसिद्ध केला आहे. हें पुस्तक लिहिण्यापूर्वीं पुष्कळ वर्षें अगोदर परमार्थविचारमालेची पहिली आवृत्ति संपून गेली होती व त्या पुस्तकाची द्वितीय आवृत्ति काढण्याबद्दल वाचकांची एकसारखी मागणी चालू होती. परंतु परमार्थविचारमालेंतील लेख हे बोलून चालून वर्तमानपत्रांत दर आठवड्यांत प्रसिद्ध होण्याच्या दृष्टीनें लिहिलेले होते व जरी ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध करतांना मागें पुढें करून व थोडाफार बदल करून प्रसिद्ध केले होते तरी स्वतंत्र ग्रंथ या दृष्टीनें विचार करतांना त्यांत अनेक दोष राहाणें स्वाभाविक होतें. ते दोष दूर करून स्वतंत्र रीतीनें प्रकरणें गुंफून मालेच्या ऐवजीं मालेंतील विचारसरणीस अनुसरूनच परंतु एक प्रकारें मालेची सुधारून काढलेली आवृत्ति अशा दृष्टीनें आत्मानुसंधान नांवाचा ग्रंथगुच्छ प्रसिद्ध झालेला आहे. पेन्शन घेतल्यामुळें या वेळीं गोविंदसुतांस वेळही भरपूर होता व पुष्कळ वाचकांच्या मतें गोविंदसुतांचें खरें आध्यात्मिक अंतरंग याच

ग्रंथांत उत्कृष्ट रीतीनें प्रगट झालेलें आहे. या ग्रंथावर कोणी प्रतिकूल टीकेचे हल्ले चढविल्याचें आम्हांस माहीत नाहीं व कित्येक भाविक आणि प्रेमळ वाचक या ग्रंथाची पोथीप्रमाणें पूजा करतात व नित्यवाचनांत हा ग्रंथ ठेवून त्याचीं पारायणें करतात असें आम्हांस माहीत आहे. यानंतर १९२६ च्या प्रारंभीं " मराठी साधुकवि वि. प्रो. शि. म. परांजपे " हें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें, परंतु १९१४ सालीं या मथळ्याखालीं मुमुक्षूंत जे लेख गोविंदसुतांनीं लिहिले होते त्यांचेंच हें पुनर्मुद्रण होय व प्रो. परांजपे यांनीं १९१३ सालीं एक लेख लिहिला होता तोच त्यांनीं पुनः १९२५ सालीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केल्यामुळें त्या निमित्तानें गोविंदसुतांनींही त्या लेखावरील आपले टीकात्मक लेख पुनः पुस्तकरूपानें छापले इतकेंच. १२ पृष्ठांच्या नवीन प्रस्तावनेखेरीज या पुस्तकांत बाकी सर्व मजकूर १९१४ सालीं मुमुक्षूंतून आलेला जुनाच आहे शके १८४८ ( सन १९२६ ) सालीं " आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा " हा ५००।५५० पृष्ठांचा ग्रंथ गोविंदसुतांनीं लिहून प्रसिद्ध केला. हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर त्यानें २।३ वर्षें तरी विचारी लोकांच्या अंतःकरणांत खळबळ उडवून दिली होती यांत शंका नाहीं. या ग्रंथावर अनेक विद्वानांच्या अनुकूल प्रतिकूल टीका पुष्कळच प्रसिद्ध झाल्या व या पुस्तकाच्या पूर्वार्धांतील अनेक विषयांवर कित्येक वर्षेंपर्यंत अनेक लेखक व वक्ते आपल्या लेखांतून व भाषणांतून साधक अगर बाधक विचार प्रगट करीत होते. मुमुक्षु ( डिसेंबर १९२६ ), नवाकाळ ( २६।८।२६ ) व केसरी (ता. २२।२।२७ ) यांत या पुस्तकावर आलेले सविस्तर अभिप्राय वाचनीय आहेत. या ग्रंथाच्या पूर्वार्धांतील विवेचनाचा कांहीं भाग जरी आधुनिकांस पटण्याजोगा नाहीं तरी प्रौढ व चित्तवेधक भाषेमुळें तो भाग आल्हादकारक व वाचनीय आहे व अनेक पक्षोपपक्षांना त्यांत उत्तम खाद्य आहे हा सर्व अभिप्रायांचा सारांश आहे. एकीकडे आधुनिक सुधारणावाद्यांनीं या पुस्तकाच्या पूर्वार्धाला नाकें मुरडलीं, तर दुसरीकडे या पुस्तकांतील राजकारणासंबंधानें लिहिलेले कांहीं विचार सरकारी अधिकाऱ्यांस रुचले नाहींत. कायद्याच्या दृष्टीनें आक्षेप घेण्याजोगा मजकूर पुस्तकांत कोठेंही आढळण्याजोगा नाहीं. परंतु कौन्सिल-बहिष्कार वगैरे त्या वेळच्या कॉंग्रेसच्या विचारसरणीस पुष्टि देणारे विचार कांहीं ठिकाणीं प्रदर्शित केलेले आहेत व ब्रिटिश राजनीतीच्या बाबतींत ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांचे उतारे दिले आहेत तशा प्रकारची विचारसरणी सरकारी पेन्शनरांची तरी असूं नये व अशा विचारसरणीचे लेख पुनः लिहिल्यास सरकारी पेन्शन बंद करण्याचे बाबतींत विचार करावा लागेल अशी समज सरकारकडून पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटमार्फत

गोविंदसुतांस देण्यांत आली होती. ही हकीकत १९२७।२८ सालांतील आहे. गोविंदसुतांस डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचें बोलावणें आलें त्या वेळीं कदाचित् कांहीं खुलासा द्यावा लागेल व दुभाष्याचें काम पडेल म्हणून आम्हांही त्यांच्याबरोबर गेलों होतों. परंतु वरून लिहून आलेला मजकूर साहेबांनीं जशाचा तसाच वाचून दाखविला व पांच मिनिटांतच आम्हांस रजा दिली. तुमचा खुलासा वगैरे कांहीं एक घ्यावयाचा नसून सरकारचें म्हणणें फक्त तुम्हांस कळवावयाचें आहे अशी समज साहेबांनीं आम्हांस दिली. कांहीं दिवसांनीं आमच्या कानावर अशी एक वार्ता आली कीं साहेबांच्या ऑफिसांत हा हुकूम आल्यानंतर या पुस्तकाचे लेखक कोण आहेत याबद्दल साधारण चौकशी साहेबांनीं केली होती व त्यांस समजून आलें होतें कीं आपल्याच ऑफिसमध्यें १७।१८ वर्षें कारकुनीचें काम केलेले हे गृहस्थ आहेत, तसेंच आपणांस मराठी शिकविणाऱ्या पंडितापाशींही ग्रंथकाराच्या लायकीबद्दल साहेबांनीं मोघम चौकशी केली होती व या ग्रंथकाराचें लेखन मराठी भाषेच्या व विचारांच्या दृष्टीनें बरेंच वरच्या दर्जाचें व लोकप्रिय आहे असें त्यांस सहज शोधांत समजलें होतें! शके १८५० (सन १९२९) सालीं परमार्थविचारमालेची सुधारलेली दुसरी आवृत्ति गोविंदसुतांनीं प्रसिद्ध केली व त्यासाठीं त्यांस पुण्यास सतत ८।१० महिने मुक्काम करावा लागला. पुस्तकाची दुसरी आवृत्ति असें जरी म्हटलें असलें तरी सुधारणेच्या व फेरफारांच्या दृष्टीनें त्यांनीं बऱ्याच ठिकाणीं नवीन मजकूर लिहून काढला.

पुस्तकें व वर्तमानपत्रांतील व मासिकांतील लेख याखेरीज गोविंदसुतांचा खाजगी पत्रव्यवहाराचा लेखनव्यवसाय फारच जबर असे. दररोज १०।५ पत्रें लिहिणें ही गोष्ट त्यांच्या अगदीं नित्यक्रमांतील असे. पत्रव्यवहारांत त्यांच्याइतकी तत्परता व नियमितपणा पाळणारे इसम सुशिक्षितांत शेंकडा ५ तरी आढळतील किंवा नाहीं याची शंका आहे. त्यांच्याकडे दररोज येणारा पत्रव्यवहार तितकाच विपुल असे व त्याची यथायोग्य व्यवस्था लावण्यांत त्यांचे दररोज १।२ तास खर्च होत असत. या पत्रव्यवहारांत विविध प्रकार असत. कोणी अगदीं घरगुती व प्रापंचिक बाबतींत त्यांस सल्ला मसलत विचारीत, कोणी पत्रिका पाठवून ज्योतिषविषयक प्रश्न विचारीत, कोणी पारमार्थिक शंकांचें समाधान करण्यासाठीं त्यांचेकडे धांव घेत तर कोणी अन्य तऱ्हेनें त्यांच्या माहितीचा अगर ओळखीचा उपयोग करून घेण्याचे हेतूनें त्यांस पत्रें लिहीत. या सर्वांचीं उत्तरें आस्थापूर्वक व ताबडतोब जात असत व दररोजच्या आवक जावक

पत्रव्यवहाराची गोविंदसुत आपल्या खाजगी रोजनिशींत नोंदही ठेवीत असत. तें नेहमीं मोडी लिपींत व फारच जलद गतीनें लिहीत असत व त्यांचें अक्षरही वळणदार असे. एका कार्डांत कधीं कधीं पत्याखेरीज ६०।७० ओळी मजकूर ते लिहीत असत व त्यांचें अक्षर वाचण्याची ज्या वाचकास नेहमींची संवय असे त्यास इतका दाट लिहिलेला मजकूर सहज वाचतां येत असे. ज्या इसमापाशीं नवीनच पत्रव्यवहार सुरू असेल त्यास गैरसोय होऊं नये म्हणून त्याच्यासाठीं मात्र बाळबोधींत अगर दूर अंतरावर ओळी काढून मोडींत मजकूर लिहीत. छापण्यासाठीं जाण्याचा सर्व मजकूर बाळबोधींत व मोकळे-पणानें लिहिणें अवश्यच असे. सेवानिवृत्त झाल्यापासून पुढील बहुतेक वर्षांच्या त्यांच्या रोजनिशा उपलब्ध आहेत, त्यांत दररोजचा पत्रव्यवहार, प्रवासांतील मुक्काम, महत्वाच्या कौटुंबिक गोष्टी या सर्वांच्या बिनचुक नोंदी आहेत व मधून मधून उपयुक्त वैद्यकीय माहिती, वाचनांत आलेल्या पुस्तकां-तील उतारे, प्रवासांत मिळालेल्या स्नेह्यांच्या कुंडल्या वगैरे विविध प्रकारच्या माहितीनें रोजनिशीचीं पृष्ठें भरलेलीं आहेत. ता. ३।१।३४ अखेरपावेतों गोविंदसुतांनीं आपल्या हातानें आपली रोजनिशी लिहिलेली आहे. ता. ४ व ता. ५ जानेवारी रोजीं दुसरे इसमाकडून रोजनिशी लिहून घेतलेली आहे व त्यापुढील पानें कोरीं आहेत. ता. ८।१।३४ रोजीं गोविंदसुतांचें देहावसान झालें हें प्रारंभीं निवेदन केलेंच आहे. शेवटच्या स्मरणार्थ टिपण या सदराच्या पानांत गोविंदसुतांनीं आपल्या हातानें आपल्या विशेष जिव्हाळयाच्या अशा सुमारें १०० गृहस्थांचीं नांवें व पत्ते १।१।३४ नंतर लिहून ठेवले आहेत. यांपैकीं बहुतेक इसमांकडून गोविंदसुतांच्या निधनोत्तर आम्हांस सहानुभूतीचीं पत्रें आलीं आहेत यावरून या सर्व गृहस्थांसही गोविंदसुतांबद्दल जिव्हाळयाचें प्रेम होतें हें लक्षांत घेण्याजोगें आहे.

गोविंदसुतांच्या हयातींत त्यांनीं आपल्या शेवटच्या आजारीपणांत जे महत्वाचे दोन लेख लिहिले त्यांचा उल्लेख करून हा भाग संपवितों. " श्री जीवन्मुक्त आणि आधुनिक तत्वज्ञ " हा ग्रंथ पनवेलचे श्री. सदाशिव कृष्ण फडके वकील यांच्या कसलेल्या कुशल लेखणींतून नुकताच बाहेर पडलेला होता. अमळनेरच्या तत्वज्ञान मासिकाच्या संपादकांनीं तो ग्रंथ मुद्दाम गोविंदसुतांस वाचण्यास दिला होता व त्या विषयांतील गोविंदसुत हे अधिकारी पुरुष असल्यामुळें पुस्तकावर अभिप्राय लिहिण्याबद्दलही त्यांस सूचना केली होती. गोविंदसुत आंथरुणास खिळून अत्यवस्थ आजारी असतांना हा ग्रंथ व श्री. फडके यांचे इतर ग्रंथ वाचीत होते. आजारीपणामुळें स्वतः वाचण्याला असमर्थता वाटली म्हणजे मधून मधून कांहीं पृष्ठें आमच्याकडूनही वाचून

घेऊन ऐकत असत. तत्त्वज्ञानमंदिराच्या शके १८५५ च्या आश्विन महिन्याच्या अंकांत सदरहू पुस्तकावरील १४ पृष्ठांचा गोविंदसुतांचा अभिप्राय प्रसिद्ध झालेला आहे. मानसिक श्रम मुळींच करूं नये असा वैद्यकीय सल्ला असतांनाही "अशा प्रकारच्या आवडीच्या विषयाच्या वाचनानें व लेखनानें सर्व आधिव्याधी विसरण्यास मदत होत असते असें सांगून अंतःकरणाची प्रसन्नता कायम ठेवून हा लेख त्यांनीं लिहिला आहे व निधनापूर्वीं ४।५ दिवसच अगोदर सदरहू लेख प्रसिद्ध झालेला त्यांस पाहावयास मिळाला हें सुदैवच म्हटलें पाहिजे. दुसरा महत्त्वाचा लेख म्हणजे गोविंदसुतांच्या निधनानंतर श्री ज्ञानेश्वरदर्शन हा ग्रंथ अहमदनगर येथील वाङ्मयोपासक मंडळानें प्रसिद्ध केला आहे त्यांत दुसरे भागांत अध्यात्मखंडांत " ज्ञानेश्वरींतील अध्यात्मज्ञानाचें अंतरंग " अशा मथळ्यानें जो २७ पृष्ठांचा लेख प्रसिद्ध झालेला आहे तो होय. हा लेखही वरील लेखाच्या पूर्वीं कांहीं महिने आजारीपणांतच लिहिलेला आहे. श्रीज्ञानेश्वरदर्शन हा ग्रंथ आपल्या हयातींतच प्रसिद्ध झालेला पाहावा अशी गोविंदसुतांची फार इच्छा होती. परंतु बलीयसी ईश्वरेच्छा तशी नव्हती. श्रीज्ञानेश्वरदर्शन ग्रंथ प्रसिद्ध करण्याबद्दल नेवासें येथें जो मोठा समारंभ झाला त्या वेळच्या सभेंत ग्रंथांतील एक प्रमुख लेखक गोविंदसुत यांच्या निधनाबद्दल दुःखवट्याचा ठराव पास करण्याची वेळ आली याबद्दल ग्रंथाचें प्रकाशक मंडळ व समारंभास जमलेले सर्व सज्जन यांस फार हळहळ वाटली.



## प्रवासाची आवड

तीर्थक्षेत्रें व इतिहासप्रसिद्ध ठिकाणें पाहाणें व त्यासाठीं प्रवास करणें याची गोविंदसुतांना विशेष आवड असे. नोकरींत असतांना वर्षांतून ४।६ महिने त्यांस जिल्ह्यांत फिरावें लागे त्या वेळीं प्रत्येक मुक्कामाच्या आसपास असलेलीं महत्त्वाचीं ऐतिहासिक व धार्मिक स्थळें ( किल्ले, देवालयें वगैरे ) यांचें मोठ्या हौसेनें दर्शन घेतल्याशिवाय ते राहात नसत. त्यासाठीं १०।५ कोस पायीं मजल करावी लागली तरी त्यांची तयारी असे. त्यांचा पिंड मूळ कोंकणप्रांतांत वाढलेला असल्यामुळें टेंकड्या व डोंगर चढणें त्यांस सुसाध्य असे. नोकरीवर असतांना आजारीपणासाठीं म्हणून त्यांनीं कधीं रजा घेतल्याचें आम्हांस आठवत नाहीं. कांहीं वर्षें किडनीचे विकारापासून त्यांस बराच त्रास होत असे. परंतु कांहीं पेटंट औषधांचे उपचार करून ते भागवीत असत. सेवानिवृत्तीच्या सुमारास त्यांस मधुमेहाचा विकार जडल्याचें आढळून आलें, परंतु त्यावर विशेष औषधोपचार वगैरे करण्याच्या भरीस न पडतां खाण्यापिण्याचें पथ्य सांभाळूनच त्या विकारास हटविण्याचा ते

प्रयत्न करीत असत व याप्रमाणें सुमारें २५ वर्षें ते या रोगाशीं झगडत होते. खाण्यापिण्यांत, हवापाण्यांत व भोंवतालच्या परिस्थितींत नेहमीं फेरबदल करीत राहिलें म्हणजे आपल्या प्रकृतीला बरें वाटतें व आपणांस मधुमेहाचा विकार असल्याचें स्मरणही होत नाहीं अशी आपल्या अंतःकरणाची एक श्रद्धा असल्याचें ते नेहमीं सांगत. यामुळें महिना दीड महिना एखाद्या ठिकाणीं राहिलें कीं अन्यत्र जाण्याची त्यांस आकांक्षा वाटत असे व अशा स्थलांतरानें त्यांस कामकाज करण्यास जास्त हुरूप वाटत असे व नवीन तरतरी अंगीं येत असे. यामुळें सेवानिवृत्तीनंतर पुणें हें आपल्या वास्तव्याचें मुख्य ठिकाण ठेवून तेथून दरसाल २।३ महिने कोंकणप्रांतांत, २।३ महिने खानदेशांत, २।३ महिने वऱ्हाड मध्यप्रांतांत व २।३ महिने हिंदुस्थानांतील तीर्थक्षेत्रें व ऐतिहासिक स्थळें यांचें दर्शन घेण्यांत अशा रीतीनें त्यांची दरसालची कालक्रमणा असे. कांहीं विशेष कारण उद्भवेल तरच त्यांत बदल होत असे. प्रवास करण्यांतही एकदम फार दूर ठिकाणीं मुक्काम न करतां वाटेंत जेथें जेथें त्यांच्या विशेष प्रेमाची व सलोख्याची मंडळी असत तेथें तेथें आगाऊ सूचना देऊन ते मुक्काम करीत करीत लांबचा प्रवास पुरा होत असे. अशा क्रमानें १०।१२ वर्षांत भरतखंडाच्या सर्व प्रांतांतील सर्व धार्मिक क्षेत्रांचें त्यांनीं दर्शन घेतलें होतें व कांहीं ठिकाणीं तर दोन तीनदां जाण्याचा त्यांस योग आला. हिंदुस्थानांतील चारी धाम व बारा ज्योतिर्लिंगें यांचें दर्शन त्यांनीं घेतलें होतें. अशा क्षेत्रदर्शनार्थ प्रवासाच्या वेळीं ५।४ मंडळी तरी त्यांच्याबरोबर नेहमीं असत व वाचन, लेखन, निरूपण हे सर्व व्यवसाय प्रवासांतही नियमितपणें चालू असत. कोणत्या सालीं कोठें कोठें प्रवास केला ही माहिती त्यांच्या रोजनिशीवरून बिनचूक मिळण्याजोगी आहे. परंतु इतक्या तपशीलांत न जातां फक्त नमुन्यासाठीं म्हणून १९२८ व १९२९ या दोन सालांत म्हणजे वयाच्या ६६ व ६७ व्या वर्षीं त्यांनीं किती प्रवास केला याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. ता. १।१।२८ ते ४।१।२८ मु. चिपळूण, ता. ५।१।२८ ते १०।१।२८ मु. सांवर्डें, ता. ११।१।२८ ते १५।२।२८ सांवर्डें, चिपळुण व मांडकी या गांवांचे दरम्यान बरेंच वेळां जाणेंयेणें, ता. १६।२।२८ ते २२।२।२८ देवरूख व रत्नागिरीचे दरम्यान दोन वेळां जाणें येणें, ता. २२।२।२८ ते २७।२।२८ कोल्हापूर व कोरेगांव, ता. २८।२।२८ ते २।३।२८ पुणें, ता. ३।३।२८ ते १७।३।२८ मांडवणें, कल्याण व मुंबई यांचे दरम्यान जाणें येणें व मुक्काम, ता. १८ व ता. १९ मार्च मु॥ बडोदें, ता. २० मार्च ते २४ मार्च मु॥ द्वारका, २५।३।२८ ते १।५।२८ सुदामपुरी, प्रभासपट्टण सोमनाथ, राजकोट व कलोल, ता. ३।४।२८ ते ता. ३।५।२८ मुंबई, कल्याण

व ठाणें यांच्या दरम्यान ५।७ वेळां येणें जाणें, ता. ४।५।२८ ते १४।५।२८ मु० पुणें, १५।५।२८ ते २७।७।२८ कोंकणप्रांतांत चिपळूण, सांवर्डे, रत्नागिरी व इतर ठिकाणीं जाणें येणें, ता. २८ ते ३० जुलै कराड, सातारा, कोरेगांव, ता. ३१ जुलै ते १४ आगष्ट पुण्यास मुक्काम, ता. १५ ते २० आगष्ट मुंबई, ता. २१।८।२८ ते १२।१।२९ खानदेशांत अमळनेरास मुक्काम, परंतु दरम्यान बरेच वेळां धुळें, चाळीसगांव, जळगांव, भुसावळ वगैरे ठिकाणीं जाणें येणें, ता. १३।१।२९ ते १९।१।२९ मुंबई, ता. २०।१।२९ ते ८।२।२९ मु. पुणें परंतु मध्यंतरीं खेड, आळंदी वगैरे ठिकाणीं जाणें येणें, पुनः मुंबई व अमळनेर २०।२।२९ पर्यंत, २१।२।२९ ते ९।३।२९ वऱ्हाड व मध्यप्रांत ( वणी, यवतमाळ, खामगांव, वर्धा, नागपूर, हिंगणघाट वगैरे ठिकाणीं मु० ) यानंतर १०।४।२९ पावेतों मु० अमळनेर, १३।४।२९ ते १२।५।२९ मु० मुंबई, त्यानंतर २४।५।२९ मु० पुणें, ता. २५।२६।२७ मे १९२९ कै. शिवरामपंत परांजपे यांच्या आग्रहावरून बेळगांवास साहित्यसंमेलनास गेले, ता. २८ मे पुणें, ता. २९।३०।३१ मे औरंगाबाद, ता. १ ते ७ जून पुणें, ता. ८ ते २३ जून मुंबई, पुनः पुण्यास थोडे दिवस राहून २।३ महिने खानदेशांत निरनिराळ्या ठिकाणीं व २।३ महिने वऱ्हाड नागपूर प्रांतांत व १५ डिसेंबर १९२९ पासून पुढें पुणें व मुंबई येथें मुक्काम.



## गोविंदसुतांची राहाणी

गोविंदसुतांची राहाणी अतीशय साध्या प्रकारची असे याचा उल्लेख प्रारंभीं आलाच आहे. घरचे कपडे वेगळे, ऑफिसचे कपडे वेगळे किंवा लग्नकार्य वगैरे समारंभासाठीं वेगळा पोषाख असा प्रकार त्यांच्यापाशीं कधींच नव्हता. आंगांत बंडी अगर सदरा, त्यावर कोट, नेसण्याचें एक धोतर व आंगावर उपरणें आणि डोक्यास रुमाल यापेक्षां अधिक कपडे त्यांस कधीं लागत नसत. १९२० सालापासून त्यांनीं खादीचा अंगिकार केला व वरील सर्व कपडे मरेपावेतों शुद्ध खादीचेच वापरले. प्राप्तीच्यावर कधींही खर्च करावयाचा नाहीं व कर्ज कधींही काढावयाचें नाहीं अशा निश्चयानें प्रथमपासून अखेरपर्यंत ते वागले. मुलांच्या कॉलेजच्या शिक्षणक्रमांत एकदम फी भरण्याचे वेळीं अगर परीक्षेचे वेळीं त्यांस थोडीफार रकमेची गरज लागत असे त्यावेळीं पुण्यांतील त्यांचे दोन स्नेही सहानुभूतिपूर्वक तत्परतेनें उसनवार रक्कम देऊन मदत करीत असत व ती रक्कम लवकरच परत होत असे. आपल्या सर्व आयुष्यांत म्हणण्यासारखी शिल्लक रक्कम कधीं आपल्यापाशीं राहिली नाहीं व जेव्हां खर्चाच्या बाबी उपस्थित होत तेव्हां त्या खर्चाची काय

योजना करावी अशी विवंचना वाटण्यासारखी स्थितीही कधीं उत्पन्न झाली नाहीं असें गोविंदसुत नेहमीं म्हणत असत. त्यांनीं बँकबुक कधीं बाळगलें नाहीं अगर विम्याची पॉलिसी कधीं उतरली नाहीं. भोजनोत्तर सुपारीचें खांड मिळाल्यास लागत असे याखेरीज त्यांस कशाचेंही व्यसन असें मुळींच नव्हतें. आमची विद्यार्थीदशा संपेपर्यंत घरांत दररोज चहा करण्याचा परिपाठ असा आम्हांस मुळींच माहीत नव्हता. कोणी पाहुणा वगैरे आला अगर विशेष प्रसंग असेल तरच घरांत चहा व्हावयाचा. अलीकडे १५।२० वर्षांतच चहाचें व्यसन आपल्या समाजांत विशेष बोकाळलें आहे. लेखनव्यवसायासाठीं व प्रवासांत गोविंदसुतांस पुष्कळ वेळां जागरणें करावीं लागत, तेव्हांपासून चहा घेण्याचा परिपाठ त्यांनीं सुरू केला, परंतु दिवसांतून वाटेल तितक्या वेळां चहा घेणें असा अतिरेक त्यांनीं कधींच केला नाहीं किंवा एवढ्या प्रवासांत हॉटेलांतील चहा अगर कोणताही पदार्थ त्यांनीं घेतला नाहीं. कित्येक वर्षांपासून ते एकभुक्त राहात असत. अखेरचीं कांहीं वर्षें सोडून दिल्यास नेहमीं नियमित आहार व संवयी व भरपूर व्यायाम होईल इतकें हिंडणें फिरणें ठेवल्यामुळें डॉक्टर वैद्यांचीं औषधें घेण्याची त्यांस सहसा कधींच जरूरी पडत नसे. स्वतः साध्या व निर्व्यसनी राहणीनें ते वागत असल्यामुळें तशाच प्रकारच्या वागणुकीच्या लोकांशीं त्यांचें तात्काळ सख्य जमत असे.

## गोविंदसुतांची कांहीं स्नेही मंडळी

आतांपर्यंत लिहिलेल्या गोविंदसुतांच्या चरित्रांत त्यांच्या कांहीं ठळक अशा ऋणानुबंधी स्नेह्यांचा नामनिर्देश आलाच आहे. गोविंदसुतांच्या हयातींत निरनिराळ्या निमित्तांनीं शेंकडो लोकांचा व त्यांचा विशेष जिव्हाळ्याचा असा स्नेहसंबंध जडलेला होता त्या सर्व सद्‌गृहस्थांचा नामनिर्देश करतां येणें अशक्यच आहे. गोविंदसुतांनीं आपल्या प्रत्येक ग्रंथाच्या प्रस्तावनेंत कांहीं सन्मित्रांचा उल्लेख केलाच आहे. या पुस्तकाच्या तिसऱ्या भागांत आठवणींच्या रजःकरणांत गोविंदसुतांच्या निधनोत्तर आलेल्या त्यांच्या कांहीं स्नेह्यांच्या पत्रांचा उल्लेख आलाच आहे. गोविंदसुतांचे पुष्कळ स्नेही त्यांच्या हयातींतच कालवश झालेले त्यांनीं पाहिले, यामुळें कित्येक वेळां तुलनात्मक दृष्टीनें तें म्हणत कीं मला परमेश्वरानें त्या मानानें बरेंच आयुष्य दिलें आहे व दीर्घायुष्य याचा अर्थ अनेक प्रिय जनांचा दुःसह वियोग पाहाणें. १८९९ सालापासून १९१० पर्यंत गोविंदसुतांचें बिऱ्हाड पुण्यास गोंधळीचे बोळांत संगमेश्वरकरांचे वाड्यांत असे. ( हल्लीं हा वाडा गोखल्यांचा आहे. ) त्या वेळीं या वाड्यांत बरींच बिऱ्हाडें मुलकी खात्यांतील

कारकुनांचींच मुख्यत्वें असत. त्यांपैकीं बरेच लोक आज कालवश झालेले आहेत, त्यांत गोविंदसुतांच्या बरोबरीचे गृहस्थ म्हणजे रा. गणेश सखाराम लोणकर ऊर्फ नाना बारामतीकर हे होत. पेन्शननंतर कांहीं दिवस हे बारामतीस मुखत्यार वकिली करीत असत. यांचा व गोविंदसुतांचा घरोबा अखेरपावेतों कायम होता व गोविंदसुतांनंतर लवकरच नाना बारामतीकरही निवर्तले. कै. लोकमान्य टिळक व त्यांचे पुण्यांतील प्रमुख अनुयायी या सर्वांची व गोविंदसुतांची चांगली ओळख असे. याचें एक कारण सेवानिवृत्तीनंतर गोविंदसुत हे वैद्यपंचानन कृष्णशास्त्री कवडे बी. ए. यांचा दवाखाना मोरोबा दादा फडणीसांचे वाड्यांत असतांना दररोज सायंकाळीं पुण्यांतील बरेच सार्वजनिक कार्यकर्ते तेथें बहुधा बसत असत त्या ठिकाणीं गोविंदसुतही कधीं कधीं जात असत. गोविंदसुतांस " महाराज " या नांवानें सर्व लोक संबोधीत असत व त्यांच्याबद्दल सर्वांचा आदर असे. पुण्यांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या राजकारणांत दोन तट पडल्यानंतर कै. शिवरामपंत परांजपे, श्री. वासुकाका जोशी, दे. भ. तुळपुळे, श्री. चिंतामणराव वैद्य वगैरे मंडळींची बैठक श्री. गणेशशास्त्री जोशी वैद्य यांचेकडे होत असे, त्या ठिकाणींही गोविंदसुतांचें जाणें असे, तथापि त्यामुळें दुसऱ्या तटांतील मंडळींबद्दलही त्यांचें प्रेम व आदर कमी झाला असें मात्र कधीं झालें नाहीं. कारण वारंवार बदलणाऱ्या प्रचलित राजकारणापेक्षां गोविंदसुतांच्या अंतःकरणाची आवड फार उच्च वातावरणांत संचार करणारी होती हें सर्वांस माहीत असे. यामुळें पुण्यांत शिवरामपंतांची स्वराज्यकचेरी, लोकमान्यांची केसरीकचेरी व पांगारकरांची मुमुक्षुकचेरी या तिन्ही ठिकाणीं एकाच वेळीं त्यांस प्रेमादरपूर्वक जातां येत असे. त्यांतल्यात्यांत पारमार्थिक विषयांबद्दल त्यांचा विशेष विचारविनिमय पांगारकर यांच्यापाशीं होत असे. " आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक भारणा " हें समर्पक नांव ग्रंथास देण्याची सूचना पांगारकर यांचीच होती. या ठिकाणीं मननामोदकर्ते श्री. माधव गोविंद ऊर्फ बाबूराव भिडे या विद्वान व बहुश्रुत गृहस्थांचा प्रामुख्यानें उल्लेख करणें जरूर आहे. यांची व गोविंदसुतांची नेहमीं बैठक असे व गोविंदसुतांच्या ग्रंथांतील कित्येक प्रकरणांचा उपक्रम व उपसंहार वगैरे उभयतांच्या चर्चेतून निष्पन्न होणाऱ्या धोरणाप्रमाणें झालेला आहे. लोकमान्यांस आपले वडील बंधु मानणारे कै० दत्तोपंत दादा बेहेरे, नातूबंधूंपैकीं कै० सरदार बाळासाहेब नातू, कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे विशेष अभिमानी कै० भिकाजीपंत हर्डीकर ( प्रो० हर्डीकर यांचे वडील ), शेतकी खात्यांतील पेन्शनर कै० दत्तोपंत दादा गोखले, पुण्याच्या डिस्ट्रिक्ट कोर्टांतील

शिरस्तेदार कै० विष्णुअण्णा किर्लोस्कर वगैरे अनेक लोकांचा उल्लेख गोविंदसुतांचे पुण्यांतील निरपेक्ष जुने स्नेही म्हणून करतां येईल. वयानें गोविंदसुतांच्या बरोबरीची अगर कांहीं वर्षांनीं लहान मोठी अशी दहापांच स्नेही मंडळी पुण्यांत असतील त्यांत प्रामुख्यानें श्री. वासुकाका जोशी, श्री. वामन मोरेश्वर पोतदार, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. दिगंबरपंत जोशी, श्री. बाबा जोगळेकर, श्री. शंकरराव लवाटे वगैरे गृहस्थ आहेत व मुलकी खात्यांतील पेन्शनर असेही बरेच गृहस्थ आहेत. पुण्याच्या बाहेरही गोविंदसुतांचे ठिकठिकाणीं स्नेही व चाहते आहेत. त्यांपैकीं बऱ्याच गृहस्थांचा स्नेह त्यांच्या ग्रंथलेखनावरून उत्पन्न झालेला आहे आणि वारंवार समक्ष व पत्रद्वारें पारमार्थिक बाबतींत विचारविनिमय होऊन तो स्नेह दृढ झालेला आहे. अशा स्नेहीमंडळींत वृद्ध पेन्शनरांपासून तों तरुण विद्यार्थीवर्गापर्यंत भिन्न भिन्न वयाचे व व्यवसायाचे लोक आहेत त्या सर्वांचा निर्देश करतां येणें शक्य नाहीं. गोविंदसुतांचे विशेष परिचित व स्नेही असतांही स्थल-संकोचास्तव कित्येक सज्जनांचा येथें उल्लेख करतां आला नाहीं, तसेंच पुनरुक्तीच्या भीतीमुळें कित्येक लोकांच्या पत्रांतील मजकुरांचा व पाठविलेल्या आठवणींचा उल्लेखही करतां आला नाहीं याबद्दल आम्हांस सर्वांनीं क्षमा करावी.

## अखेरचे दिवस

ता. २।७।१९३२ रोजीं आमचे धाकटे बंधु यवतमाळ येथें हायस्कूलचे हेडमास्तरचे जागेचा चार्ज घेतल्यानंतर दुसरे दिवशीं एकाएकीं हृदयक्रिया बंद पडून निवर्तले. गोविंदसुत त्या वेळीं मुंबईस होते. आम्हांस अमळनेर येथें तारेनें ही दुःखद वार्ता समजतांच आम्ही ताबडतोब यवतमाळला गेलों व गोविंदसुतांच्या मनाला एकदम धक्का बसूं नये म्हणून त्यांस हें वृत्त न कळवितां अमळनेरास ताबडतोब येण्याबद्दल कळविलें. बंधूचे मुलास व कुटुंबास घेऊन आम्ही यवतमाळहून जळगांव येथें आलों व गोविंदसुतही मुंबईहून त्याच वेळीं जळगांव स्टेशनवर उतरले. जळगांव तें अमळनेर आम्ही दोघे बरोबरच आलों व मुंबईहून ताबडतोब त्यांस इकडे बोलावण्याचें कारण समक्षच सर्व वृत्तांतासह त्यांस कळविलें. आपल्यावर मृत्यूचें वॉरंट बजावण्याऐवजीं तें चुकीनें आपल्या मुलावर बजावण्यांत आलें आहे अशी ईश्वराचे दरबारांत चूक झाली आहे असे त्यांनीं उद्गार काढले व त्यांस धीर देण्यास येणाऱ्या लोकांची उलट तेच अनेक रीतींनीं समजूत घालीत असत. पुण्याचें बिऱ्हाड मात्र या वेळीं त्यांनीं ताबडतोब मोडण्याची तजवीज केली. ९।७।३२ रोजीं बंधूचे मुलास घेऊन गोविंदसुत नाशीक येथें उत्तरक्रियेकरतां गेले

व १६।७।३२ रोजीं अमळनेर येथें परत आले. यानंतर सतत ३ महिने म्हणजे १६।१०।३२ पावेतों गोविंदसुत अमळनेर येथेंच राहिले. परंतु गोकर्ण महाबळेश्वर हें एकच क्षेत्राचें ठिकाण आतां पाहावयाचें राहिलें आहे, त्या ठिकाणीं जाण्याची जुळवाजुळव वर्ष सहा महिन्यांपासून सुरू होती ती पुरी करण्याचे उद्देशानें व प्रकृतीसही प्रवासानें बरें वाटेल अशा उद्देशानें गोविंदसुत हे यानंतर सुमारें ३ महिने मुंबईस जाऊन राहिले. गोविंदसुत मुंबईस असले म्हणजे त्यांचा मुक्काम तेथें मोहन बिल्डिंगमध्यें चिपळूणच्या बर्वेबंधूंकडे असे. बर्वेबंधु हे सर्व आपल्या आडनांवाप्रमाणेंच ' बरवे ' असून गोविंदसुतां-वर त्यांचें व त्यांच्यावर गोविंदसुतांचें अलोट व अकृत्रिम प्रेम असे. या ३ महिन्यांचे मुदतींत गोविंदसुत २।३ वेळां पुण्यास जाऊन आले व प्रत्येक वेळीं ५।६ दिवस तेथें मुक्कामही त्यांनीं केला होता. गोकर्ण महाबळेश्वराचे प्रवासा-साठीं १०।१५ मंडळीसह एप्रिल महिन्यांत मुंबईहून निघावयाचें असा बेत कायम करून ११।१।३३ रोजीं गोविंदसुत अमळनेर येथें परत आले. सुमारें २ महिने खानदेशांत निरनिराळ्या ठिकाणीं घालवून ६।३।३३ रोजीं गोविंदसुत मुंबईस गेले व तेथून १९।४।३३ रोजीं बऱ्याच मित्रमंडळींसह ते पुणें, मिरज, सांगली, बेळगांव अशा मार्गानें मुक्काम करीत करीत परत पुण्यास येईपर्यंत हा प्रवास सुमारें एक महिन्याचा झाला. खुद्द गोकर्णास २।३ दिवसच मुक्काम झाला. परत येतांना कारवार, सदाशिव-गड, मडगांव, म्हापसें, सांवतवाडी, मालवण, खारेपाटण, राजापूर, देवरूख, चिपळूण वगैरे ठिकाणीं मुक्काम करीत गोविंदसुत पुण्यास आले. या प्रवासांत त्यांच्या बरोबर बर्वेबंधूंपैकीं रा. लक्ष्मण महादेव बर्वे, चिपळूणचे श्री. केशव भिकाजी बापट, बालामृतवाले श्री. जनार्दन सदाशिव जोशी, रामतीर्थ संस्थान अक्कलकोट येथील भीमदास विश्वंभरदास रामदासी वगैरे बरीच मंडळी होती. आपल्या जन्मभूमीला व कोंकणप्रांताला गोविंदसुतांची ही अखेरचीच भेट आहे असें निष्ठुर काळानें पुढें सिद्ध केलें. राजापूर येथें आपण लहानपणीं शाळेंत शिकत असतां ज्या घरांत राहात होतों तें घर व आसपासची जागा व शाळा हीं सर्व ठिकाणें गोविंदसुतांनीं बरोबरीच्या मंडळीस मुद्दाम दाखविलीं व लहानपणच्या राजापूरच्या सर्व आठवणी सांगितल्या. चिपळूण येथें ८।१० दिवस मुक्काम करून या प्रांतांतील आपल्या मित्रमंडळींस व आप्तेष्टांस त्यांनीं आपलें अखेरचें दर्शन या वेळीं दिलें. श्रीक्षेत्र परशुरामाचेंही त्यांनीं अखेरचें दर्शन घेतलें. या प्रवासांतून परत येतांना गोविंदसुतांना श्वास ( दम ) लागण्याचा विकार जडला. १० पावलें चाललें कीं दम लागावयाचा अशा स्थितींतच साताऱ्यावरून ता. १८।५।३३ रोजीं ते पुण्यास आले. तेथें

५।६ दिवस राहून बरें वाटेना म्हणून मुंबईचे त्यांचे स्नेही सुप्रसिद्ध श्री. आप्पा शास्त्री साठे वैद्य यांच्याकडून औषधोपचार मिळावा म्हणून २४।५।३३ रोजीं ते मुंबईस आले. २६।५।३३ रोजीं "प्राणांतिक अवस्था झाली होती, काळ आला होता, परंतु वेळ आली नव्हती" असा मजकूर गोविंदसुतांनीं आपल्या रोजनिशींत लिहिलेला आहे. यापुढें प्रकृतीच्या अस्वास्थ्याचा मजकूर वेळोवेळीं रोजनिशींत आलेला आहे. मुंबईहून १८।६।३३ रोजीं गोविंदसुत अमळनेर येथें आले. या वेळीं श्वासाचा विकार कमी झाला होता, परंतु पायांत कळ यावयाची व ती विकोपाला जावयाची असा वातविकार नवीनच उद्भवला. या विकाराला संस्कृतमध्यें गृध्रसी व इंग्रजींत 'सायटिका' असें म्हणतात असें तज्ज्ञांनीं निदान केलें. मधुमेहाचा विकार बळावलेलाच होता. डॉक्टरांचे व वैद्यांचे अनेक उपाय करून पाहिले परंतु या वेळीं गोविंदसुतांची प्रकृति एकदम जी खालावत गेली ती पुनः सुधारलीच नाहीं. पायांतील कळांमुळें हिंडणें फिरणें बंदच झालें. दिवसांतून विवक्षित वेळां हा वातविकार फारच विकोपास जात असे. आठवड्यांतून एखाद्या दिवशीं कोणाचा तरी हात धरून मंदगतीनें अमळनेरच्या वाचनालयाच्या बागेपर्यंत त्यांस कसें बसें तरी जातां येत असे. पुढें अन्नपचनही होईनासें झालें व दुधावर अगर मुसंब्याचा रस वगैरे पेयावरच २।३ महिने त्यांनीं काढले; अशा स्थितींतही अंथरुणावर बसून पत्रव्यवहार करणें, वाचन, लेखन, ग्रंथावरून निरूपण वगैरे सर्व बौद्धिक व्यवहार चालूच होते. या दुखण्यांत आतां आपण फार दिवस वांचत नाहीं हें त्यांनीं पूर्णपणें ओळखलें होतें व तसें पुष्कळ स्नेह्यांस पत्रव्यवहारांत ते लिहीतही असत. गोविंदसुत अत्यवस्थ आजारी आहेत असें समजल्यावरून बर्वेबंधूंपैकीं रामचंद्र महादेव बर्वे (ऊर्फ रामभाऊ) हे मुंबईहून व श्री. केशव भिकाजी बापट हे चिपळूणहून त्यांच्या भेटीस अमळनेर येथें २१।११।३३ रोजीं आले. त्यांना पाहिल्याबरोबर गोविंदसुतांचें अंतःकरण प्रफुल्लित झालें व दोन दिवस आपलें सर्व शारिरिक दुःख ते विसरून गेले व प्रकृती अतीशय क्षीण झालेली असतांही या मंडळीबरोबर मुंबईस जाण्याचा त्यांनीं ध्यास घेतला. मुंबईस एक महिनाभर राहून प्रकृति सुधारण्याचा एकदां शेवटचा इलाज करून पाहावयाचा व त्या मुदतींत मुंबई, पुणें, वगैरे बाजूचे आपले पारमार्थिक दृष्ट्या ऋणानुबंधी सर्व स्नेही यांस एकदां अखेर भेटून यावयाचें असा आपला हेतु त्यांनीं सांगितला. या विचारापासून त्यांचें मन परावृत्त करण्याचा सर्वांनीं प्रयत्न केला, परंतु गोविंदसुतांच्या निश्चयाचें बळ अधिक श्रेष्ठ ठरलें व २४।११।३३ रोजीं वरील मंडळीसह ते मुंबईस पोंचले. प्रथम १५।२० दिवस प्रकृतीला जरा हुषारी

वाटली, अर्थात् बर्वेबंधूंच्या खोलीबाहेर कोठेंही जाण्यासारखी त्यांच्या प्रकृतीची स्थिति नव्हतीच. तशा स्थितींतही दररोज सकाळ सायंकाळ अनेक मित्रमंडळी-समवेत अध्यात्मचर्चा चालतच असे. या मुदतींत त्यांस अनेक स्नेहीमंडळी भेटून गेली त्यांत प्रामुख्यानें श्री. हरिश्चंद्रराव शिरोडकर, श्री. रामराव, श्री. दिगंबरपंत जोशी व त्यांचे चिरंजीव श्री. दत्तोपंत जोशी आय्. सी. एस्. (असिस्टंट कलेक्टर भडोच), किहिमचे भिषग्रत्न जगन्नाथ विश्वेश्वर कर्वे, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. कृष्णाजीपंत खाडिलकर, श्री. न. र. फाटक, श्री. वासुकाका जोशी, कीर्तनकार कराडकर, गुरुवर्य दत्तोपंत बापट, विठ्ठलभक्त पांगारकर व त्यांचे स्नेही श्री. सोनोपंत अफजुलपूरकर वगैरेंचा निर्देश केला पाहिजे. श्री. आप्पाशास्त्री साठे व श्री. माधव कृष्ण मराठे वैद्य यांचे उपचार चालूच होते. परंतु रोग असाध्य होता व मुंबईच्या वास्तव्याची ठरलेली एक महिन्याची मुदतही निघून गेली होती. गुरुवर्य बापट यांनीं प्रकृतीची एकंदर स्थिति पाहून अमळनेर येथें ताबडतोब जाण्याचा सल्ला दिला व आपण स्वतः अमळनेर येथें येण्याचें कबूल केलें. अमळनेराहून गोविंदसुतांचा पुतण्या चि. गोपाळ हा मुंबईस गेलाच होता व नातू (मुलीचा मुलगा) चि. नारायण श्रीधर पुरोहित हाही बर्वे बंधूंबरोबर त्यांच्या सेवेसाठीं हजर असेच. ता. ७।१।३४ रोजीं रात्रीं मुंबईहून गुरुवर्य बापट, रामभाऊ बर्वे, चि. गोपाळ व चि. नारायण पुरोहित अशी मंडळी गोविंदसुतांस घेऊन रेलवेनें सेकंड क्लासांतून ८।१।३४ रोजीं सकाळीं जळगांव स्टेशनवर आली. तेथें पूर्वं खानदेशांतील डेप्युटी कलेक्टर श्री. तात्यासाहेब भागवत यांस गोविंदसुतांनीं भेटीस बोलावलें होतें त्याप्रमाणें ते आले होते व आपल्या मोटारींतून जळगांव ते अमळनेर गोविंद-सुतांस पोंचविण्याची त्यांनीं व्यवस्था केली.

गोविंदसुत हे इच्छामरणी होते असें म्हणावें लागतें, कारण अत्यवस्थ दुखण्यांतही ते अमळनेरहून मुंबईस गेले व आपल्या घरीं येऊन देहविसर्जन करावयाचा असा विचार मनांत येतांच मुंबईहून ते अमळनेर येथें आले. मुंबईहून अमळनेरपर्यंत त्यांस सांभाळून आणण्याचें व आपल्या सर्व मुलांबाळांच्या व आप्तेष्टांच्या सान्निध देहविसर्जन करून त्या सर्वांस अंत्यदर्श-नाचा लाभ देण्याचें सर्व श्रेय गुरुवर्य बापट व रामभाऊ बर्वे यांसच आहे या गोष्टीचा येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यावांचून राहावत नाहीं. ८।१।३४ रोजीं सकाळीं १०॥ वाजतां अमळनेर येथें आल्यानंतर सायंकाळीं ७ वाजण्याच्या सुमारास गोविंदसुतांचें प्राणोत्क्रमण पूर्ण शुद्धींत असतांना झालें. शेवटच्या देह विसर्जनाच्या वेळीं त्यांच्या स्वकीयांपैकीं कांहींचा सल्ला असा पडला कीं त्यांस आतुर संन्यास द्यावा. वस्तुतः त्यांचें वर्तन होतें तें संन्याशाप्रमाणेंच होतें. परंतु

धार्मिक समजुतींचें संरक्षण होण्यासाठीं हा विचार निघाला. याबद्दलचे उद्गार गोविंदसुतांच्या कानीं जाऊन शेवटीं त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं " हा विचार तुम्ही मनांत मुळींच आणूं नका, मला मान्य नाहीं. " तेव्हां गुरुबंधु बापट यांनीं त्यांना अंतकाळीं जागृति देण्यासाठीं विचारलें कीं " आपण आपल्या स्वरूपीं जागृत आहां ना ? " तेव्हां त्यांनीं " होय " असें उत्तर दिलें व आमच्या मांडीवर डोकें ठेवून देहविसर्जन केला व आत्मस्वरूपीं लीन होऊन अंतर्धान पावले !



## परशुरामाष्टकम्

राजते यो महेंद्रस्य मूर्ध्नि कृत्वा निजे पदे ।
करुणाशालिने तस्मै नमः परशुधारिणे ॥ १ ॥

मुमुक्षूणां बोधहेतोर्गोविंदसुतशब्दभाग् ।
मालामात्मानुसंधानमितिग्रंथद्वयं व्यधात् ॥ २ ॥

सदात्मनिरतेनापि प्रणीतोत्पथगामिनाम् ।
आध्यात्मिकी धारणाच सत्पथप्रतिपत्तये ॥ ३ ॥

येनामृतांशुगौरेण वचसोत्सादितं तमः ।
भवकूपनिमग्नानां हृदये यदवस्थितम् ॥ ४ ॥

येन संचरता नूनं विश्वतो देशमंडले ।
तीर्थयात्राभिषेणैव दिगन्ताः पावनीकृताः ॥ ५ ॥

विनोदमधुरैर्वाक्यैर्ल्हादयन् शृण्वतोऽनिशम् ।
सत्वरं कश्मलं दूरमुदसारयताखिलम् ॥ ६ ॥

देहस्थोपि न देहस्थो जनस्थोपिच नो जने ।
प्रायः पुण्यपुरेऽवात्सीत् पुण्यापुण्यविवर्जितः ॥ ७ ॥

यद्वक्त्राद्वासुदेवस्य नामामृतमधुस्रवत् ।
अकरोदनिशं लोकं वासुदेवपरायणम् ॥ ८ ॥

इति चिपळूण नगरनिवासिना परशुरामान्तेवासिना विरचितं
परशुरामाष्टकं संपूर्णम् ॥



# गोविंदसुतांच्या ग्रंथांतील सद्बोधसूक्ति

( संग्राहकः—श्री. केशव भिकाजी बापट, चिपळूण )

## प्रास्ताविक सूचना



सन्तः सदैव गन्तव्या यद्यप्युपदिशन्ति न ।
याहि स्वैर-कथास्तेषामुपदेशा भवन्ति ताः ॥ १ ॥

अर्थः— संतांकडे नेहमीं जावें. त्यांनीं मुद्दाम उपदेश केला नाहीं तरी त्यांच्या सहजोद्गारांतही उपदेश असतो.

परमपूज्य कै. गोविंदसुत ही एक एका दृष्टीनें अपूर्व व्यक्ति होऊन गेली. स्वात्मनिष्ठ पुरुष अगोदरच जगामध्यें दुर्मिळ. तशांत तो सर्वजनसुलभ असा फारच विरळा. संप्रदायशुद्ध अशा अध्यात्मविद्येंत पारंगत असलेल्या दुर्मिळ पुरुषांत गोविंद-सुतांची अवश्य गणना केली पाहिजे. त्यांची गौर व अकृश काया, प्रशांत व गंभीर चेहरा, सौम्य व ब्रह्मतेजस्वी डोळे, प्रासादिक वाणी व विनोदी भाषण, बोलण्याच्या ओघांत सहज सुचणारे समर्पक दृष्टांत व चटकदार चुटके, एकंदर साधी राहाणी व उच्च विचारसरणी या सर्व गोष्टी त्यांच्या सहवासांत असणाऱ्यांस किंबहुना त्यांना पहाणाऱ्यांसही त्यांच्याविषयीं आदर व आनंद दिल्यावांचून राहात नसत. समर्थांनीं सांगितलेलें सत्पुरुषाचें अवश्य लक्षण जें "प्रखर वैराग्य उदासीन। प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान" तें त्यांच्या रोमरोमांतून व बोलबोलांतून भिनलेलें दिसून येई. स्वल्प बोलणें परंतु तें सिद्धांतानें भरलेलें, स्थितप्रज्ञाचे साधेसुधे बोल पण भाविक जिज्ञासू श्रोत्यांच्या मनांत स्वात्मानंदाची छटा उठविण्यास मात्र पूर्ण समर्थ, दिसण्यांत साधीं परंतु सुगंधानें चित्तवेध करणारीं जणूं स्वर्गीय पारिजाताचीं सुमनेंच, स्वभाव पूर्णपणें अव्याजमनोहर व परोपकार म्हणजे नित्यकर्म, अशी प्रेममय गोड सुगुण सुंदर मूर्ति गोविंदसुतांची होती.

संस्कृत ग्रंथ मुळांतून वाचण्याइतकें त्यांना संस्कृताचें ज्ञान नव्हतें व इंग्रजींतील तत्त्वज्ञानाचे ग्रंथ वाचणेंही त्यांच्या इंग्रजी ज्ञानाच्या अभावामुळें त्यांना शक्य नव्हतें. पण त्यांचा वाचनाचा हव्यास दांडगा असल्यामुळें कोणी काय कोठें म्हटलें आहे एवढें मात्र त्यांच्या बहुश्रुतपणांतून बहुतकरून सुटत नसे. तसें म्हटलें तर नुसती पटिक विद्वत्ता तरी काय कामाची ? "अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फळा" (परतत्त्व कळलें नाहीं तर शास्त्राध्ययनाचा

काय उपयोग ?) असें आचार्य म्हणतातच. अशा दृष्टीनें पाहिलें असतां गोविंदसुतांनीं आपल्या सूक्ष्म बुद्धीनें पर-तत्त्वाला हात घालून समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें 'जन्मासि येउनी अध्यात्म साधावें' ही गोष्ट केलेली असल्यामुळें भाराभर ग्रंथ वाचून पोपटी विद्वान् बनलेल्या पण अध्यात्मविद्येंत जात्यंधाप्रमाणें असलेल्या कोरड्या विद्वानापेक्षां त्यांची विद्वत्ता व बुद्धिमत्ता अधिक सरस होती असेंच म्हटलें पाहिजे. विद्वानाचें खरें ध्येय किंवा अपेक्षा म्हटली तर वास्तविक 'दिसो परतत्त्व डोळां' हीच असली पाहिजे. पण तशी ती क्वचितच असलेली दिसते. शिवाय बाह्य जगाकडे अखंड वळलेले डोळे मिटल्याशिवाय ज्या डोळ्याला परतत्त्व दिसावयाचें तो अंतर्गत तृतीय नेत्र उघडावा कसा ? विश्वाच्या मौजा व चमत्कार पाहून घटकाभर रंजन होईल, पण तें घटकाभरच. भूत सृष्टी ही विकारी असल्यामुळें त्या विकारी भूत सृष्टीच्या अलीकडे किंवा पलीकडे राहिलेलें परतत्त्व किंवा स्वात्मतत्त्व हातीं लागल्यावांचून अक्षय समाधान होणें शक्य नाहीं. रूपरूपांतरांनीं परिणत होत जाणारी भासमान भूत सृष्टी कोणीकडे व निर्विकार निश्चल अशी आत्मवस्तु कोणीकडे ? अशी आत्मवस्तु जाणणाराच खरा विद्वान् होय.

प्रसंगाप्रसंगानें गोविंदसुतांच्या हातून एकंदर पांच ग्रंथ निर्माण झाले. या त्यांच्या ग्रंथांमधून त्यांचा दासबोध, ज्ञानेश्वरीवरील मार्मिक व्यासंग व संप्रदायशुद्ध विचारसरणी हीं दिसून येतात. आध्यात्मिक भूमिकेवर बसून लीलेनें जगांतील सामान्य लोकांच्या चाललेल्या चळवळी व विद्वानांच्या चळवळी यांचें त्यांनीं बिनचूक चित्र काढलें असून अध्यात्माच्या अभंग पायावांचून उभारलेले वाङ्मयाचे उंच उंच मजले कसे निराधार व सुखसोयीच्या दृष्टीनें अपुरे पडतात हें त्यांनीं उत्तम रीतीनें दाखविलें आहे. मुमुक्षु व बुभुक्षु कोणीही असो, त्याला परिणामीं हितकर काय हें संतवचनांनीं स्वानुभवाच्या बळानें त्यांनीं अनेक ठिकाणीं आपल्या पुस्तकांतून दाखविलें आहे. स्वात्मबोधाचा रवि जिकडे अस्तंगत होतो अशा दिशेकडून मलिन संगतीच्या सांथी येऊन कशा सगळीकडे पसरतात याचें विवेचन त्यांनीं केलें असून स्वकीय संस्कृतीचा व सनातनधर्माचा परंपराशुद्ध अभ्यास ज्यांनीं केला नाहीं अशांना तोंडघशीं पाडून त्यांच्यांत 'तूट व फूट' उत्पन्न करण्यास ही सूर्य मावळविणारी संस्कृति कशी कारण होते हें मोठ्या कळकळीनें व सडेतोडपणानें त्यांनीं सांगितलें आहे. भोगलंपट व रजस्तमोगुणी लोकांस तर त्यांचे ग्रंथ वाचनीय आहेतच पण मुमुक्षुलोकांस तर मननीय व अभ्यासनीय-ही आहेत.

तत्त्वज्ञानाच्या प्रांतांत गोविंदसुतांची भूमिका अत्यंत श्रेष्ठ दर्जाची व स्वानुभूतीची असल्यामुळें त्यांच्या सहजासनावरून काढलेल्या सहजोद्गारांत जिकडे तिकडे निश्चितपणा व स्वप्रतीती हीं दिसून येतात. निराधार तर्क, पोकळ कल्पना, अबोधांतील अनुमानें, अर्धवट हाताळून अर्धवट सोडलेले तात्त्विक प्रश्न, चांचपडत लिहिलेलें नीतिशास्त्र असा गोंधळ त्यांच्या लेखनांत दिसून येत नाहीं. स्वात्मसुखाचें शिखर गांठीपर्यंत जिज्ञासू मुमुक्षूपुढें जे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न उपस्थित होतात व ज्यांचें नीट निरीक्षण करणें त्याला अवश्यक असतें अशा प्रश्नांना अगदीं सुटसुटीत निश्चित उत्तरें त्यांनीं दिलीं आहेत. प्रचलित परिस्थितीसंबंधानें त्यांनीं सडेतोड उद्गार काढले असले तरी त्यांचें खरें अंतरंग अध्यात्मांतच रंगलेलें दिसून येतें व त्यांच्या या सहजोद्गारांतच त्यांच्या दीर्घकालीन आध्यात्मिक तपश्चर्येचें तेज सर्वत्र फांकलेलें दिसतें.

पुढें दिलेल्या त्यांच्या परमार्थविचारमाला व आत्मानुसंधान या ग्रंथांतील निवडक वचनांमध्यें खालील प्रश्नांवर चांगला प्रकाश पडलेला वाचकांस दिसून येईल. भारतीयांचें ध्येय कोणतें, खरा पुढारी कोण, लोकसंग्रह कशाला म्हणतात, परमार्थ म्हणजे काय, चिदचिद्ग्रंथि ती काय, गुरु, शिष्य, उपदेश यांचें लक्षण काय, उपासना कशी करावी, अभ्युदय-निःश्रेयस कशाला म्हणावें, प्रारब्ध-प्रयत्नांत विसंवाद आहे काय, माया-माया ती काय आहे, पंढरी व पंढरीची वारी कोणती, कर्म-अकर्म-निष्कर्म या काय चिजा आहेत, योगाचें स्वरूप काय, नामस्मरणाचें मर्म कशांत असतें, अहंचें स्वरूप काय व तो सत्य, का मिथ्या आहे, विचार आचारांचा मेळ कसा घालावा, विश्वाचें स्वरूप काय, साक्षात्कार हा काय पदार्थ आहे, संतांच्या ग्रंथांत खरोखरी विसंगति असते काय? हे ते प्रश्न होत.

आत्म-शास्त्र-गुरुप्रचीतीच्या बोलांनीं गोविंदसुतांनीं या व इतर कांहीं प्रश्नांना जीं उत्तरें दिलेलीं आहेत त्यांची केवळ स्मरणी करून तीं हस्तगत केल्यानें काम भागणार नाहीं. ॐ कार तंतूनें गुंफलेला हा हार 'कंठगत' करून मुमुक्षूनें जर परेपरत्या परमात्म्याची ओळख करून घेतली तरच या सूक्तींचें किंवा सूक्तांचें सार्थक ! परमार्थविचारमाला व आत्मानुसंधान या दोनच ग्रंथांतून अगदीं छाटाछाट करून ३६५ वचनें निवडून काढलीं आहेत. दररोज एक एक सूक्तीचें मनन करावयाचें म्हटलें तरी एक वर्षाची बेगमी होईल!

केशव भिकाजी बापट, चिपळूण



# गोविंदसुतांच्या सद्बोधसूक्ति

## ' परमार्थविचारमाला '



( १ ) ग्रंथादिकांत प्रवेश करण्यापूर्वी आपल्या चित्तांत अनेक विषयांनीं आधींच प्रवेश केला आहे व चित्तांत विषय आणि विषयांत चित्त, अशा एकरसतेनें बनलेली चिदचिद्ग्रंथि ही अंतःकरणांत वासनारूपानें बसून विषयांच्या नादानें आपणास नादान करीत आहे. ती चित्तांतील विषयग्रंथि सुटून चित्तानें आपल्या चित्स्वरूपाला ओळखावें आणि सर्व विषयांचाही विषय परंतु निर्विषय अशा त्या सच्चिदानंद श्रीहरीच्या पदीं लीन व्हावें.

( २ ) कालचक्रांतील अनंत जन्मांच्या भ्रमणानें ज्या संस्मरणीय सद्वस्तूची आपल्यास विस्मृति झाली आहे, परंतु दुर्लभ अशा भरतभूमींतील मानवदेहांत आपण आल्यानें जिच्या स्मरणाची सुसंधि आलेली आहे ती सद्वस्तु म्हणजे रमारमण हरिगोविंदाचे रमणीय चरणकमल होत.

( ३ ) बद्धांना स्वयंस्फूर्तीनें कृतकर्माचा पश्चाताप होईल तेव्हांच देवाच्या दयेनें ते परमार्थाकडे वळतील.

( ४ ) जेथें शब्दाचा किंवा ग्रंथाचा, चिदचिद्ग्रंथींचा निषेध, तेथेंच सत्यवस्तूंचा बोध असतो.

( ५ ) बोधभूमिका ही कुणाच्या लेखांत नाहीं, मुखांत नाहीं, तर ती निजहृदयसंपुष्टांत आहे.

( ६ ) नरदेहाला येऊन शाश्वत, सुखमय, निरंतर, सदा-उदित, साक्षात् अशा आत्मस्वरूपाची अध्यात्मविचारानें ओळख करून घेऊन तद्रूपतेनें जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त व्हावें हें ध्येय फक्त भारतीयांपुढेंच आहे.

( ७ ) चातुर्वर्ण्य, दैवी संपत्तीचीं सव्वीस लक्षणें व सत्वांश ही जन्मजात गुणकर्मविभागशः वंशपरंपरागत प्रत्येक व्यक्तींत, तशीं समाजांत, राष्ट्रांत स्वे स्वे कर्मण्यभिरत राहून जिवंत ठेविलीं कीं या कामधेनूच्या आश्रयावर नुसतें स्वराज्यच काय, पण ब्रह्मींचें राज्य हातीं येतें.

( ८ ) आरंभीं धर्म आणि शेवटीं मोक्ष, यांच्यामध्यें अर्थ आणि कामेच्छा ठेवून, धर्मअर्थकाममोक्ष हा पुरुषार्थ साधण्याचें उच्च ध्येय पूर्वजांनीं आपल्यापुढें ठेविलें आहे; यालाच अभ्युदय व निश्रेयस् म्हणतात.

( ९ ) भारतीयांचा प्रपंच विश्वकुटुंबी असून परमार्थीकरतां आहे.

( १० ) आत्मा बोधरूप आहे, म्हणून तो मनाचा, तर्काचा, विद्वत्तेचा विषय नसून केवळ निश्चयात्मिका बुद्धीचा विषय आहे.

( ११ ) बौद्धिक-आध्यात्मिक धारणा व तिची परंपरा समाजांत जेणें करून जागृत राहील, त्याच्या ( समाजाच्या ) मार्गांत संकटें आल्यास त्याच्या निवारणार्थ चातुर्वर्ण्य व्यवस्था ' स्वे स्वे कर्मण्यभिरत ' जय्यत राहील, दैवी संपत्तीचें दैविक तेज राष्ट्रांत प्रज्वलित होईल अशी व्यवस्था ठेवणें, हा सनातनधर्मांतर्गत खरा लोकसंग्रह होय.

( १२ ) लोकशाहीचें विलायती खूळ राजकारणांत, तसें धर्मांतही या पुढाऱ्यांच्या फुसलावणीनें शिरलें आहे. यामुळें प्रत्येक व्यक्ति धर्ममार्तंड, शंकराचार्य बनून आपल्या मिरवणुकी काढून घेत आहे !

( १३ ) मनाला स्वातंत्र्य दिलें कीं, बुद्धीचें स्वातंत्र्य लोपलेंच, म्हणून बुद्धि शुद्ध राहाण्यासाठीं मनाला शास्त्रोक्त बंधनांत ठेवण्याकडे आर्यपरंपरेचा कल आहे.

( १४ ) निर्भेळ किंवा वसाहतीचें स्वराज्य मिळण्याला जो पराक्रम लागतो तो अंगांत कधीं येईल तो येवो, पण तूर्त ही तरुणांची लोकशाही घरच्या म्हातारीचा काळ होऊन, ज्या महात्म्यांनीं दूरदृष्टीनें हीं धर्मबंधनें घातलीं त्या स्वर्गस्थ पवित्र पूर्वजांना मात्र ' झक मारली आणि हीं बंधनें घातलीं,' असा पश्चात्ताप होऊन त्यांना सळो का पळो करण्याला लावणार !

( १५ ) अनार्यांच्या धारणेंत ही शाश्वत बौद्धिक सनातन धारणा नसल्यामुळें देहाभिमान आणि देशाभिमान याच्या पलीकडे त्यांची धारणा जातच नाहीं.

( १६ ) सनातन धर्माभिमान हा सनातन, तसा व्यापक, विश्वकुटुंबी आहे, म्हणून देशासाठीं नव्हे तर धर्मासाठीं मरावें.

( १७ ) हरिभजन, राजकारण, सावधपण व साक्षेप ( दास. ११-५ ) ही समर्थांची चतुःसुत्री होय.

( १८ ) ज्या आर्यमातेच्या उदरांतून जगदुद्धारार्थ वेदोपनिषदादि आध्यात्मिक संपत्ति निर्माण झाली, रामकृष्णादि अवतार, वसिष्ठ, वामदेव, व्यास, भीष्मद्रोणादि हजारों सुपुत्रांनीं आपल्या सच्चरित्र्यानें सर्व जगाला थक्क करून सोडणाऱ्या भारत, भागवत, रामायणादि सद्ग्रंथांना सुशोभित केलें; ज्या भरतभूमीनें रामराज्याप्रमाणें हजारों वर्षें स्वराज्य उपभोगिलें; अखिल ज्ञान, कला, विद्या, ऐश्वर्य यांचें जी आर्यमाता माहेरघर व सर्व

जगाला गुरुस्थान, चातुर्वर्ण्य, दैवी संपत्ति सत्त्वांश ही ज्या आर्यमातेची सर्वोत्कृष्ट संपत्ति, निर्गुण सायुज्यमुक्ति हें जिचें त्रिकालाबाधित ध्येय, त्या आर्यमातेला जिवंत ठेवणें हीच आपली इतिकर्तव्यता होय.

( १९ ) ज्या राष्ट्रानें परंपरा, शिस्त आणि शास्त्रमर्यादा सोडली, तें राष्ट्र मृत होय.

( २० ) मी आर्य आहें ही स्फूर्ति एकदां अंतरांतून बाहेर आली कीं, देहानें आर्यत्वाच्या आचारविचाराचा पोषाख अंगावर चढवलाच समजा ! मग विजयश्री हंसत तुमच्या गळ्यांत माळ घालील !

( २१ ) आध्यात्मिक ज्ञानाला आधिभौतिकाची किंमत कळते. पण आधिभौतिक ज्ञानाला अध्यात्म्याची महती कळत नाहीं. म्हणून त्याला सद्गुरुबोधच पाहिजे व तो गुह्याद्‌गुह्यच राहाणार.

( २२ ) उत्तम शेती, मध्यम व्यापार व कनिष्ठ नोकरी, हा न्याय जसा व्यवहारांत तसाच परमार्थांतही लागू आहे. कर्म-उपासनाज्ञानानें कसून मेहनत करून परमात्म तत्त्वसार संपादन करणें ती उत्तम शेती; नुसतीच देवाची करुणा भाकून त्याच्याजवळ प्रापंचिक सुख मागणें, म्हणजे देवाणघेवाण करणें हा मध्यम व्यापार; आणि उठला सुटला आपली देवाची सेवा करायची, मग होईल तें होवो, ती कनिष्ठ नोकरी होय.

( २३ ) आत्म्याला लागलेल्या घोरनिद्रेच्या पंचीकृत प्रपंचाच्या रात्रींतील मानवदेह हा पंच पंच उषःकाल होय !

( २४ ) या पिंडब्रह्मांडात्मक उपाधीचा प्रत्यग्बोधानें निपटून निरास करून, त्याचें निर्बीज करून, मतें आणि मतांतरें चटसारीं घालवून तत्त्वांतीं उरलेल्या तत्त्ववस्तूंशीं तादात्म्य करणें, तद्रूप, तल्लीन होणें, किंबहुना मूळचेंच तादात्म्य, तद्रूपता, तल्लीनता आहे, ती मानवदेहांत ओळखून घेऊन परमात्म्याला प्राणाहूनही प्रिय असा ' तत्त्वतः वेत्ति ' ( गीता ७-३ ) भक्त होणें याचेंच नांव परमार्थ.

( २५ ) गोड वाणीचे, बुद्धिमान्, शास्त्री, पंडित, विद्वान्, पदवीधर, धनिक, व्यवहारज्ञ, तार्किक इ. बहुत आहेत; परंतु अध्यात्मविचारानें आत्मप्राप्ती करून घेणारा पारमार्थिक फारच दुर्लभ होय.

( २६ ) ' कोऽहम् ' चा प्रश्न सोडवण्याच्या मार्गांत जो असेल, त्यालाच सद्गुरु भेटतील.

( २७ ) आपण परमात्मरूप आहोंत हा बोध होणें याचेंच नांव सद्गुरुकृपा होय.

( २८ ) आधिभौतिक दृष्ट्या आपण कितीही सुधारलों तरी आध्यात्मिक दृष्ट्या आपण निःसंशय अधःपाताला जात आहोंत हें आजकाल कोणाच्या ध्यानीं मनींही येत नाहीं, हें आश्चर्य होय !

( २९ ) आत्मप्राप्तीला स्वयंमन्यता, तर्कप्रतिष्ठा, व्युत्पत्ति यांचें वावडें आहे.

( ३० ) हरि हृदयांत प्रगट होईंपर्यंत सर्व ठकाठकी व भ्रांतीची भुताटकीच होय.

( ३१ ) दुर्लभ काय आहे ? आत्मलाभाची इच्छा होणें दुर्लभ आहे.

( ३२ ) प्रकृतिभ्रम नाहींसा होणें म्हणजेच हरीचा उदय होय.

( ३३ ) जड, चंचल निश्चलरूपानें प्रकृती एकच आहे. ती जडामुळें कर्मरूप, चंचळामुळें उपासनारूप व निश्चलामुळें ज्ञानरूप बनली आहे म्हणून कर्म, उपासना, ज्ञानरूपानें कर्तृत्ववान् बनलेली एकच प्रकृती ज्यांत पडेल, तद्रूप ती बनते, हा या मानवी प्रकृतींत मोठा गुण आहे.

( ३४ ) अध्यात्मज्ञानानें अंतर्बाह्य मोकळा होऊन लोकसंग्रहार्थ पुढें येईल, तोच खरा पुढारी होय.

( ३५ ) कर्म, उपासना, ज्ञान या त्रिवेणीवर सद्गुरु बोधानें आपलें पिंडदान आपल्या हातानें झालें पाहिजे.

( ३६ ) बोधस्वरूप परमात्म्यायोग्य जर वधू असेल, तर ती मानवी मतिच होय.

( ३७ ) मकारांतून इंद्रियद्वारा जें कर्तृत्वाला आलें तें कर्म होय.

( ३८ ) ' अ ' म्हणजे कांहीं नाहीं असें जें निरामय, शून्य आकाश, त्यांतून ' हम् ' ही आकाशतन्मात्रा किंबहुना आकाशवाणी स्फूर्तिरूपानें निघाली, ती अहम् बनली.

( ३९ ) ॐ मधून व्योम निघालें. व्योम मधून " अहम् स्फूर्ति " निघाली तीच माया होय.

( ४० ) आपला पिंड हें एक शीत चांचपलें कीं, सर्व ब्रह्मांडाचा निवाडा त्यावरून देतां येतो.

( ४१ ) साक्षात् मीच ॐ असल्यामुळें मला कोणी माझ्या पालनपोषणार्थ पाळण्यांत ठेवलेल्या नांवानें हाक मारली, तरी मी माझ्या मूळच्या ॐ च्या रूपानें ओ म्हणून पुढें सरसावतों. अर्थात् माझ्यामध्यें ॐ भरला आहे आणि ॐ मध्यें सर्व मीच भरलों आहे.

( ४२ ) अहम् आणि इदम् एकाच महत् ब्रह्मांतून आलीं.

( ४३ ) प्रपंचरूप अश्वत्थवृक्षाच्या अधऊर्ध्व शाखांचें मूळ मानवदेहांत आहे, म्हणून या देहाची योग्यता मोठी आहे.

( ४४ ) आत्मबोधानें होणारें सुख भोगण्याचा अधिकार त्या अहमूचा नसून शुद्ध बुद्धीचा आहे.

( ४५ ) कल्पनेपासूनच अष्टधा प्रकृती झाली, म्हणून ती नुसतीच सौभाग्यवती नसून अष्टपुत्रा सौभाग्यवती आहे !

( ४६ ) जो कल्पनेंत आला तो मुळीं आत्माच नव्हे.

( ४७ ) आध्यामिकदृष्ट्या कल्पनेबरोबर जग उत्पन्न होतें आणि कल्पनेबरोबर लयाला जातें.

( ४८ ) आपण हे जे वर डोकें खालीं पाय असे दिसतों ते प्रथम आकाश डोक्यांत, वायु नाकांत, तेज मुखांत, जल पोटांत आणि धरित्री पायांत घेऊन बसलों आहोंत.

( ४९ ) आंधळें धड व डोळस डोकें यांच्या अन्योन्याश्रयानें आमचें कर्म चाललें आहे.

( ५० ) सर्वांचें मूळ वाटोळें आहे. आमचें कर्माचें चक्रही वाटोळेंच. कारण कोण व कार्य कोण, हें या चक्रांतून काढतांच येत नाहीं.

( ५१ ) कल्पनेंत असून कल्पनातीत, कर्मांत असून कर्मातीत, विश्वांत असून विश्वातीत जे आपण, ते क्षणभर कल्पना टाकून स्वस्थ म्हणजे स्वरूपीं स्थित होण्याचा नित्य अभ्यास करूं तर किती मौज होईल बरें ?

( ५२ ) आत्म्याला ब्रह्मरूप, कल्पनारूप, गुणरूप, कर्मरूप कल्पिणें हीच माया होय.

( ५३ ) प्रत्येक ग्रहाला त्याच्या आंसाभोंवतीं फिरण्याची एक व सूर्याभोंवतीं फिरण्याची एक अशा दोन्ही गती सूर्याच्या गुरुत्वाकर्षणानेंच मिळतात. त्याप्रमाणें प्रत्येक प्राण्याला आपल्या प्रारब्ध कर्माभोंवतीं फिरण्याची एक व सृष्टिक्रमाप्रमाणें फिरण्याची एक अशा दोन्ही गती सृष्टीच्या गतीच्या आकर्षणामुळेंच मिळतात.

( ५४ ) पुत्राचें, धनाचें, बायकोचें इ० नाशवंत वेड तेव्हांच लागतें पण शाश्वत अशा श्रीरामाचें वेड कांहीं लागत नाहीं.

( ५५ ) परमेश्वराच्या संकल्पाचें प्रतिबिंब आपल्यांत उतरलें आहे. 'एकोहम् बहुस्याम्' हा परमेश्वराचा संकल्प, त्याप्रमाणें आम्ही एक असतांना अनेकाकार होतों.

( ५६ ) विश्व पाहून तुम्हांला परमेश्वर दिसतो काय ? नाहीं ! कारण, " जग निर्मिलें जेणें । तो वेगळा पूर्णपणें " ( दास. ८-१-४० ). तेव्हां जग पाहून तुम्हाला जर ईश्वर दिसत नाहीं तर आमच्या शरीराकडे पाहून तरी आम्ही तुम्हांला दिसतों असें तुम्हांला म्हणवेल काय ? जगाहून वेगळा जर परमेश्वर आहे तर आम्हीही देहाहून वेगळेच आहोंत !

( ५७ ) विश्वंभरासकट सर्व जीवांचीं चक्रें आपआपल्या आत्मस्वाच्या भोंवतीं फिरून एका योनींत जन्मल्यापासून मरेपर्यंत एक चक्राची गति, अशा रितीनें चौऱ्यायशीं लक्ष योनींतील आमचे गरके एका विश्वंभराच्या अस्तित्वावर चालले आहेत.

( ५८ ) आत्मस्वरूपाचा यथार्थ बोध नसण्याच्या अवकाशांत, आकाशांत, शून्यांत, भ्रमांत विश्वंभरापासून तों आम्हां जीवांपर्यंत सर्व विश्व उत्पन्न होऊन त्यांत सुख, दुःख, ज्ञान, अज्ञान, काम, वासना, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, शांति, दया, जन्म, मृत्यू, स्थिति, गति इ० विकार उत्पन्न झाले आहेत.

( ५९ ) सद्गुरुबोधानें कर्माहून आपण वेगळे होऊं, त्याच वेळीं 'कर्ता करविता ईश्वर आहे,' असें म्हणण्याचा अधिकार आपल्यास येईल; नाहीं तर ' भोगून अभोक्ता म्हणती । हे तो अवघीच फजिती !' ( दास. १७-६-३१ )

( ६० ) कार्य तेंच कारण होतें व कारण तेंच कार्य होतें आणि कार्य-कारणात्मक कर्म होतें.

( ६१ ) औट हाताच्या पंढरीची वारी करणाऱ्या वारकऱ्यांनीं या अर्ध मात्रेच्या चंद्रभागेंत निःसंदेहाचें स्नान केलें तरच पुढें अवीट अशा विटेवरील पंढरीरायाचें परमात्मस्वरूपांत खरें दर्शन होतें.

( ६२ ) जन्मभूमि, कर्मभूमि, रंगभूमि आणि स्मशानभूमि असे चारही प्रकार कालमहात्म्यानें होत असतात.

( ६३ ) ' एकोहं बहु स्यां बहुरहं एकःस्याम् ' अशा विश्वंभराच्या संकल्पाप्रमाणें आपल्याही कल्पनेचा कारखाना चालला आहे !

( ६४ ) ' परतत्वा अरौतें व स्थावरा आंतौतें, ' जें कांहीं होतें जातें तें सर्व स्थळ व काळ यांनीं व्यापून टाकलें आहे. पण परतत्वापरौतें जें आहे त्याला शिवण्याची कालस्थलाची कांहीं प्राज्ञा नाहीं.

( ६५ ) जड चंचलात्मक सृष्टींतील सूर्याचा प्रकाश हा जड चंचलाला प्रकाशित करतो, पण अध्यात्मवस्तूही प्रकाशित करण्याला ज्ञानसूर्यच पाहिजे.

( ६६ ) देहाकरितां जगावें, आपला तळीराम गार करावा, त्याकरितां बाकीचे देश पादाक्रांत करून तुडवावे हें इतर देशांचें ध्येय, तर धर्माकरतां जगावें, धर्माकरतां मरावें, हें भारतीयांचें ध्येय.

( ६७ ) दैवी संपत्तीचीं २६ लक्षणें भगवंतांनीं ( गीता, अ. १६ ) स्वमुखानें सांगितलीं आहेत. त्यांतील एकही लक्षण संपादन करण्याचा कोणीही पुढारी प्रयत्न करीत नाहीं.

( ६८ ) कल्पनेचा जगांत संचार नसून जगच कल्पनेंत संचार करतें.

( ६९ ) आपलें अंतर हेंच ब्रह्मपुर असून त्यांतच आत्मारामाचा शोध करावयाचा आहे. [ छांदो. २६–८ ]

( ७० ) हरीलाच नामानिराळा करून आपण अहंपणानें मध्येंच घुसल्यामुळें सुखदुःख इत्यादिकांचे आघात आपल्यास सोसावे लागतात.

( ७१ ) विश्वच मुळीं चक्राकार, म्हणून विश्वाकार कर्मही चक्राकारच आहे.

( ७२ ) विश्वंभराच्या भवचक्राच्या अग्निगाडींत आपण बसलों म्हणजे ही गाडी कशी चालेल, इंजनांत कोळसा कोण घालील, वेग कसा मिळेल ही काळजी आपणास नको, त्याचा धनी वेगळाच आहे !

( ७३ ) आकाशांत ज्याप्रमाणें दिवस व रात्र नांदतात, त्याप्रमाणें आपल्या देहांत किंबहुना एकंदर विश्वकुटुंबांत प्रारब्ध आणि प्रयत्न समसमान नांदतात. प्रारब्धाशिवाय प्रयत्न नाहीं, प्रयत्नावांचून प्रारब्ध नाहीं.

( ७४ ) प्रारब्ध आणि प्रयत्न हे शब्द भिन्न असले तरी मागून पुढून कर्मच आणि ते उभय वाद्यांच्या मागें, ज्ञानी असो अज्ञानी असो, लागलेलेंच आहे; मात्र ज्ञानी हे त्यांत असून नसल्यासारखेच असतात.

( ७५ ) ज्या शरिराच्या अधिष्ठानावर आपण विषयांनीं सुखी होऊं म्हणून मानतों, तें शरीरच मुळीं आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक या तापत्रयांनीं ग्रासलेलें आहे.

( ७६ ) सद्गुरुकृपेनें चिद्चिद्ग्रंथि सुटली नाहीं तेथपर्यंत कर्माच्या पोटीं हा प्रारब्धप्रयत्नाचा वाद व त्याचा अहंकार जगाच्या अंतापर्यंत कायम राहाणार.

( ७७ ) प्रारब्ध किंवा नशीब हा शुभाला आणि अशुभाला एक टेंकूच आहे. बाकी, मागून पुढून चालला आहे तो प्रयत्नच आहे. मानतों नशीब आणि करतों प्रयत्न, अशीच आमच्या प्रारब्ध-प्रयत्नांची रचना आहे.

( ७८ ) आमचें आम्हींच स्वांगानें परमार्थ केला तर होणार आहे. पण त्याला सद्गुरुकृपाच पाहिजे. आम्ही स्वतः उभे राहिलों कीं, मग देह, कर्म, प्रारब्ध, प्रयत्न इत्यादि घट सगळे अनुकूल होतील.

( ७९ ) 'प्रयत्नांतीं परमेश्वर' म्हणतात तें खोटें नाहीं ! आमचा प्रयत्न परमेश्वरासाठीं मुळींच नसून विषयसुखार्थच असतो. तेव्हां प्रयत्नाअंतीं परमेश्वर कसा भेटेल ?

( ८० ) आत्मशोधनाचा प्रयत्न केला कीं, सद्गुरुबोधाचें प्रारब्ध फळास आलेंच समजा.

( ८१ ) या देहाच्या पूर्वीचें जें कर्म तें प्रारब्ध व देहाकडून जें कर्म होत आहे तो प्रयत्न अशीं नांवें देहाच्या उपाधीनेंच आलीं आहेत. वस्तुतः चालला आहे हा प्रकृतीचा स्वभावच होय.

( ८२ ) जन्माच्या पोटांतच जसा मृत्यु तसा प्रारब्धाच्या पोटांतच प्रयत्न. अशा रितीनें प्रारब्धाचा व प्रयत्नाचा एकमेकांत संबंध आहे. पण त्यांचा आपल्याशीं अर्थाअर्थीं संबंध आहे का ?

( ८३ ) या पूर्व प्रारब्धानें आपल्याशीं जो अपूर्व संबंध जोडला आहे व आपल्याला पुढें करून आपण मागें राहिलें आहे, त्याला विचाराच्या चवाठ्यावर आणलें तर झट्दिशीं त्याचा निकाल लागतो.

( ८४ ) बोधरवीचा उदय आपल्या अंतरांत होऊन आपण "यो बुद्धेः परतस्तु सः ॥" ( गी. ३-४२ ) अशा प्रकारचे बोधरूप झाल्याशिवाय आपल्यास जग मिथ्या म्हणून चालावयाचें नाहीं.

( ८५ ) "ॐ तत्सदिति निर्देशा" नें अखिल कर्मांचें अर्पण, तर्पण, समर्पण करून "नमम" म्हटल्यावांचून कर्मांतून सुटका नाहीं.

( ८६ ) आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं मायोपाधि जगडंबर सत्य नाहीं, हें खरें, पण जेथपर्यंत आपलें अंतःकरण आत्मबोधानें परिपक्व झालें नाहीं, तेथपर्यंत जग निर्माण करणाऱ्या मूळ पुरुषाला सोडून कांहीं चालावयाचें नाहीं.

( ८७ ) पाळण्यांत पालनपोषणार्थ ठेवलेल्या नांवाचा अहंकार न घेतां 'मी' चें जें शुद्धबद्ध स्वरूप तोच देव, आदिपुरुष आत्माराम होय !

( ८८ ) परमार्थासाठीं अनेक साधनें आपण अहोरात्र करीत असतां, पण त्या साधनांनीं आत्मबोध होईल असें बौद्धिक तप त्यांत काय आहे तें पाहिलें पाहिजे.

( ८९ ) आत्मबोधानें निःसंदेह म्हणजे निःसंशय आणि देहातीत साधुमहाराज झाले आहेत का नाहींत याची काय तुम्हीं खात्री करून घेतली आहे ? आणि त्यांच्या त्या ज्ञानाचा आपल्यास उपयोग होईल याबद्दल आपण काय खात्री करून घेऊन दर्शनास जातां ?

( ९० ) तत्वविचारानें आत्मबोधाचें माप पदरांत घेऊन निःसंदेह वस्तुरूप झालेले महात्मे फारसे मिळतच नाहींत.

( ९१ ) राष्ट्रांत दैवी संपत्ती जागृत असेल तर स्वराज्यच काय, पण स्वर्गाचें राज्यही हातीं येईल.

( ९२ ) परमात्मबोधरवीचा अंतःकरणांत स्वानुभूतीनें उदय झाला नसेल तर मनुष्य षड्दर्शनादि शास्त्रांच्या पाशांत सांपडून नुसता शास्त्रसंपन्न होतो.

( ९३ ) आत्मारामाच्या आड आपल्या अंतर्यामीं अज्ञानाचा पडदा आहे तो श्रीहरिगुरुकृपेनें दूर झाला पाहिजे; तरच आत्मबोध होईल.

( ९४ ) अनधिकाऱ्याच्या हातीं ग्रंथ जाणें म्हणजे माकडाच्या हातीं कोलीत देणें होय. आजकाल परंपरा सोडून केवळ विद्वत्तेच्या घमेंडीवर स्वयंमन्यतेनें अध्यात्म ग्रंथ वाचून तर्ककर्कश चिकित्सक मंडळी फार झाली आहे.

( ९५ ) गीता, दासबोध इ० ग्रंथ ज्याला अध्यात्मदृष्ट्या पाहावयाचे असतील त्यांनीं राजकारणी किंवा तर्ककर्कश विद्वानांच्या मुखानें न ऐकतां स्वात्मानुभवी सत्पुरुषाच्याच मुखानें ऐकलें पाहिजे.

( ९६ ) ज्या कोणा भाग्यवानाच्या उदरीं हरी प्रगट होईल, त्याच्या कर्मांत, भक्तींत, योगांत, ध्यानांत, मनांत, तुर्येत, उन्मनींत, श्रवणांत, मननांत, स्मरणांत, विस्मरणांत, साक्षात्कारांत, आंत, बाहेर, जिकडे तिकडे हरीच हरी सहज होऊन जाईल.

( ९७ ) नामस्मरण करावयाचें तर आपल्यास जें अवगत असतें परंतु आठवत नाहीं, त्याचें स्मरण होय. मग देव आपल्याला अवगत झाल्याशिवाय त्याचें स्मरण कसें होणार ?

( ९८ ) आत्मसाक्षात्काराची परीक्षा अंतर्मुखज्ञानीच करूं जाणतात.

( ९९ ) ज्यानें जी जन्माची इतीश्री मानली असेल, तेंच त्याचें ब्रह्म असल्यामुळें खऱ्या ब्रह्माचा बोध त्याच्या अंतःकरणांत होणें शक्य नाहीं. म्हणून आत्मबोध हा विषय सर्वांचा नसून केवळ मुमुक्षूंचा आहे.

( १०० ) द्रष्टेपणाचाही अंत करून तूं आपल्या द्राष्टांतिक स्वरूपाकडे पाहाशील तर त्याला दृष्टीसृष्टींतील दृष्टीच्या आंतील दृष्टांत देऊन तुझें कोण वर्णन करणार ? तुझ्या ओळखण्यांतच ब्रह्माचा बोध आहे.

( १०१ ) अहं ब्रह्मास्मि या मंत्रानें मंतरलेले सर्प बहुत आहेत, पण सहजसिद्ध जातीचा सर्प विरळा !

( १०२ ) बोधरूप परमात्म्याचा बोध बुद्धीलाच होणार आहे. म्हणून नरदेहाला आलेल्या ज्याला आत्मज्ञानानें मुक्त व्हावयाचें असेल त्यानें आचार विचारानें बुद्धि स्वच्छ ठेविली पाहिजे.

( १०३ ) दैवी संपत्तीचीं लक्षणें अंगीं मुसमुसून तुम्ही दैववान व्हाल, तरच स्वराज्यप्राप्ती होईल. गुणकर्म विभागशः उत्पन्न झालेलें त्रैगुण्य आणि चातुर्वर्ण्य ब्रह्मदेवालाही आतां एका गुणांत आणणें शक्य नाहीं.

( १०४ ) आपल्याला असें वाटतें कीं, आपल्या डोळ्यांदेखत मायेनें निघून जावें. पण आपला डोळा अर्थात् कल्पना हीच मुळीं माया आहे. त्या मायेचें मूळ आपलेंच अंतःकरण, हीच मूळ माया, ती कल्पनारूपानें आपल्या डोक्यावर बसून शिरजोर झाली आहे व आपल्याला नाचवीत आहे.

( १०५ ) कल्पनामायेचें निर्मूळ कल्पनेनेंच करावयाचें आहे.

( १०६ ) मीचें निर्मूळ केल्याशिवाय आत्मबोध होणें शक्य नाहीं.

( १०७ ) अध्यात्मामध्यें देव विचाराचा, मुक्ती विचाराची, साधन विचाराचें, मिळून सर्व विचाराचें साम्राज्य आहे.

( १०८ ) ज्या ज्ञानावर आपण अहोरात्र सर्व व्यवहार करतों, तें ज्ञान कोठून येतें याचा शोध लावण्याची कोणालाच इच्छा होत नाहीं, हाच मोह होय.

( १०९ ) पंचभौतिक पिंडब्रह्मांडांतर्गत जो अहम् ब्रह्मांडांतून पिंडांत येतो व पिंड पडला कीं ब्रह्मांडांत लीन होतो, तो व्यक्ताव्यक्त किंवा क्षराक्षर प्रतिबिंबित अहम् असून, क्षराक्षरातीत अहम् हा उत्तम पुरुष; तो वेगळा आहे.

( ११० ) ' मी जीव ' हेंच अज्ञान होय.

( १११ ) मी किंवा अहम् हा नुसता भास असतांना त्याचा आपण विचार करीत नसल्यामुळें तो अहम्च येथें ब्रह्म होऊन बसला आहे.

( ११२ ) या महत् ब्रह्म होऊन बसलेल्या मीचा मुळांतच आत्मानात्म-विचारानें शोध केला, तर मी हाच मुळांत लटका ठरेल आणि त्या मीवर

माझेपणाची जी पोकळ पण डौलदार उभारलेली सुखदुखा:त्मक इमारत, ती सपशेल आपोआप ढांसळून पडेल.

( ११३ ) निवृत्तिमार्गांत आपण मीचा विचार न केल्यामुळें खऱ्या स्वरूपाला मुकलों, त्याप्रमाणें प्रवृत्तिमार्गांत आपण आपलें चातुर्वर्ण्यात्मक स्वरूप आणि तेज परंपरागत मार्गानें जागृत ठेवण्यास विसरलों, म्हणून स्वातंत्र्याला मुकलों.

( ११४ ) अंतर्मुख वृत्तीचे लोकच अध्यात्मशास्त्र जाणण्याचे अधिकारी असून बहिर्मुख वृत्तीच्या लोकांनीं संतांच्या ग्रंथांतील नुसतें वाक्चातुर्यच पाहात राहावें.

( ११५ ) शब्दार्थाच्या पलीकडे अर्थाचाही अर्थ, गूढार्थ किंवा रहस्यार्थ असतो, तो प्रगट झाल्याशिवाय अध्यात्मिक ग्रंथ लागला असें म्हणतां येणार नाहीं.

( ११६ ) अध्यात्म हा विषय बद्धांचा किंवा सिद्धांचा नसून मुमुक्षूंचा आहे.

( ११७ ) दैवी संपत्ति, ब्राह्म व क्षात्रतेज हें आर्यभूमीचें पौरुष आहे. तें राष्ट्रांतून नष्ट झाल्यामुळें आपल्याला अवदशा आली आहे.

( ११८ ) संतांचे ग्रंथ हे ज्ञानमुद्रेचे ठसे आहेत. परमेश्वराचे सहज श्वासोच्छ्वास हे जसे वेद, तसे संतांचे ग्रंथ हे त्यांचे सहज श्वासोच्छ्वास होत.

( ११९ ) नकाशाशिवाय भूगोलाचें ज्ञान होत नाहीं, तद्वत् सांप्रदायपूर्वक हृदयांतील स्वात्मानुभूतीचा नकाशा सज्जनसंगतींत राहून घेतल्याशिवाय आणि त्यांच्याच मुखानें अध्यात्मग्रंथश्रवण केल्याशिवाय सद्गत नाहीं.

( १२० ) ज्ञानगंगेच्या शुद्धोदकांत मनाचें निमज्जन होऊन तें रामरंगांत रंगून जाईल, तरच तें खरें मनोरंजन होय.

( १२१ ) दैवी संपत्तीला प्रोत्साहन देणाऱ्या संतचरित्रांचीं पुस्तकें काढावयाचीं टाकून जो उठतो सुटतो तो आपला आकाशांत भराऱ्या मारून प्रेमळा, सुमिला, विमला, दुर्मिळा, कमळा, इ. कांच्या चटणी कोशिंबिरींच्या अगर अशाच प्रकारच्या नर–मादीच्या, कावळा–चिमणीसारख्या गोष्टींनीं भरलेल्या कादंबऱ्याच काढतो ! नाटकांना तर काय हल्लीं ऊतच आला आहे !

( १२२ ) जो आत्मज्ञानानें स्वस्वरूपाशीं विभक्त राहिला नाहीं, तो भक्त.

( १२३ ) संतांचे ग्रंथ जितके आपल्यास सोपे दिसतात, तितके ते नाहींत. जागजागीं त्यांनीं सद्गुरूच्या मेखा ठोकल्या आहेत त्या गुरुअंजनाशिवाय उलगडतां येणार नाहींत.

( १२४ ) ज्या एका अव्यक्त तत्वामध्यें हीं सर्व दृश्य तत्वें लीन होतात, असें जें एक अज्ञेयतत्व तें ज्या एका अधिष्ठानावरून भासतें, तें अधिष्ठानच मुळीं भ्रमात्मक असून त्या भ्रमाच्याही अलीकडे असें एक क्षराक्षरातीत तत्व आहे कीं त्याचा उदय झाला असतां हें अज्ञेय तत्व, कीं ज्यापासून हें सर्व व्यक्तीला येतें असें दिसतें तें अव्यक्तच पार नाहींसें होतें, हा आमच्या संतांचा स्वानुभवाचा सिद्धांत आहे !

( १२५ ) संतांच्या ग्रंथांतून जे नानाप्रकारचे चित्रविचित्र रंग दिसतात, असंबद्धता व विसंगतता दिसते, यांतील इंगित हें कीं, यांतील एकही रंग खरा नसून निश्चलत्वाचा रामरंग तेवढा मात्र खरा असतो !

( १२६ ) त्याप्रमाणेंच पंचकोशातीत अशा स्वात्मारामापाशीं संतांचा जो सहजासनावर बसून सुखसंवाद होत असतो आणि त्याचें प्रतिबिंब त्यांच्या ग्रंथांत उमटतें, त्याचें अनुमान आम्हीं शब्दांच्या कोशांतून अर्थ पाहून करूं लागलों तर तें आपणास कसें समजणार ?

( १२७ ) आपल्यांत जे दुर्गुण असतील ते नाटकरूपानें चव्हाट्यावर मांडून त्यांचा खेळखंडोबा करून ते घालवावयाचे हें दिलें सोडून आणि ज्या साधुसंतांचें रोज प्रातःस्मरण करावयाचें, त्यांचीं करूं लागलों आपण नाटकें !

( १२८ ) आत्मप्रचीति, गुरुप्रचीति आणि शास्त्रप्रचीति यांची एकवाक्यता होऊन निःसंदेहता प्राप्त होते, अशा प्रकारचा सत्य उपदेश करणारा तोच खरा गुरु होय.

( १२९ ) परेपरत्या परमात्म्याचें ज्ञान प्राप्त झालें कीं, हें विद्वत्तापूर्ण आधिभौतिक ज्ञान लोपतें.

( १३० ) कल्पना हा एक परमेश्वरानें दिलेला कल्पतरूच आहे ! या कल्पतरूच्या तळवटीं बसून आपण जी जी कल्पना करावी ती ती खरीच आहे आणि कल्पनेहून पलीकडे गेलें म्हणजे काल्पनिक सब झूटही आहे.

( १३१ ) आधिभौतिक विद्या जर गुरूशिवाय प्राप्त होत नाहीं, तर अनन्त जन्मींचा भवभ्रम दूर करणारी अध्यात्मविद्या तरी गुरूशिवाय कशी प्राप्त होणार ?

( १३२ ) अहम् हा कामाचा अवतार, तो राम कसा होणार ? काम कधीं राम होणार नाहीं आणि राम कधीं काम होणार नाहीं. आपण एका बाजूनें काममूर्ती आहोंत तर दुसऱ्या बाजूनें राममूर्ती आहोंत.

( १३३ ) आपण स्वांगानें रामरूप झालों तर अर्धांगीच काय पण सर्व त्रैलोक्य रामरूप होईल.

( १३४ ) कोणत्याही वस्तूची जेव्हां खरी तळमळ लागते, तेव्हांच ती वस्तू उदयास येते आणि कार्य झालें कीं लोपून जाते. गीता उदयाला येण्याची अगदीं जरुरीच लागली, तेव्हां ध्यानीं मनीं नसतां युद्धदिशीं भगवंताच्या तोंडून ती बाहेर पडली.

( १३५ ) उपदेशाबरोबर अंतःकरणांतील जन्मजन्मांतरींचा मोहांधःकार जाऊन त्याबरोबर चारही देहांचा निरास होऊन उपास्यदैवत उपासनेकरितां हृदयांत प्रकट झालें नाहीं तर तो गुरु, तो शिष्य आणि तो उपदेश हीं कितीही चांगलीं असलीं तरी ' मरका गुरु, रडका चेला आणि सडका उपदेश ' असेंच कां म्हणूं नये बरें ?

( १३६ ) गुरुमुखानें जो अध्यात्म उपदेश मिळेल तेंच गुरूचें उच्छिष्ट आणि तेंच समाधीच्याही पलीकडील शुद्ध बुद्ध भूमिका प्राप्त करून देतें.

( १३७ ) आपण तरी नुसते बहुरुपीच नव्हेत, तर ' बहुरुपी, बहुगुणी, बहुता काळाचे ' आहोंत. क्षणांत कामी, क्रोधी, लोभी, रागी, त्यागी, भोगी इ० किती तरी रूपें धारण करतों.

( १३८ ) अंतर्यामीं कृष्णाची धास्ती व बाहेरून मिशीवर ताव, ही जशी कंसाची स्थिति तसें आंतून संशयानें, कामानें ग्रासलेले आणि वर चालायची, " घडि एक विमल ब्रह्म। घडि एक सर्व ब्रह्म " अशी ब्रह्मचर्चा!

( १३९ ) या भारतभूमींतील नरदेह मिळणें दुर्लभ, तोही मिळाला तरी भरतभूमीला शोभतील अशा तऱ्हेच्या दैवी संपत्तीच्या गुणांनीं युक्त असा भारत निपजणें दुर्लभ, त्या भारतांतील आत्मबोधानें तृप्त जहालेले महाभारत म्ह० संत म्हणणें फारच दुर्लभ आहे.

( १४० ) आपण सद्रूप आहोंत हा बोध ज्या आचरणानें राहील तोच सदाचार.

( १४१ ) वर्णाश्रमधर्मांप्रमाणें भागा आलेलें नित्यनैमित्तिक कर्म ईश्वरार्पण करून " सदा सर्वदा मोकळ्या वृत्तीनें " राहाणें यांत सर्व आचारांचें योगाचें, भक्तीचें, ज्ञानाचें सार आहे.

( १४२ ) परमार्थ हा एकदेशी नसून शुद्धसत्वगुणानें सर्व क्रियेंत व्यापकपणानें वावरून अलिप्तता कायम ठेवतो; सर्व संतांचें आचरण असेंच असतें.

( १४३ ) पहिल्यानें डोक्यांतील ब्रह्मविचारानें स्वरूपाचें निश्चितत्व, नंतर मुखानें त्याचा नामोच्चार, म्हणजे ज्ञानदेव ही तृप्ति व नामदेव हा तृप्तीचा ढेंकर दिल्यावर " भोजनं मम जीर्यताम् " करतां पोटावर हात फिरविणें हा सदाचार होय.

( १४४ ) इंद्रियनिग्रह, मनोजय, वासनाक्षय, आत्मसंयमन यांची परमार्थांत तशी व्यवहारांतही अत्यंत अवश्यकता आहे.

( १४५ ) नित्यनियमानें स्नानसंध्यादि सत्कर्मे करीत असतां शारीरिक तेज वाढतें, चित्तशुद्धि होते, मन प्रसन्न होतें, कर्म पुरें झालें म्हणजे समाधान होतें, संततीवर त्याचा चांगला परिणाम होतो, पुण्याई वाढते, इ० जे प्रत्यक्ष फायदे आहेत ते जे कर्मभ्रष्ट, ज्यांना कर्माचा संस्कारच नसेल त्यांना सांगून काय कळणार ?

( १४६ ) ज्ञानाशिवाय नाम नाहीं. ज्ञान व नाम हीं एकाच देवाचीं अंगें असल्यामुळें देवापासून तीं विभक्त होत नाहींत; म्हणून ज्ञानदेव व नामदेव हीं भक्तीचीं अंगें ज्याच्या अंतःकरणांत भिनलीं, तोच देवाचा भक्त होय.

( १४७ ) परमात्मा व त्याचें ज्ञान जर हृदयांत आहे तर नामाचें मूळही हृदयांतच असलें पाहिजे. तसेंच आत्मा स्वयंभ, म्हणून नामही स्वयंभच होय.

( १४८ ) अंतर्यामीं असणारा भगवान आपण पाहाण्याला अंतर्मुखच झालें पाहिजे. पण आपण पडलों बहिर्मुख म्हणून बाह्य साधनांनीं, बाह्य ज्ञानानें, बाहेरच्या बाहेर जातों त्याला पाहायला, तो कसचा सांपडतो ! अंतर्यामीचें जाणायला अंतर्मुखच झालें पाहिजे.

( १४९ ) चत्वारि वाचेचा मूळ जो ॐकार तोच भगवन्नामाच्या मुळाशीं असल्यामुळें हा परमार्थाचा ' ओनामाच ' होय.

( १५० ) प्रपंचांत पुरुषाला स्त्री जशी ' भोज्येषु माता, वचनेषु दासी, कार्येषु मंत्री ' इ० रीतींनीं प्रेम, सुखभाग्यादि सर्व प्रकारें सुखावह होऊन प्रपंचाचा विस्तार करते, त्याप्रमाणेंच परमार्थांत आपल्यास अथपासून इतिपर्यंत पापाचें क्षालन करण्याला, संसारदुःख विसरण्याला भगवंताचें ज्ञान देऊन प्रेम उत्पन्न करण्याला, देवाला आळविण्याला, विषयावर फांकलेली वृत्ति ताळयावर आणण्याला, षड्रिपूंचे दमन करण्याला, ज्ञानोत्तर धन्यता गाण्याला, सर्व प्रकारांनीं देवाची सेवाभक्ति करण्याला, देवरूप होण्याला व शेवटीं ' अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ' करण्याला भगवंताचें नामस्मरण हें किती उपयुक्त, प्रिय, गोड, सरळ व आनंददायक आहे !

( १५१ ) परमार्थ हा निवृत्तिपर व प्रपंच प्रवृत्तिपर आहे, पण विवेक हा परमार्थांतील निवृत्तीच्या जोरावर प्रपंचाची निवृत्ति करीत असतो व प्रपंचांतील प्रवृत्ति ही परमार्थाकडे वळवीत असतो.

( १५२ ) देवाच्या अंगानें सृष्टीकडे पाहावयाचें सोडून सृष्टीच्या अंगानें आपण देवाकडे पाहून तदनुसार देवाला कर्ता, हर्ता, भोक्ता, व्यापक, सगुण, निर्गुण, नामातीत इ. नांवें ठेवतों आणि रूप देतों. पण देवाच्या अंगानें जगाकडे पाहिलें तर देवाला नामरूप तर नाहींच, पण जगही विचाराला पुढें टिकत नाहीं !

( १५३ ) देवाची स्थापना सदसद्विवेकानें आपल्या हृदयमंदिरांतच करावयाची आहे. देव हृदयांतच आहे. 'हृदयस्थो जनार्दनः' स्थूलाचें हृदय छातींत आहे; सूक्ष्माचें हृदय कल्पनेंत आहे; तसें स्वस्वरूपाचें हृदय ज्याला निजहृदय म्हणतात तें 'मनसस्तु परा बुद्धिः' ती आत्मबुद्धि होय, देहबुद्धि नव्हे. त्या निजहृदयमंदिरांत आत्माराम आहे.

( १५४ ) करावयाची भक्ति पण मिळवायचा आत्मलाभ, पाहायचा आरसा पण घ्यायचें आत्मदर्शन, शोधायचा प्रपंच पण साधायचा परमार्थ, करायची गुरुसेवा पण साधायची गुरुकृपा, अशी ही सगुणनिर्गुणाची सांगड असल्यामुळें उभयतांची ताडातोड करतांच येत नाहीं. तुका पांडुरंग झाला तरी त्याचें भजन राहीना, यांतील रहस्य हेंच.

( १५५ ) परमात्मा साक्षात् असतां शून्यवत् वाटतो आणि मन, बुद्धि, इंद्रियें, शरीर यांची उत्पत्ति आकाशांतून असल्यामुळें तीं शून्यवत् असतां प्रत्यक्ष वाटतात. हीच माया होय !

( १५६ ) सगुणसाक्षात्काराला दृष्टांत असें म्हणतात. बाह्यदृष्टीच्या आंतील दृष्टांत तो स्वप्नवतच होय. दृष्टांत ही अनेक सिद्धींपैकीं एक सिद्धि आहे. द्रष्टेपणाचाही जेथें अंत आहे, अशा आत्मप्राप्तीपुढें दृष्टीच्या आंतील दृष्टांताची किंमत नाहीं.

( १५७ ) सगुण उपासनेनें भक्तीचा कळस होतो, तर निर्गुण उपासनेनें त्या कळसावर आत्मप्रभेचा शुभ्रध्वज लागतो !

( १५८ ) देव म्हणजे मायालाघवी मूळपुरुष, त्याच्याकडून आपल्याला अहम्वृत्तीनें मीपण मिळालें आहे. तें मायावी मीपण ज्याचें त्याला देऊन आपलें स्वतःचें परमात्मपद प्राप्त करून घेणें, याचें नांव आत्मनिवेदन होय.

( १५९ ) मन म्हणजे संशय व बुद्धि म्ह० निश्चय. या संशयनिश्चयांचें बोधानें ऐक्य होऊन निःसंदेहता येणें हें सर्व योगाचें सार आहे. इतर योगांनीं शून्य स्थितींत राहाणें हा योग नव्हे.

( १६० ) इंद्रियप्रवृत्ति निरोधून किंवा विषयाचा, घरादाराचा त्याग न करतां उदासीन असणें हें खरें वैराग्य होय. विषयाहून उच्च जो परमार्थ त्याची गोडी मनाला लागेल तेव्हां उच्चाभिलाषी उदासीनता ( उत्+आसीन ) येईल.

( १६१ ) पाणी वरून दिसायाला इतकें उदास कीं, प्रवाह नेईल तिकडे जातें. पण आंतून प्रखरता इतकी कीं, प्रसंगाला खडक सुद्धां फोडतें. तद्वत् वैराग्य दिसायला उदासीन परंतु विवेकाचें तेज इतकें कीं, कोणताही विकार पुढें आला असतां विचारानें जाळून भस्म करतें. अशा प्रकारचें धगधगीत वैराग्य पाहिजे.

( १६२ ) अध्यात्मशास्त्र हें मनुष्याला पंगु करणारें, विध्वंसक एकदेशी अशी आधुनिक विद्वानांची झालेली समजूत मूर्खपणाची आहे. उलट आध्यात्मिक उन्नतीचा लोप होऊन आधिभौतिक सुखाला लोक चटावल्या-मुळेंच उथळ विचाराचे, विषयाधीन, नाजूक, स्त्रैण होऊन राष्ट्रांतील पौरुष नष्ट झालें.

( १६३ ) विषय जड असून त्यांत आम्हीं चित्तरूपानें प्रतिबिंबित झाल्याशिवाय विषयांचा आम्हांस मुळीं भोगच होत नाहीं. विषयांची गोडी विषयांत नसून ती चित्तांत आहे आणि चित्ताची खरी गोडी चित्तांत नसून ती चित्तालाही चेतविणारी जी आत्मरूप चित्प्रभा तींत आहे.

( १६४ ) "कर्ताहमिति मन्यते" हें ज्या क्रियेच्या बुडाशीं आहे ती क्रिया कितीही उत्तम असली तरी ती त्रिगुणात्मक अतएव दोषी, आणि आत्मबोधावर राहून झालेल्या क्रिया कितीही वाईट असल्या तरी त्या निर्दोष आहेत.

( १६५ ) आपण मूळचे निजानंद, सहज, स्वयंवेद्य, स्वरूप असतांना व वेदोपनिषदें, साधुसंत आपल्या कानींकपाळीं ओरडत असतांना आमचा त्यावर विश्वासच बसत नाहीं आणि मुंबईस अमुक गोष्ट झाली असें सांगितल्याबरोबर त्यावर विश्वास बसतो ! हीच माया.

( १६६ ) आपण अज्ञानी राहून "ज्ञात्यानें अस्सेंच वागावे तस्सेंच वागावें" अशी चर्चा करणें म्हणजे "बाजारांत तुरी, भट भटणीला मारी" अगर "कारागृहीं अडकला, पुरुषार्थ सांगे" अशासारखेंच हास्यास्पद आहे !

( १६७ ) मुमुक्षुत्वाचें तिकिट काढा, अध्यात्माच्या आगगाडींत मजेनें बसा, सभोंवतालचा देखावा ज्ञानदृष्टीनें पाहात पाहात रस्ता सुलभ करणाऱ्या समर्थांचे आभार माना, आणि आत्मबोधाच्या मुक्कामाला आरामशीर जाऊन पोंचा !

( १६८ ) कर्मांत कर्मी असूनही आत्मबोधानें ज्याचा आत्म्याशीं असलेला योग ढळत नाहीं तोच खरा निष्काम कर्मयोगी होय.

( १६९ ) अयोग्य वस्तूचा संन्यास झाला कीं, योग्य वस्तूचा योग घडलाच. असा हा गमतीचा योगायोग आहे. योगावांचून संन्यास आणि संन्यासावांचून योगच नाहीं. योग्य वस्तूशीं योग होण्याची बौद्धिक योग्यता मात्र पाहिजे, तरच संन्यासयोग घडतो.

( १७० ) अक्षरांतून प्रथम ब्रह्म ( आकाश ), त्यापासून कर्म ( वायु ), कर्मानें यज्ञ (अग्नि), त्यापासून पर्जन्य ( जल ) व त्यापासून अन्न (जमीन), ब्रह्म, कर्म, यज्ञ, पर्जन्य व अन्न ही पंचमहायज्ञमालिका पंचमहाभूतांच्या अंगभूत आहे.

( १७१ ) हा आपला औट हाताचा दिसण्याला फाटका तुटका देह, पण साक्षात् " यज्ञकृत्, यज्ञभुक्, भोक्ता, यज्ञांग, यज्ञवाहन, यज्ञसाधन, होता, हव्य, हवन, हव्यवाहन " इत्यादिरूपानें यज्ञमूर्ति बनला आहे ! मूर्त लहान पण कीर्त मोठी !

( १७२ ) चातुर्वर्ण्य संस्थेचें विदारण केलें तर राष्ट्राचा घात होतो; आजकालचे फाजील विद्वान् तें विदारण करीत असल्यामुळेंच राष्ट्रांत कलहाग्नि पेटला आहे. त्रिवर्णांनीं ब्राह्मणाचा द्वेष करणें म्हणजे आपणच आपल्या थोबाडींत मारून घेणें, तसेंच ब्राह्मणानें शूद्राचा द्वेष करणें म्हणजे आपणच आपल्या पायावर दगड मारून घेणें, वैश्याचा द्वेष करणें म्हणजे आपल्याच पोटावर आपण मारून घेणें, क्षत्रियांचा द्वेष करणें म्हणजे आपणच आपले बाहु उखडून टाकणें; अशा प्रकारचें हास्यास्पद आहे.

( १७३ ) बायकांमध्यें पुरुषांप्रमाणें आपण व्हावें अशा प्रकारचें वारें संचरलें कीं, सुप्रजाजननी, गृहिणी, आर्या या पदांपासून स्त्रिया भ्रष्ट होऊन निरुपयोगी झाल्या म्हणून बेलाशक समजावें.

( १७४ ) भारतीयत्व सोडून जितके तुम्ही परकीय सुधारणांना भाळून त्यांच्याशीं जास्त वळण ठेवाल, त्यांच्या चालीरीति घरांत घ्याल, तितके तुम्ही आर्यत्वाला व अध्यात्मपरंपरेला मुकाल आणि आधिभौतिक सुखलालसेनें अधोगतीला जाल !

( १७५ ) जग ज्ञानाकडे का अज्ञानाकडे झुकत आहे याची कसोटी आधिभौतिक सुधारणेवर नसून ती आध्यात्मिक सुखावर आहे.

( १७६ ) स्वराज्याचें स्वातंत्र्य मिळविण्यापूर्वींच आमच्या आधुनिक सुशिक्षितांच्या अंगांतच नव्हे तर सबंध कुटुंबांत स्वातंत्र्याचें वारें संचारून एकाच घरांत पुरुष स्वतंत्र, बायको स्वतंत्र, मुलगा स्वतंत्र, चाकर स्वतंत्र, सबंच घर व्यक्तिशः स्वातंत्र्य बळकावून बसलें, तर कुटुंबांत व राष्ट्रांत संघटना कशी होणार ?

( १७७ ) स्वातंत्र्याचें वारें अंगांत शिरून आम्हीं संघटना घटवली तसा सबगोलंकार, भ्रष्टाकार करून जातच जाग्यावर ठेविली नाहीं, मग जातिवंत पुरुष राष्ट्रांत निर्माण होणार कसा ?

( १७८ ) " बोलण्यांत बोलका व करण्यांत हलका " तो समाजाचा पुढारी नसून स्वधर्मैकरत आचारविचारशुद्ध तोच खरा श्रेष्ठ पुढारी होय.

( १७९ ) संतांच्या घरची देवदर्शनाची रीत आधीं आत्मदर्शन, मग देवदर्शन, आत्मदर्शनानंतर देवदर्शन घेतल्यानें यथार्थ दर्शन घडतें. त्याला तल्लीनतेचें दर्शन म्हणतात. आपण नेहमीं दीन होऊन दर्शन घेतों. पण लीन होऊन घेतल्यानें तें अनन्यदर्शन होतें.

( १८० ) प्रपंचपरमार्थांत विवेकासारखी दुसरी चीज नाहीं.

( १८१ ) आपण आपल्याला दिसलों कीं देव आपल्यास दिसलाच समजा ! प्रत्येक प्राणी अहोरात्र देवाचीच उपासना करीत आहे. पण लक्षांत कोण घेतो ?



# गोविंदसुतांच्या सद्बोधसूक्ति

## ' आत्मानुसंधान '



( १ ) परमात्मा गोड असला तरी अति गूढ असून आपण पडलों अति मूढ म्हणून गूढ उकलण्याला परमात्म्याचीच कृपा पाहिजे.

( २ ) अंतःस्फूर्तींतून अंतरात्म्याची कृपा उद्बोधित झाल्यावांचून अनन्यतेचें वंदन होणार नाहीं.

( ३ ) इंद्रियगणांचा पति, तो गणपती; तीच अहंस्फूर्ती.

( ४ ) ज्याचा विवेकशुंडादंड मोठा, तोच खरा सुखी होय.

( ५ ) सोळा स्वर आणि छत्तीस व्यंजनांच्या बावन कंगोऱ्यांत ज्ञान, विचार व विकारांचे सर्व संस्कार सांठवून ठेवून ही ( सरस्वती ) माता ते संस्कार दोन ओठांमधील चार बोटांच्या मुखावाटे बाहेर काढते !

( ६ ) सर्वांतर्यामीं हा आत्माराम आहे, म्हणूनच सर्वांत राम आहे व सर्वांना आराम आहे !

( ७ ) सत्संगतीवांचून भवभ्रांति जात नाहीं.

( ८ ) या जगांत जात व अजात असे दोन प्रकारचे पदार्थ आहेत. अजात म्हणजे स्वयमेव असा एकच पदार्थ, तो आत्मा होय.

( ९ ) ऐकूं येण्यापूर्वी जें नादाचें रूप, वासापूर्वीं जें वासाचें रूप, सुरतेविण जें आनंदाचें रूप, ज्ञातृज्ञेयाविहीन जें ज्ञानाचें स्वरूप तेंच आमच्या या आत्मारामाचें स्वयमेव रूप आहे.

( १० ) सर्व जीवांच्या अंतःकरणांत " मी आहें " हा जो सहजभाव आहे तेंच आत्मानुसंधान होय.

( ११ ) देहोहं स्फूर्तींतून देहाला पोषक जे विषय त्यांच्या चिंतनांतच सर्व जीव चूर राहून चिंतातुर बनले.

( १२ ) मरेपर्यंत मनुष्य विषयचिंतनांत चूर राहून आयुष्याचा चक्काचूर उडवून शेवटीं चितेंत जातो.

( १३ ) जागृती आली कीं, स्वप्न जागच्या जागीं मावळतें, तद्वत् आत्मजागृतीनें सर्व भास जागच्या जागीं जिरतो.

( १४ ) स्वात्मसुख विचारात्मक व विषयसुख विकारात्मक आहे.

( १५ ) डोळ्याचेंच डोळ्यावर पडळ येतें, तसें ज्ञानच ज्ञानाच्या आड येतें आणि आत्माराम साक्षात् असतांना तो गोचर होत नाहीं.

( १६ ) धैर्य, वीर्य, शौर्य, औदार्य, दया, दान, धर्म इत्यादि सात्विक गुणांच्या सुगुणमूर्ति बहुत आहेत. पण तात्विक विचारानें तत्त्ववस्तूशीं तादात्म्य करून घेऊन स्वात्मसुखाची गोडी चाखणारी उपाधीवेगळी, सोंवळी, साधी, साधुमूर्ति कोठें मिळत नाहीं.

( १७ ) दोन हातांनीं सर्व कर्तृत्व आणि मस्तकानें भोक्तृत्व, या सर्वांवर तिलांजली देऊन " न मम " नें हात झाडून मोकळें होणें महाकर्म कठीण आहे.

( १८ ) अर्पण आणि तर्पण देखील करावयाचें नसून सहज आहे.

( १९ ) आपलें हें छत्तिसतत्व प्रकृतीचें तन-मन-धनाचें गांठोडें आपल्याला अगदीं चिकटल्यासारखें वाटतें. परंतु यांत आपला असें म्हणण्यासारखा एकही पदार्थ नाहीं. फक्त आमचे आम्ही तेवढे अलग सलग आहोंत.

( २० ) बाह्यांगानें विश्वंभराचे दास व अंतर्यामीं आत्मारामाशीं ऐक्य.

( २१ ) स्वरूपाच्या उपप्रदेशापर्यंत नेऊन भिडवणारा, तोच उपदेश.

( २२ ) ज्या ज्ञानानें आत्मसाक्षात्कार होईल तेंच आत्मज्ञान; तें देणारा तोच मोक्षगुरु होय.

( २३ ) बगलेंत कांहीं तरी घेऊन परमार्थ करणें, म्हणजे " कांखे घेऊनियां दारा । म्हणे मज संन्यासी करा " अशापैकीं हास्यास्पद होय.

( २४ ) प्रपंच व परमार्थ एकत्र नांदतात. पण प्रपंचांत परमार्थ नाहीं व परमार्थांत प्रपंच नाहीं. " ऊर्ध्वायै दिशे ब्रह्मणे " हा उर्ध्वगामी विचाराचा परमार्थ, व " अधरायै दिशे अनंताय " हा अधोगामी प्रपंच होय.

( २५ ) ध्यानासाठीं डोळे मिटले तरी ज्ञानासाठीं पुन्हां उघडलेच पाहिजेत. डोळे उघडून पहाण्यालाच ज्ञान म्हणतात; शिवाय उघड्या डोळ्यांनींच प्राण गेला पाहिजे.

( २६ ) ज्या ज्ञानानें आपण ज्ञाते म्हणून मिरवितों, तें सर्व ज्ञान परेच्या अलीकडील असून परमात्मा परेच्या पलीकडे अपरंपार आहे.

( २७ ) इंद्रियें अंतर्मुख करून उफराट्या दृष्टीनें पहाणाराला आत्मदर्शन होतें.

( २८ ) अंतरांतच सर्वभ्रांति व अंतरांतच दोरीचा बोध. जेथें भ्रांति तेथेंच निभ्रांत झालें पाहिजे.

( २९ ) प्रपंचांत साध्य वस्तु साधनांनीं शोधून साधावी लागते. परमार्थांत साध्य वस्तु स्वांगानें सिद्धच आहे, ती ओळखून नंतर साधनाच्या-आत्मानुसंधानाच्या संपुष्टांत ठेवावी लागते.

( ३० ) आधीं यथार्थ दर्शन, मग पूजन.

( ३१ ) मनुष्याचें ऊर्ध्व डोकें " ऊर्ध्वगामी विचारानें मनुष्याला ऊर्ध्वगतीप्रत नेऊं शकतें. "

( ३२ ) विचारपूर्वक कर्म तेंच पुण्य व विकारात्मक तें पाप होय. नरत्व हा विचार व देहत्व हा विकार.

( ३३ ) ऊर्ध्वगतीला स्वर्ग व अधोगतीला नरक म्हणतात. पण गति अवगतीचीही निपटून निर्गति करणारें आत्मज्ञान आहे.

( ३४ ) अहं ' देही ' म्हणून ज्या क्रिया होतात, त्या मग वाईट वा चांगल्या असोत, अध्यात्मदृष्ट्या पातक व मुक्तसंगोनहंवादी म्हणून ज्या क्रिया, त्या कशाही असल्या तरी पुण्यात्मक होत.

( ३५ ) अहंकार, अज्ञान हेंच पशुत्व होय.

( ३६ ) अरण्याचे मालक श्वापदें, समुद्राचे मालक जलचर, तसा निरंजन पदाचा मालक मानव होय.

( ३७ ) मानव हा तर पिंडाच्या बाजूनें योनिसंभव आणि ज्ञानाच्या बाजूनें अयोनिसंभव आहे.

( ३८ ) मनन हाच ज्याचा स्वभाव तोच खरा मानव होय.

( ३९ ) ज्ञान, शक्ति, व्यापार व सेवा, हीं चार तत्त्वें शरीरांत चळवळ करणाऱ्या चैतन्यांत असतात. त्यांच्यामुळें शरीराचें पोषण होत असतें. आपल्या औट हात पिंडापोटीं चार देह आहेत. ते या चार तत्त्वांचे आहेत.

( ४० ) पंचभूतांवांचून जगाला, तशी चातुर्वर्ण्यावांचून समाजाला शोभाच नाहीं.

( ४१ ) शिश्नोदरपरायणता हेंच ज्या सुधारणेचें ध्येय तिच्या मोहांत सांपडून आपण आपल्या आध्यात्मिक ध्येयाला विसरलों.

( ४२ ) जो आत्मोन्नति करील तोच देशोन्नति करील. जो स्वतः मुक्त होईल तोच देशाला मुक्त करील. जो स्वतःचा आत्मा आकलन करील, तोच देशाचा आत्मा आकलन करील.

( ४३ ) आचारांत, विचारांत, रोमरोमांतून ज्या वेळीं आर्यत्वाचें रक्त सळसळेल, आध्यामिक ध्येयाच्या अटकेवर आर्यत्वाचा झेंडा लावावयाचा, हें

उच्च ध्येय पुढें ठेऊन सर्व चळवळी होतील; तेव्हांच देश खडबडून जागा झाला असें म्हणतां येईल.

( ४४ ) आधिभौतिक ऐश्वर्यासाठीं त्याग तो राजसी व धर्मासाठीं त्याग तो सत्त्वगुणी होय. साधुसंतांनीं जो त्याग केला तो धर्मासाठीं होता.

( ४५ ) जो आत्मतृप्त झाला त्यानेंच सर्वस्वाचा त्याग केला.

( ४६ ) संकटकाळ हीच धर्मकृत्यांची पर्वणी असते.

( ४७ ) मनुष्याचें डोकें ही ब्रह्मांडाची प्रतिमा आहे; म्हणूनच अखिल ब्रह्मांडाचें ज्ञान त्याच्या डोक्यांत सांठवतें.

( ४८ ) जें कर्म ऊर्ध्वविचारानें ' ज्ञाने परिसमाप्यते ' होतें तें सत्कर्म ऊर्ध्वगतीला नेतें.

( ४९ ) दिवा स्वतः दुसऱ्याला प्रकाशित करून स्वतःखालीं अंधार ठेवितो; तसें मनुष्याला सर्व जगाचें ज्ञान होतें पण स्वतः मी कोण ही भ्रांति त्याची तशीच राहाते.

( ५० ) " पोट लागलें पाठीशीं । हिंडवीतें देशोदेशीं " हें खरें, पण पोटोबा भरून उरलेलें आयुष्य तरी विठोबाकडे कां लावूं नये ?

( ५१ ) आपली औट हाताची काया हीच ती माया.

( ५२ ) माया म्हणजे हा देहच नव्हे, तर त्याच्या नखशिखांत व्यापणारी चेतना, उर्वरीत राहिलेला साक्षी ज्ञाता, त्याचें ज्ञेय विषय, तत्संबंधीं ज्ञान व आनंद, वाणीचा व मनाचा प्रवर्तक, बुद्धीचा बोधक, देहाचा चालक इत्यादि सर्व मायेचाच पसारा होय.

( ५३ ) आत्मप्रत्ययानें आपली छाप मायेवर बसली, कीं माया उडाली. ' मी आहें ' हा आत्मप्रत्यय तर आपल्याला सर्व अवस्थांतून आहेच.

( ५४ ) मायेचें मूळ जगांत नसून आपलेच अंतरांत आहे. म्हणून प्रथम अंतःशुद्धि पाहिजे.

( ५५ ) अहं स्फूर्तींतील अहं ही जाणीव व स्फूर्ति ती शक्ति, जाणीव पुरूष आणि स्फूर्ति प्रकृति म्हणून अहंस्फूर्ति ही अर्धनारीनटेश्वर होय.

( ५६ ) कल्पना-दृष्टींत सर्व सृष्टि सांठवते, म्हणून सृष्टीपेक्षां दृष्टीच मोठी.

( ५७ ) पंचभूतेंच पंचभूतांनां विषय रूपानें खात आहेत.

( ५८ ) आपण पंचज्ञानेंद्रियांच्या पांच तोंडाचे व त्रिगुणात्मक तीन डोळ्यांचे शंकर होऊन पंचविषयांचें विष भक्षण करितों.

( ५९ ) परेपासून स्थावरापर्यंत सर्व कल्पनेचें साम्राज्य आहे, आपण परेच्या पलीकडे परात्पर आहोंत.

( ६० ) ममत्वाचा शिक्का नसलेली कल्पना बाधत नाहीं.

( ६१ ) सूक्ष्म पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, अंतःकरण अशा कल्पनेच्या सोळा कळा आहेत.

( ६२ ) दोरीचा सर्प दिसणें हें ज्ञानच, पण दोरीच्या यथार्थ ज्ञानाच्या अभावांत त्या सर्पत्वाच्या विपरीत ज्ञानाचा प्रभाव मनुष्याला सत्यत्व दाखवून भिववितो.

( ६३ ) परेपासून स्थूळापर्यंतच्या सर्व पसाऱ्यांत पसरलेलें ज्ञान, आत्मबोधाच्या अभावीं सत्य भासलें तरी अन्यथाच होय.

( ६४ ) हें कल्पनेचें अहंभूत स्वतः दिसत नाहीं; पण डोक्यावर बसून सर्वांना भ्रमवीत असल्याचें दिसतें.

( ६५ ) कल्पना अखंड सौभाग्यवती आहे.

( ६६ ) आत्मज्ञानावांचून जीवाला मरण नाहीं, आत्मज्ञान झाल्यावर जीवाबरोबरच कल्पना सती जाते.

( ६७ ) कल्पनासमुद्रही अनंत असून कामक्रोधादिक विकारांनीं तो कितीही खवळला, किंवा प्रेमाच्या पान्ह्यानें उचंबळला, तरी मसुरप्रमाण जी त्याची मर्यादा, ती कांहीं तो सोडीत नाहीं.

( ६८ ) जेथें आत्मा तेथेंच कल्पना, पण कल्पनेंत आत्मा नाहीं, आत्म्यांत कल्पना नाहीं.

( ६९ ) आमच्या ठिकाणीं मुळीं कल्पनाच नाहीं.

( ७० ) आपण कल्पनातीत असतांना भ्रांतीनें तिला आपली म्हणून बळेंच डोक्यावर घेऊन आपण नाचतों; पण तें डोकें व ती कल्पना दोन्हीं आपलीं नव्हेत.

( ७१ ) महाकारण-देह ज्ञान, कारण-देह अज्ञान व लिंग-देह वासना मिळून ज्ञान, अज्ञान व वासना या तिहींचें मिश्रण ती ही कल्पना.

( ७२ ) प्रतिक्षणीं आपण मरत आहोंत हें कधीं स्मरणांतच येत नाहीं.

( ७३ ) ब्रह्मांड कल्पनेंतूनच बाहेर आलें तरी कल्पनेंत सर्व ब्रह्मांडच भरलें आहे.

( ७४ ) सर्व पदार्थ आंतून बाहेर आले तरी पूर्वी रूपांतरानें ते बाहेरून आंत जातात.

( ७५ ) जो कल्पनेंत आला तो मुळीं आत्माच नव्हे.

( ७६ ) एका कल्पनेच्या अतीत आपण आपल्याला ओळखलें तर छत्तिसतत्त्व प्रकृतीच्या पाशांतून आपण मुक्त होऊं.

( ७७ ) साक्षात् अशी वस्तु एक आत्मा आहे. या व्यतिरिक्त सर्व कल्पनात्मक भास होय.

( ७८ ) अहं अस्मान्, आणि इदं जमीन, यांच्या जबड्यांत कल्पना रहाते. एवंच हरीच्या संकल्पांत ब्रह्मांड व ब्रह्मांडांत हरिसंकल्प ओतप्रोत भरला आहे; पण हरि मात्र संकल्पातीत आहे.

( ७९ ) जे हरिरूप झाले त्यांना संकल्प नाहीं पण जे प्रकृतिअधीन झाले, त्यांना कल्पनेची बाधा होते.

( ८० ) कल्पना अंतःकरणांत अधांतरीं आहे, तशीं तिच्यावर उभारलेलीं ब्रह्मांडेंही अधांतरींच आहेत.

( ८१ ) सर्वांना आश्रय पाय जमीन, तिच्यावर जल पोटांत, त्यावर अग्नि मुखांत, प्राण नाकांत, कल्पनाकाश डोक्यांत असें उलट सुलट चढत्या उतरत्या भांजणीचें पंचभूतात्मक शरीर हें एक अष्टधेचें भूत अव्यक्तांतून देहरूपानें व्यक्तीला आलें आहे.

( ८२ ) अष्टधेचें सूक्ष्मरूप तीच कल्पना. गुणविशिष्ट रूप ती गुण-माया व स्थूळरूप ती अविद्यामाया होय.

( ८३ ) आपण संकल्पातीत कसे आहोंत याचा कोणीच विचार करीत नाहीं.

( ८४ ) प्रपंचाचें मूळ अंतःकरणांत आहे.

( ८५ ) स्वरूपावबोधानें या मायाभ्रमापासून आपण निराळे कसे आहोंत, हें ओळखून स्वरूपीं राहाणें हीच इतिकर्तव्यता होय.

( ८६ ) " जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नोहे । जगचि हें होय जाय । तो शुद्धिही नेणें " ( ज्ञाने. ) हें जें परमेश्वराचें अकर्तेपणाचें रूप, तेंच आपलें रूप आहे.

( ८७ ) मेल्याशिवाय स्वर्ग नाहीं तसा आत्मज्ञानावांचून आत्मानुभव नाहीं.

( ८८ ) विश्वासाठीं कर्म व कर्मासाठीं विश्व, असा अन्योन्य संबंध आहे. पिंडाच्या व ब्रह्मांडाच्या कर्मचक्राचे दुवे एकमेकांत अडकलेले आहेत.

( ८९ ) ज्यांत राम नाहीं अशींच चरित्रें हल्लीं फार निघतात.

( ९० ) काशीपासून रामेश्वरापर्यंत एकच रस्ता दोरीसूत चालला आहे तसें परतत्वाच्या अलिकडे व स्थावराच्या आंत, अखिल पिंडब्रह्मांडांतून एकच कर्म दोरीसूत चाललें आहे.

( ९१ ) शुद्ध विचाराअंतीं तुमचें तुम्हालाच कळेल कीं, " कर्ता राम मी नव्हे आपण."

( ९२ ) नशीब हा समाधानाला एक टेंकू आहे. बाकी मागून पुढून चालला आहे प्रयत्नच. मानतो नशीब आणि करतो प्रयत्न.

( ९३ ) हा जो कर्मनदीचा सतत ओघ चालला आहे, त्याला कोणत्या ठिकाणीं हात लावून हें प्रारब्ध आणि हा प्रयत्न म्हणणार ?

( ९४ ) आकाशाची वार्ता सूर्याला नाहीं, अविद्येची वार्ता आत्म्याला नाहीं. सूर्यानेंच सूर्याला, तसें आत्म्यानेंच आत्म्याला ओळखावयाचें आहे.

( ९५ ) सृष्टीचें मूळ कल्पना आणि सृष्टी सर्व कल्पनेवरच चालली आहे.

( ९६ ) कल्पनांचें गणित बसवावयाचें, तर जगदुत्पत्तीच्या काळापेक्षां आपण वास्तविक कल्पनातीत असतांना अकल्पित या कल्पनेंत कधीं व कसे येऊन पडलों हें कोडें अध्यात्मिक पद्धतीनें सोडविणें अगत्याचें नाहीं काय ?

( ९७ ) जगाचें गूढ हुडकण्यापेक्षां परमात्मगूढ उकळणेंच श्रेयस्कर आहे. पण मायेचा पगडा जबरदस्त ! यामुळें तिकडे बुद्धिच वळत नाहीं.

( ९८ ) परेपरता परमात्मा प्रत्यग्बोधानें हृदयांत प्रगट होण्याव्यतिरिक्त जे तर्क, अनुमानें, श्रद्धा, विचार हे परेच्या अलिकडील असल्याकारणानें युक्तिजुक्तीला ते पटले, तरी अबोधांतील बुद्धिवादच होत. साक्षात्कार नव्हे.

( ९९ ) निश्चल द्रष्टे होऊन ' शठं प्रति शाठ्यं ' सारख्या देखील ' फावल्या त्या चेष्टा ' साधूंना खुशाल करतां येतात.

( १०० ) प्रकृतिधर्मांवरून ज्ञानी ओळखणें शक्य नाहीं.

( १०१ ) अंतरांतील ती अर्धचंद्राकार चंद्रभागा, तो अविट विटेवरील विठोबा, आनंदानें नाचण्याला तें मनाच्या मुलूखमैदानाचें वाळवंट, या अंतरांतील साक्षात् देखाव्याशीं बाहेरील पंढरीच्या दर्शनानें तादात्म्य होऊन, अंतरांतील बोधाला भरतें येऊन नाचतां आलें नाहीं, तर त्या दर्शनाचा काय उपयोग ?

( १०२ ) आत्मज्ञान मनुष्याला होणें शक्य नाहीं, अशी भ्रामक समजूत करून घेऊन आपल्या अज्ञेयत्वाचा सगळा वांटा हे आधुनिक व अंधुक विज्ञेयवादी विद्वान् साधुसंतांच्या गळयांत बळेंच बांधतात. पण स्त्रीला संतती

होणें अशक्य, असा शिक्का वंध्येनें पुत्रवतीवर ठोकून समाधान मानण्यासारखें हें हास्यास्पद होय.

( १०३ ) आत्मस्वरूप खुद्द आपलेंच असल्यामुळें अज्ञेय नाहीं.

( १०४ ) हरिहरब्रह्मादिकांपासून परंपरेनें आलेल्या आत्मानात्मविचाराच्या संतमार्गाविरहित अहंमन्यतेनें निघालेले तर्कप्रतिष्ठित ग्रंथ आणि पंथ, सांप्रदाय आणि समाज, उद्धार आणि मिशनें, संघ आणि मंडळें, मठ आणि तट इत्यादि प्राचीन आणि अर्वाचीन संस्था ह्या त्यांच्या त्यांच्या उद्देशाला उपयुक्त असल्या तरी अध्यात्मदृष्ट्या हे सर्व अबोधांतील बुद्धिवादच होत.

( १०५ ) शुद्ध सत्त्वगुणी अशा भरतभूमींतील सांप्रदाय परंपरेचें परमपवित्र ज्ञानच अध्यात्मशास्त्राला उपयोगी आहे.

( १०६ ) मुमुक्षूंचें चित्त आकर्षून घेऊन त्यांत आत्मप्रभा फांकविण्याची शक्ति ग्रंथांत नसून ती अनुभवी संतांच्या वाणींतच खास आहे.

( १०७ ) ग्रंथसागरांत मार्गदर्शक असल्यावांचून विचाराचें तारूं एकदम ढकलून स्वयंमन्यतेच्या सुकाणूनें चालविणें धोक्याचें आहे.

( १०८ ) अखिल पिंडब्रह्मांडपसारा हें एक क्षीरनीरमिश्रणाचें पात्र व नरदेह हा सोहंहंसस्वरूप राजहंसच आहे.

( १०९ ) जागच्याजागीं बसल्या बैठकीवरच विचारानें विरण्यांत मोक्ष आहे.

( ११० ) कल्पना तरी शुद्ध व शबल, दोन प्रकारची आहे. शुद्धानें शबल कल्पना निर्बल करून आपल्यास कल्पनातीत व्हावयाचें आहे.

( १११ ) "काशीस जावें नित्य वदावें" म्हणजे कधींतरी काशी घडेल. संतकृपा होईपर्यंत स्वरूपाची कल्पना करीत असल्यानें, भलभलती विषयकल्पना तरी सुटेल.

( ११२ ) देवाला वाहिल्याशिवाय देव आपल्याला कांहींच देत नाहीं.

( ११३ ) पारमार्थिक सर्व साधनांचें पर्यवसान डोळा उघडून स्वरूपदर्शन होण्यांत आहे.

( ११४ ) आपणही नररूपानें अर्जुनाचे अवतारच आहोंत, एका हातानें प्रपंच व एका हातानें परमार्थ, अर्थात् विकार व विचार या डाव्या उजव्या दोन्ही हातांनीं प्रपंच परमार्थ करण्याला अधिकारी सव्यसाची वीरच आपण आहोंत. प्रपंचरूप कुरुक्षेत्रांत कामक्रोधादि कौरवांशीं युद्धाला तयार आहोंत.

( ११५ ) आपल्या मनोरथाच्या धुरेवर गोविंद आहेच व रथाच्या देहतळीं आपण अधोमुखी अहंपणानें उभे आहोंत. आपल्या हृदेशाच्या धुरेवर हरि सारथ्य करीत आहे.

( ११६ ) आपली जडचंचलनिश्चलरूप नरतनु ही मूर्तिमंत त्रिकांडात्मक वेदरूपच आहे.

( ११७ ) परमात्मरूप ओळखून तद्रूपत्वानें राहाणें म्हणजे कर्म, उपासना, ज्ञान, या त्रिवेणीसंगमावर सद्गुरुबोधानें पिंडदान करणें किंवा या त्रिकुटाचलावर आत्मबोधाचा ध्वज फडकावणें हीच या वेदमूर्ति नरदेहाची इतिकर्तव्यता होय.

( ११८ ) साधनें हीं वस्तूप्राप्तीसाठीं नसून संदेह, देहाभिमान झाडण्यासाठीं व तदंगभूत षड्विकार नाशासाठीं आहेत.

( ११९ ) अभिमान गलित होण्यासाठीं साधनें व वस्तुप्राप्तीसाठीं आत्मबोध, अशा जोड गोळीनें परमार्थ जोडतो.

( १२० ) अध्यात्मांत देव विचाराचा, मुक्ति विचाराची, साधन विचाराचें एवंच सर्व विचाराचें साम्राज्य आहे.

( १२१ ) ' मी ' देहांत नसून ' मीच्याच ' पोटांत या देहासारखे देह आजपर्यंत कैक होऊन गेले, असा हा मी महत् ब्रह्म गोसावी आहे.

( १२२ ) कल्पनेला सर्व जगाचें ज्ञान झालें तरी ' मी ' केवढा व कसा आहे, याची कांहींच कल्पना नाहीं.

( १२३ ) ' मी ' ब्रह्म ओळखल्याशिवाय सर्व ब्रह्म म्हणणें व्यर्थ होय.

( १२४ ) श्रीहरिगुरुकृपेनें आत्मबोध झाल्यावांचून ' हा मी ' जाऊन ' तो मी ' होणें शक्य नाहीं.

( १२५ ) देव मीच्या ठिकाणीं प्रगट झाला, अगर मीच देव झाला तरच उपयोग.

( १२६ ) जेथें मी तेथेंच देव, किंबहुना मीच देव.

( १२७ ) आत्मारामाच्या सांनिध्यानें अंतःकरणांतील अज्ञानमोह घालवून प्रत्यक् बोधानें " ओळखीसवें तद्रूपता " पावणें ती उपासना होय.

( १२८ ) आत्मज्ञानाचा उपदेश हा आत्मारामउपासनेचा मूळ पाया आहे.

( १२९ ) सांप्रदायाविरहित तर्कप्रतिष्ठित पोकळ ब्रह्मज्ञान हें वाऱ्यावर वरातीप्रमाणें व्यर्थ होय.

( १३० ) पूज्यांची प्रतिमापूजा पूज्य बुद्धीनें करणें हें कृतज्ञतेचें दर्शक आहे.

( १३१ ) पूजाअर्चादि आचाराच्या आटीव दुधांत आत्मानात्म-विचाराची साखर पडली पाहिजे.

( १३२ ) जसा देव तशी उपासना. आत्माराम सहज, उपासना सहज; आत्माराम ज्ञानस्वरूप, उपासना ज्ञानस्वरूप.

( १३३ ) अंतरांतील देव टाकून आपण बाहेर रोज देवदर्शनाला जातों पण दर्शन घेतों अंतरांतील आत्म्याचें, हें आपल्या लक्षांत येत नाहीं.

( १३४ ) अहंस्फूर्ति तोच अंतरात्मा होय.

( १३५ ) पुरुष आणि प्रकृति किंवा देव आणि भक्तरूपानें एकच मायालाघवी परमात्मा नटला आहे. हें वर्म समजलें कीं, द्वैत कीं अद्वैत हें भांडण संपलें.

( १३६ ) भक्तिप्रेमाच्या ठिकाणीं कांहीं सगुण, निर्गुण ही भावनाच नसते. त्याच्यापुढें मूर्ति सगुण आली तरी प्रेम निर्गुणच.

( १३७ ) प्रथम गुणमायादिकांचा धारक परमेश्वर सगुण याची उपासना, आणि मग त्याच्या कृपाप्रसादानें निर्गुणप्राप्ति.

( १३८ ) माशाचें जन्म कर्म सर्व जलमय असलें तरी उलटी उडी मारून पाणी प्याल्यावांचून त्याला तृप्ती नाहीं, तद्वत् आपला जन्म " मम योनिर्महत् ब्रह्म " पासून असल्यानें आपण ममरूप व ब्रह्मरूप खरे, पण अंतर्मुख उफराटी दृष्टि फिरविल्यावांचून आत्मतृप्ती नाहीं.

( १३९ ) आपण देवासन्निध देवरूपच आहोंत. देवाची स्वयंभु मूर्ति तशीच आपली आहे. देवाची भोगमूर्ति तशी आपली भोगमूर्ति बाहेर मिरविली जाते, ती खरी नव्हे.

( १४० ) कपाळाची कर्मरेषा टळून व कर्माचें वाटोळें होऊन कपाळ तेवढें श्रीहरिचरणीं अखंड रहाण्याला निष्काम कर्मयोग हाच रामबाण उपाय आहे.

( १४१ ) कर्मफलाहून श्रेष्ठफळ हातीं येईल, तर कर्मफलत्याग सहज होईल; आणि सहज होण्यांतच सर्व मौज असते. जुलमाचा रामराम काय कामाचा ? " फळाचें फल कोणी एक । आपणाचि आहों. "

( १४२ ) कर्त्याच्या भावनेनुरूप क्रियापद फिरतें.

( १४३ ) क्रियेंत परमात्मा नाहीं, परमात्म्यांत क्रिया नाहीं; दिसण्याला सकर्मक, तरी पण वास्तवीक अकर्मक, अशा प्रकारचा हा कर्मकर्तरी प्रयोग आपल्या ठिकाणीं आत्मबोधानें अनुभवणें याचें नांव निष्काम कर्म.

( १४४ ) आत्मज्ञानी अंतरांत मोकळा सुटसुटीत प्रसन्न असतो, आणि बाह्य कर्मांबद्दल उदासीन असतो.

( १४५ ) मन आणि बुद्धि हाच साक्षात् नरनारायणाचा अवतार आहे. म्हणून बुद्धीमध्यें ब्रह्मतेज व मनामध्यें क्षात्रतेज तपोबलानें नेहमीं जागृत राहील अशी क्रिया झाली पाहिजे.

( १४६ ) देशाला, कुळाला, परंपरेला कालिमा लावणारें आचरण सर्वथैव त्याज्य होय.

( १४७ ) अशक्तांना सशक्त करण्यासाठीं वैद्यशास्त्र, त्याप्रमाणें लेंचेपेंचे मानसिक धर्म बळकट करण्यासाठीं धर्मशास्त्र आहे.

( १४८ ) शास्त्राचे नियम मुक्तांना लागू नाहींत; तथापि मुक्त देखील शास्त्रोक्त वागतात.

( १४९ ) श्रुतिमाउली आपल्या कल्याणार्थ आहे. " न मातुः परदैवतम्. "

( १५० ) वंश-परंपरागत मिळालेल्या मालमत्तेचें आपल्या हातानें वाटोळें करण्याइतकें ज्याचें मन तयार असेल, त्यानें या संताळयांच्या नादाला लागून आपलें वाटोळें करून घ्यावें. छत्तिसतत्त्वप्रकृतीचें आपलें गांठोडें हीच आपली जन्मजन्मांतर्गत मालमत्ता असून हिनेंच तर आपल्यामध्यें व देवामध्यें छत्तिसाचा आंकडा आणला.

( १५१ ) ज्याला आपल्या देखत मालमत्तेचें वाटोळें करून घेऊन जगांतून आपलें अहंममत्वाचें तोंड काळें करून उर्वरीत रहावयाचें असेल, त्यानेंच या परमार्थाच्या व निष्काम कर्माच्या फंदांत पडावें.

( १५२ ) जो स्वतः भगवत्स्वरूप आपण आहों हें यथार्थ बोधानें जाणतो आणि सर्वत्र तें आत्मरूप व आत्मत्वांत सर्व पहातो, तो भागवतोत्तम होय.

( १५३ ) पति देहानें पुरुष, पण अंतर स्त्रीरूप व पत्नी देहानें स्त्री पण अंतर पतिरूप, अशी उभयतांची तद्रूपतेची तंद्री लागलेली असते; तसा देवभक्तांचा एकांत आहे.

( १५४ ) देवाची सगुणलीला हा कडोसा आहे, कडोशावर लक्ष ठेवून मूळाकडे सहज नजर फिरविल्यानें सूर्यदर्शन होतें.

( १५५ ) कोणतीही भक्ति आंतून देहावर उमटली पाहिजे. आपण बाह्यचिन्हें ठेवून बाहेरच्या बाहेर भक्तीचा थाटमाट करतों. पण आंत कोरडे. " हांका मारी ज्याच्या नांवें । त्याचें गांवही न ठावें " तर मग काय उपयोग ?

( १५६ ) आपणही राम, कृष्ण, हरीप्रमाणेंच नामानिराळे आहोंत. हें स्मरणांत राहाण्यासाठींच वाडवडिलांनीं आपलीं नांवें राम, कृष्ण, हरि अशीं ठेविलीं आहेत. पण आम्ही किती खमंग ? या नांवानीं नामांकित होण्याचें सोडून रामा पहावा तों आराम खुर्चीवर पडून रामेच्या चिंतनानें कामाकार झालेला, कृष्णाचीं कृष्ण कृत्यें तर विचारूंच नका व हरीचें लक्ष परक्याचें सर्वस्व हरण करण्याकडे !

( १५७ ) अंतरांतील वारीचा प्रेमोल्हास पंढरीपर्यंत व पंढरीचा देखावा अंतरांत उतरला पाहिजे.

( १५८ ) अंतःकरणरूप चंद्रभागेच्या वाळवंटांत मनासहित एकादश इंद्रियरूप एकादशीच्या दिवशीं एकरसतेनें साध्य, साधक व साधन यांची श्रीहरीकृपेनें समरसता होईल, तरच अंतःकरण मोकळें होऊन, खरें नामस्मरण मुखानें येईल.

( १५९ ) जगत् पालक विष्णु ( आकाश ), आदिशक्ति देवी (वायु), जगच्चालक रवि ( तेज ), चिन्मय गणपति ( जळ ), जगन्नियंता शंकर ( भूमि ) या पंचभूतात्मक पंचदेवतांचें पंचायतन, हें आत्मारामाचें वसतिस्थान जें हृत्कमळ, त्याचें दर्शक म्हणून पुढें मांडावयाचें असतें.

( १६० ) सोन्यासारखा देह यथेच्छ विषयोपचारांनीं पुजून पुजूनच कुजवायचा नसून ज्याकरतां नारायणानें तो दिला, तो आत्मलाभ करून घेणें हीच त्याच्या पूजेची सांगता होय. या पवित्र कार्याकरितां देहही पवित्र ठेवणें ही देखील पूजाच होय.

( १६१ ) पाश्चात्य तत्त्ववेत्ते आपला शोध न करतां जगाच्या खोल पाण्यांत तर्कांच्या हातांनीं पोहावयाला जातात आणि शेवटीं अज्ञेय, अज्ञेय म्हणून गटंगळ्या खाऊन तोंडघशी पडतात.

( १६२ ) पदाचा छंदच अगदीं जात्या कितीतरी गोड ! मग पदप्राप्ति किती बरें गोड असेल ?

( १६३ ) घटापटाच्या शास्त्रीय पद्धतीनें नुसत्या ज्ञानाचा सिद्धांत ठोकणारे वेदांती किंवा नुसत्या साकार मूर्तीच्या अहोरात्र ध्यानानें ध्यानी बनलेले मुनी, बहुत आहेत. पण ज्ञानाची व ध्यानाची एकतानता संतवाणींतच दिसून येते.

( १६४ ) प्रतिमा म्हणजे अस्सल बरहुकूम नक्कल. पांडुरंग मूर्ति ही आपल्या औट हात देहाची प्रतिमाच होय. ' नातुडे मुख्य परमात्मा । म्हणून

करावी लागे प्रतिमा ' ( दा. ). स्वतःचें मुख झालें तरी तें आरशावांचून दिसत नाहीं तसें परमात्मदर्शन प्रतिमेवांचून होत नाहीं.

( १६५ ) ज्ञान आणि ध्यान दोन नाहींत. ध्यान म्हणजे पहाणें, ज्ञान म्हणजे जाणणें. जाणल्याशिवाय पहातां व पाहिल्याशिवाय जाणतांच येत नाहीं. पहाणें व जाणणें हीं एकाच ज्ञानाचीं अंगें आहेत.

( १६६ ) पांडुरंगाचे पाय ती तुकारामाची डोई व तुकारामाची डोई ते पांडुरंगाचे पाय. " तुझे पाय माझी डोई । ऐसें करिं गे विठाबाई " हें अखंड ध्यान.

( १६७ ) पांडुरंगाच्या साकार ध्यानाच्या सुतानेंच निर्गुण ध्यानाच्या स्वर्गास जावयाचें असल्यानें साकार ध्यान अवश्य पाहिजे.

( १६८ ) देहाचें देऊळ करून सत्कर्मानें अंतर, बाह्य स्वच्छ ठेवून विवेकप्रत्ययानें, गुरुखुणेनें आणि नवविधाभक्तिराजपंथानें जो अंतर्मार्गी प्रवेश करील त्यालाच आत्मदर्शन होऊन त्याच्या ध्यानांत देवाचें रूप उतरेल.

( १६९ ) स्फुरणामध्यें जाणीव व वायु अशीं दोन तत्वें असतात. जाणीव ही जीवाला ज्ञान पुरवते व वायु हा शक्ति पुरवतो. त्यावर सर्व जीवांचा संसार चालतो.

( १७० ) स्वयंप्रकाश आत्मा बाहेर प्रकाशमान, इंद्रियगोचर होत नाहीं, हा त्या अज्ञानयुक्त अंतःकरणाचा दोष होय. अंतःकरणाच्या प्रसन्नते-शिवाय आत्मा प्रगट होणें शक्य नाहीं.

( १७१ ) हृदयाची प्रसन्नता हीच नारायणाची कृपा.

( १७२ ) आपण सर्वांकडे नेहमीं पहातों, पण स्वतःकडे कधीं ढुंकून सुद्धां पहात नाहीं, ते देवाकडे काय पहाणार ?

( १७३ ) आपलें मूळ स्वरूप खरोखर अगदीं साधें आहे, षड्विकारांचे आणि पंचभूतांचे छक्केपंजे हे मागाहून आले.

( १७४ ) साधेपणांत साधुत्व व सहजांत मौज आहे.

( १७५ ) आपली आपल्याला ओळख पटली कीं जग आपल्याला तेव्हांच ओळखतां येतें. ज्याला आत्मोन्नति कशांत आहे ती माहीत नाहीं, तो राष्ट्राची, समाजाची, धर्माची, अबलांची, निर्बलांची उन्नति काय करणार ?

( १७६ ) देहाहून आपल्याला वेगळें पहाणें, हें वैराग्याचें मुख्य वर्म आहे.

( १७७ ) थोडाबहुत स्वाभिमान व स्वधर्माभिमान राहिला होता, पण पाश्चिमात्य शिक्षण घुशीसारखें घरांत घुसल्यामुळें यथेष्टाचरण घरांत शिरून

त्याचाही नायनाट होऊन, स्वत्व गेलें, सत्त्व गेलें, तत्त्व गेलें, महत्त्व गेलें, स्वार्थ गेला आणि त्याग मात्र पाठीस लागला आहे.

( १७८ ) अध्यात्मांत तंत्रापेक्षां ' विवेक महामंत्रा ' चेंच महात्म्य फार.

( १७९ ) ज्यानें सोऽहं शोधलें, तो सोंवळा व जो अहंपणानें राहातो, तो ओंवळा होय.

( १८० ) परमार्थांत बोधाशिवाय वेध नाहीं, वेधाशिवाय नेम नाहीं, नेमाशिवाय नाम नाहीं व नामाशिवाय तप नाहीं.

( १८१ ) यज्ञमय ब्रह्मांडांतूनच आपली ही औट हाताची वामन किंवा विठ्ठलमूर्ति निपजली. ही आकाशांतील जाणिव रूपानें ब्रह्मरूप, वायुशक्तिनें कर्मरूप, जठराग्नीनें यज्ञरूप, वीर्यानें पर्जन्यरूप, स्थूलरूपानें अन्नरूप व संहारानें हननरूप बनली असल्यानें आपण मूर्तिमंत यज्ञरूप व यज्ञकृत् यज्ञपुरुषही आहोंत.

( १८२ ) अध्यात्मविचाराचें सर्व श्रेय विसर्जनांत आहे.

( १८३ ) चंद्रदर्शनाला शाखा, तशी परमात्मदर्शनाला प्रणवरूप वेद ही शाखा आहे. म्हणून वेदोक्तविचारांवांचून आत्मदर्शन नाहीं.

( १८४ ) चित्तानें चिद्रूपाला ओळखणें हीच खरी चित्तशुद्धी होय. चित्ताला कांहींतरी विषय लागतोच; म्हणून निर्विषय परमात्माच चित्ताचा विषय करावा.

( १८५ ) सदाचाराचें मूळ सद्विचारांत, सद्विचाराचें मूळ सद्बोधांत, सद्बोधाचें मूळ सद्गुरुकृपेंत आणि सद्गुरुकृपेचें मूळ ईश्वरार्पण कर्म करण्यांत आहे.

( १८६ ) आचार हें कर्म, विचार ही उपासना व बोध हें ज्ञान; एवंच कर्म उपासना आणि ज्ञान, या त्रिकांडात्मक वेदाच्या एकवाक्यतेचें साधन पाहिजे. इकडे आचार आचरटासारखा, विचार दुसऱ्याचें पागोटें बगलेंत मारण्याचा, आणि तोंडानें " अहं-ब्रह्मास्मि ! " तें काय उपयोगाचें ?



# गोविंदसुतांच्या आठवणी

## कांहीं निवडक पत्रांचे उतारे



( १ ) श्री. आर्. के. ( ऊर्फ तात्यासाहेब ) भागवत पूर्वखानदेशांत डि. डे. कलेक्टरचे हुद्यावर आहेत. गोविंदसुत कलेक्टर कचेरींत नोकरीवर असतांना तात्यासाहेब त्याच कचेरींत कारकून होते व तेव्हांपासून उभयतांचा स्नेहसंबंध व घरोबा विशेष असे. गोविंदसुतांचा पेन्शन घेतल्या वेळच्या पानसुपारी समारंभाचा जो फोटो या पुस्तकांत दिला आहे त्यांत चिटणिसांच्या एका बाजूस गोविंदसुत व दुसऱ्या बाजूस तात्यासाहेब भागवत आहेत. वडिलांच्या निधनानंतर ते आम्हांस लिहितात " आपले वडिलांस मी गुरुजी म्हणत असें व त्याच दृष्टीनें त्यांच्या संबंधानें मला आदर असे. पूर्वी नोकरींत आपले वडील व आणखी १।२ तशींच माणसें यांच्या सहवासाचा मला लाभ मिळाला म्हणूनच मी आहें या स्थितीस पोंचलों आहें ही जाणीव मनांतून कधींही नाहींशी झालेली नाहीं व त्या कारणानें त्यांच्या संबंधानें माझ्या मनांत अत्यंत आदर सदैव असे. ते वारले त्याच दिवशीं सकाळीं जळगांव स्टेशनवर मला त्यांचें शेवटचें दर्शन घडलें हें मी माझें भाग्य समजतों. "

( २ ) श्री. गोविंद जगन्नाथ ऊर्फ आबासाहेब पाध्ये, पेन्शनर डेप्युटी कलेक्टर, पुणें लिहितातः—" तुमच्या दादांचा व माझा अगदीं पहिला स्नेह नगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्यांत झाला. तेथें ते कारकून व मी फडनवीस होतों. पुढें आम्ही दोघेही नगरजिल्ह्यांतून बदलून पुणें जिल्ह्यांत आलों व पुणें जिल्ह्यांत चिटणीस कचेरींत ते व मी पुनः एके ठिकाणीं जुळलों. त्यांची काम करण्याची पद्धति अति उत्तम होती व ती मला फार आवडली होती. ग्रंथरूपानें त्यांनीं आपलें नांव मागें ठेवलें आहे तें अजरामर राहील. "

( ३ ) श्री. वामन मोरेश्वर ऊर्फ बाबा पोतदार, वकील, पुणें यांस गोविंदसुतांच्या निधनाची बातमी समजली तेव्हां ते अस्वस्थ आजारी अंथरुणास खिळलेले होते. तशा स्थितींतही त्यांनीं अनिवार्य कर्तव्य म्हणून आम्हांस लिहिलें कीं, " तो प्रेमळ व विनोदी स्वभाव यांची आठवण झाली म्हणजे अंतःकरण भरून येतें. इतके थकले होते तरी पुण्यास आल्यावर बहुशः दररोज मला भेटल्याशिवाय राहत नसत. आम्ही त्यांस प्रेमानें " महाराज " म्हणत होतों. "

( ४ ) प्रो. द. वा. पोतदार, पुणें ता. १२।१।३४ च्या पत्रांत लिहितात:- " आज केसरी उघडला तों काय ? ' महाराजां ' च्या निधनाची वार्ता ! वाचून काय वाटलें ? धक्का बसला ! एकदां तशी भेटही निवांतपणें झाली नाहीं. आजारी तर होतेच. वयहि झालें होतें ! बाबांना कळविलें. बाबा रामेश्वराहून येतांना खालीं पडून अंगास मार बसल्यामुळें अंथरूण धरून आहेत. चालणें, उठणें बंद आहे ! दोन महिने रुग्णालयांत होते. दोन दिवस झाले घरीं आणलें आहे. जुनी पिढी जात चालली ! प्रो. पानसे वारले ! तात्यासाहेब मेहेंदळे आंथरुण धरून बसले ! पुनः ही पिढी दिसणार नाहीं आणि तिचा अनुभव व आधार लाभणार नाहीं याचें दुःख वाटल्याशिवाय कसें राहील ? मन आवरलें म्हणून शोक आवरतो कीं काय ? परशरामपंत म्हणजे गोष्टी, विनोद, रस, प्रसाद यांचा नुसता वर्षाव ! दासबोध त्यांच्या तोंडून संपूर्ण ऐकावा ही मनीषा अतृप्तच राहिली ! असा समर्थवाङ्मयाचा मांड पुनः पहावयास मिळणार नाहीं. "

( ५ ) गोविंदसुतांचे ४० वर्षांचे दृढ स्नेही ह. भ. प. पांगारकर आम्हांस आलेल्या पत्रांत लिहितात " गोविंदसुतांची वृत्ति सदा आनंदी व प्रसन्न असे. " स्थितप्रज्ञमहर्षी " सारखी त्यांची अलिप्त असंगपणाची स्थिति होती. त्यांचें लेखन प्रथमपासून मुमुक्षूंतच सुरू झालें व तें जसजसें लोकप्रिय होत चाललें तसतसें तें स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याची त्यांस स्फूर्ति झाली. त्यांचें अंतरंग निर्मळ व निःसंग असे. त्यांची अध्यात्माची बैठक कसल्याही प्रसंगीं ढळत नसे. त्यांच्या अदर्शनामुळें यापुढें या जगांत आम्हांसही चुकल्यासारखें होणार आहे. ते जिवंत असतांनाच दृश्याच्या पैलपार गेलेले होते. "

( ६ ) श्री. भास्कर रामचंद्र नानल, हायकोर्ट वकील, रत्नागिरी ( माजी एम्. एल्. सी. ) " Your father lived the purest life. I look upon his death as a great loss to Maharashtra. We are living in times of entire irreligion and if our nation is to achive its goal I firmly believe that religious thinkers of your father's type are an indispensible necessity " ( तुमच्या वडिलांची राहणी अत्यंत शुद्ध होती. त्यांचा मृत्यु म्हणजे महाराष्ट्राची एक मोठी हानि आहे असें मला वाटतें. आपण अत्यंत अधार्मिक काळांत आहों व जर आपल्या राष्ट्राला आपलें ध्येय साध्य करून घेणें असेल तर माझा दृढ विश्वास आहे कीं तुमच्या वडिलांप्रमाणें धार्मिक विचारांच्या लोकांची अत्यंत जरूरी आहे. )

( ७ ) मध्यप्रांतांतील एक सबजज्ज श्री. डी. बी. दंडे, बी. ए. एल्. एल्. बी. लिहितात:- " Since the time I came in contact with him which was probably in 1926, he had been very kind towards me. His association was of immense help to me in studying the Adwait philosophy " ( सुमारें १९२६ सालापासून त्यांचा माझा परिचय झालेला होता व तेव्हांपासून माझ्याशीं त्यांचें वर्तन फार प्रेमळपणाचें होतें. अद्वैत तत्त्वज्ञानाचा अभ्यास करतांना त्यांच्या सहवासाचा मला फारच उपयोग झाला. )

( ८ ) विद्याभूषण तांबे शास्त्री लिहितात:- " परशुरामपंत बोलके वेदांती नव्हते. त्यांच्या मनावर वेदांताचा परिणाम झालेला होता. त्यांच्या मनाची शांती वेदांती पुरुषास शोभण्यासारखी होती असें मी अनेक वेळां अनुभविलें आहे. चिरंजीवांच्या निधनप्रसंगीं जे लोक दु:खामुळें त्यांचें सांत्वन करण्यास आले त्यांचेंच उलट सांत्वन परशुरामपंतांनीं केलें ! "

( ९ ) श्री. रा. द. पंत पराडकर हे पूर्वी मुमुक्षूकडे होते व दादांचे लेख मुमुक्षूंतून प्रथम प्रसिद्ध झाले व परमार्थविचारमालेच्या प्रसिद्धीला रा. पराडकर यांनीं मदत केली होती, ' मी तुमच्या लेखांचा पहिला प्रकाशक आहें ' म्हणून गोविंदसुतांस ते नेहमीं अभिमानानें व विनोदानें म्हणत. ते आपल्या पत्रांत लिहितात:— " आमचे महाराज वयानें वृद्ध तरी मनानें ऐन तरुण भासावे अशीच त्यांच्या सहवासांत मनोहर मोहिनी होती. आर्यसंस्कृतिस्वाभिमानाचे ते जाणते पुतळेच होते. "

( १० ) श्री. दामोदर बाळकृष्ण खांडेकर, रेलवेमेलसॉर्टर, मनमाडहून लिहितात:— " दादांनीं आपला काळ परमार्थांत घालविला. त्यांचें वर्तन व स्वभाव लक्षांत घेतां ते साधुमालिकेंतच गणण्यासारखे होते. "

( ११ ) श्री. मु. ना. कागलकर ( बॉयस्काऊटच्या चळवळीसाठीं यूरोपांत जाऊन आलेले ) शिक्षक, हायस्कूल, उमरावतीहून लिहितात:— " दादा जेव्हां जेव्हां उमरावतीस येत तेव्हां तेव्हां त्यांचा भाविक सहवास मला घडत असे. माझ्या प्रमाणेंच ज्याला ज्याला म्हणून त्यांचा अल्पही सहवास घडला असेल त्या प्रत्येकाला त्यांच्या निधनाबद्दल हळहळ वाटेल. प्रपंचांत राहून सर्व दगदगी सहन करून, उलाढाली करून पुन: अलिप्त अशी त्यांची सत्पुरुषास शोभेशी वागणूक होती, वेदांत पूर्ण बाणलेला होता. "

( १२ ) श्री. ग. ल. काणे, पोष्टमास्तर, दासगांव लिहितात:—" ती. दादामहाराजांनीं देह ठेवला व स्वत: अंतर्धान पावले हें वर्तमान वाचून फार

खेद वाटला. त्यांचा व माझा ऋणानुबंध फार थोडे दिवसांचा, परंतु किती जिव्हाळयाचा होता हें आपणांस माहीतच आहे. ते आमचें उपास्य दैवत होते ! ”

( १३ ) श्री. शंभु भिकाजी जठार ऊर्फ **कपिलबुवा रामदासी**, सातारा, लिहितातः—“ पुणें, चिपळूण, सातारा वगैरे सर्व ठिकाणीं आपले वडील भेटत असत. त्यांनीं आपलीं बरींच पुस्तकें मला भेट दिलीं होतीं. त्यांचा सहवास आम्हांस पुष्कळ पाहिजे होता, परंतु योगायोगाप्रमाणें गोष्टी होतात. ते नेहमीं सनातन वैदिक धर्माचे कट्टे अभिमानी असत अशी ३५ वर्षांपासून मला चांगली माहिती आहे. ”

( १४ ) श्री. शं. श्री. **घनेश्वर**, मु. सोमठाणें नलवडें, जि. अहमदनगर लिहितातः-“ मजसारख्या अनधिकाऱ्यावरसुद्धां गोविंदसुतांचें अत्यंत प्रेम होतें, हें त्यांच्या मला आलेल्या प्रत्येक पत्रावरून स्पष्ट होत आहे. त्यांचीं पुष्कळ पत्रें मजजवळ आहेत. त्या प्रत्येक पत्रांत कळकळीचा व अनुभवजन्य परमार्थोपदेश खेंचून भरला आहे. हीं सर्व पत्रें सद्ग्रंथाप्रमाणें मीं जपून ठेवलीं आहेत. गोविंदसुतांच्या अमोघ लेखनामृताला महाराष्ट्र कायमचा अंतरला. ”

( १५ ) श्री. कृ. ह. **सहस्रबुद्धे**, वकील, कोल्हापूर यांचा व गोविंदसुतांचा अलीकडे ३।४ वर्षांतच परिचय झालेला होता. ते लिहितात कीं “ गोविंदसुतांच्या शेवटच्या आजारीपणांत ‘ तुमचे प्रकृतीस लवकरच आराम पडो व तुम्हांस पूर्ववत् बरें वाटो अशी मी परमेश्वराजवळ प्रार्थना करतों ’ असें मी त्यांस लिहिलें होतें. त्यावर त्यांचें उत्तर आलें कीं ‘ तुम्हांस म्हातारपणाचा अनुभव नाहीं यामुळें या वयांत किती शारिरिक यातना असतात याची तुम्हांस जाणीव नाहीं. ७१ वर्षें झालीं, आणखी किती दिवस जगावें ? माझ्या दीर्घायुष्याबद्दल प्रार्थना न करतां ‘ अनायासेन मरणम् ’ यावें अशी प्रार्थना करा ! ”

( १६ ) श्रीक्षेत्रकाशी येथील आमचे उपाध्ये **भाऊ भय्या कात्रे** लिहितातः— “ महाराष्ट्रांतील जुन्या पिढींतील एक जाडा विद्वान् व प्राचीन परंपरेचा अभिमानी नाहींसा झाला याबद्दल विशेष हळहळ वाटते. त्यांचा व आमचा प्रथम परिचय १० वर्षांपूर्वी ते येथें आले असतां घडला व त्यावेळीं आम्ही आपले व इतर कऱ्हाडे मंडळींचे काशीक्षेत्रांतील परंपरागत उपाध्याय असल्याचें त्यांस समजल्यापासून त्यांना आमच्या घराचा अभिमान वाटे. आम्हांवर त्यांचा फार लोभ असल्याचें प्रत्यंतर गेल्या १० वर्षांत आम्हांस पुष्कळदां मिळालें. ”

( १७ ) गोविंदसुतांचे विशेष जिव्हाळयाचे स्नेही श्री. **श्रीधर वामन** ऊर्फ **दिगंबरराव जोशी**, वकील, पेन्शनर पोलीस प्रॉसिक्यूटर, पुणें हे आम्हांस ता. ११।१।३४ च्या पत्रांत लिहितात " होणार तें झालें ! देह हा ऊसना आणिला पांचांचा । शेखीं ज्याचा त्यास द्यावा लागे " बाकी कांहीं कोठेंच बिघडलें नाहीं. वस्तु आहे वस्तुपणें–तिला ' पण ' लागलेलें नाहींसें झालें इतकेंच. बाकी होतें तेंच आहे. " देह जावो अथवा राहो । आम्ही होतों तैसे आहों. " मी तरी काय लिहूं ? परंतु लिहिणें जरूर. आपणांस दुःख होणें स्वाभाविक, परंतु आपण विचार करालच. सुमारें ३५।४० वर्षांचा माझा सहवास, त्यांत अंतर आला. कधीं तरी कोणाकडून तरी तसा अंतर येणारच. मागील पुढें चालूच राहणार. याबद्दल खंती असली तरी विशेष नसावी. आपण लिहितां वडिलांचे जागीं मी आहें. परंतु यावरून आपलीच जबाबदारी वाढते, कारण आमचा परामर्ष घेणें आपलेकडेच आहे. अस्तु. कालाय तस्मै नमः "

( १८ ) श्री. **वासुकाका जोशी**, चित्रशाळा पुणें, ता. ११।१।३४ च्या पत्रांत आम्हांस लिहितात " होणार ती गोष्ट चुकत नाहीं. आपल्या समक्ष त्यांचा अंत झाला ही गोष्ट फार चांगली झाली. नाहींतर आपल्या मनांत सारखी रुखरुख राहिली असती. मी त्यांस भेटण्यास अमळनेरास येणार असें पूर्वीं लिहिलेंच होतें, परंतु तेच मुंबईस आले व तेथें भेटण्यास बोलावलें, त्याप्रमाणें मी त्यांस मुंबईस भेटलों होतों. कै. परशुरामपंत यांचा स्वभाव नेहमीं आनंदी व थट्टेखोर व मनमिळाऊ असलेमुळें त्यांच्या मृत्यूमुळें पुष्कळ लोकांस दुःख होईल यांत शंका नाहीं. कै. टिळक, शिवरामपंत वगैरे आमची मंडळी गेली. आतां परशरामपंतजी असे एक एक चालले आहेत. हा सर्व विचार मी करूं लागलों म्हणजे दुःख नाहींसें होतें व वेदांत सुचतो. "

( १९ ) ह. भ. प. **रामचंद्रबुवा दांडेकर** शास्त्री सुप्रसिद्ध कीर्तनकार मु॥ गुडघें पोष्ट दाभोळ येथून लिहितात " १२।१।३४ चा केसरी वाचून हळहळ वाटली. गोविंदसुत आपले तीर्थरूपच होते, परंतु माझेहि ते कोणी तरी होतेच असें मला नेहमीं वाटत असे. ते मला परमप्रिय व सन्मान्य होते व सप्रेमादरानें मला ते मार्गदर्शक होते. वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध, सुप्रसन्न वृत्तीचे, वेदांत–व्यवहारांतील सूक्ष्म मर्मवेत्ते, प्राक्कर्म संस्कारानुकूल भोक्तृत्व भोगून प्रारब्धावशेषांत कालाची मार्गप्रतीक्षा करणारे, देहविकार-प्रकारास साक्षीभूत, निर्विकारी, आत्मानुभवी असे आदर्शभूत पुरुष एकाएकीं आमच्या स्थूलदृष्टीच्या आड झाले ! ती॥ दादांची माझी भेट बरेच वेळां होत असे व प्रत्येक भेटींत त्यांच्या साहचर्यानें फार समाधान वाटे. तें

साहचर्य संपल्याबद्दल वाईट वाटतें पण इलाज काय ? " मृत्युर्जन्मवतां वीर देहेनसह जायते ॥ अद्य वाऽब्दशतांतेवा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः ".

( २० ) श्री. हरिश्चंद्रराव भगवंतराव शिरोडकर व्हिलेंपार्लें ( पेन्शनर स्क्यूअर्ड जे. जे. हॉस्पिटल ) लिहितात " माझा व दादांचा १८ वर्षांचा परिचय. परमार्थचर्चेबद्दल त्यांना फार आवड. प्रपंच व परमार्थ पूर्णपणें साधून दादा केवळ स्वरूपीं तद्रूप होते. दादांनीं आपल्या जन्माचें सार्थक केलें होतें व " क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें " या श्लोकांतील समर्थोक्तीप्रमाणें ते आपला काल कंठीत होते. वृद्धापकाळीं दादांना पुत्रशोक सोसावा लागला, पण तो त्यांनीं धैर्यानें सोसला. माझ्या ऐवजीं मुलावर समन्स बजावण्यांत आलें ही देवाच्या दरबारांत बोलावण्यांत चूक झाली आहे असें ते एकदां शांतपणें म्हणाले. आमच्या घरांतील सर्व लहानथोर मंडळींबद्दल प्रत्येक पत्रांत ते कळकळीनें विचारपूस करीत असत. आमच्या मातोश्री ८३ वर्षांच्या आहेत. दादा आपल्या शेवटच्या दुखण्यांत मुंबईस असतां त्यास भेटावें अशी मातोश्रींची इच्छा होती. परंतु वार्धक्यांतील अशक्तपणामुळें त्यांस चालवत नव्हतें व इकडे दादाही अंथरुणास खिळलेले. मातोश्रींची इच्छा दादांस कळवितांच पायांत कळा चालू असतांच ते मोठ्यानें हंसले व आईस निरोप कळविण्यास सांगितला कीं जर माझें यापुढें आयुष्य वाढलेंच तर येऊन भेटेन. दादांच्या संवादांतील कांहीं शब्द अद्याप आमच्या हृदयांत आहेत ते, " देहानें भेट होणें म्हणजे देह कालाधीन व भेटही कालाधीन. आपल्या आधीन फक्त आपले आपण अखंड आहोंत. आपली आपल्याला तुटी केव्हां झालेलीच नाहीं. आपण अयोनिसंभव आहोंत हें ज्या दिवशीं आपणांस यथार्थ समजेल तोच धन्य दिवस होय. आपण तरी बोधरूप आहोंत. बोधवस्तु स्वयमेव स्वतःसिद्ध आहे, जन्म मरणातीत आहे. आपण स्वांगानें बोधरूप असल्यावर निर्वाणीच्या विठ्ठलाला वाणीनें वाटेल तसें बोलावें ! "

( २१ ) श्री. स. कृ. फडके वकील पनवेल १२।१।३४ च्या पत्रांत आम्हांस लिहितात " तत्त्वज्ञानमंदिरांतील आपल्या पुण्यवान् वडिलांचा लेख मी कालच वाचला व तो लेख वाचून संतोष झाला व आज त्यांच्या मृत्यूची बातमी समजली. फार फार वाईट वाटलें. माझ्या या पुस्तकावर क्रॉनिकलमध्यें कडक टीका आली होती. परंतु आपल्या वडिलां इतकें विस्तृत परीक्षण कोणी केलें नव्हतें. आपल्या वडिलांच्या हातचा हा शेवटचा लेख म्हणून त्यास विशेषच महत्व आलें आहे. आपल्या वडिलांनां मी फार वर्षांपासून ओळखत होतों. त्यांचे मुमुक्षूंतील लेख मी फार आवडीनें वाचीत असें, त्यांचे सर्व ग्रंथ मी घेतले आहेत.

रा. पांगारकर व रा. बाबूराव भिडे या समान मित्रांचे द्वारा आपल्या वडिलांच्या लेखनाच्या हौशीबद्दल अनेक वेळां गोष्टी झाल्या आहेत. मुंबईस नव्या काळ पत्राचे उपसंपादक रा. फाटक यांचे बिऱ्हाडीं त्यांची माझी समक्ष भेट झाली होती. आपले वडील वेदांतावरील एक मार्मिक लेखक होते. त्यांची भाषा कधीं कोणाला बोंचत नसे. फार गोड भाषा लिहीत. अशा स्वधर्माभिमानी लेखकाची उणीव या काळांत भरून निघणें कठीण आहे."

(२२) श्री. गणेश महादेव कुळकर्णी मु. कावनई जिल्हा नाशिक हे गोविंदसुतांच्या सहवासासाठीं विशेष उत्सुक असत. मुंबई व नाशिक येथें बरेच वेळां त्यांस गोविंदसुतांचा सहवास घडला होता. त्यांनीं बऱ्याच आठवणी पाठविल्या आहेत. स्थलाभावामुळें त्यांतील थोडीशीच माहिती देतों. ते लिहितात, "दादांबद्दल अत्यंत आदर असलेले हजारों इसम ज्ञात व अज्ञात आहेत. ते माझ्या व अनंत लोकांच्या अंतःकरणास चटका लावून गेले. नाशिकच्या त्यांच्या मुक्कामांत रात्रंदिवस सहवास त्यांचा लाभे व वेळ कसा जाई तें समजत नसे. दादांचा मुक्काम बापूसाहेब खंडकर (यांस आचरणामुळें दादा ऋषि म्हणत) यांचेकडे असे. तेथें ह. भ. प. पांगारकर व इतर विद्वान् जिज्ञासू जमत. ज्ञानेश्वरी, दासबोध यावरील संवादाला अत्यंत रंग येई. सगुण, निर्गुण हेहि विषय असत. पण तीं॥ दादा हे मुख्य हेडमास्तर व इतर मंडळी शाळेंतील विद्यार्थी असा देखावा दिसे. दादा हे सर्वांना साधार निरुत्तर करून नमवीत, शिवाय विशेष कांहीं तरी सांगून रंजवीत, आनंदवीत व त्यांतच विनोदी कोटिक्रमानें हंसवीत. दादांची आध्यात्मिक तपश्चर्या फार जबर होती. जपून वाद करणारा, वादकुशल व शंका काढण्यांत ज्याचा हात खंडा असा इसम समोर आला तरी दादा हे सहज लीलेनें हंसत हसंत प्रतिपक्षाचे गळ्यांत बाजू अडकवीत व उलट प्रश्न विचारून निरुत्तर करीत, कुंठित करीत व परत प्रेमळ पित्याप्रमाणें विषय समजूनही सांगत. मुंबईस दादा श्वासानें आजारी असतांनां सुद्धां मंडळी जमल्यावर अध्यात्मविषयावर पुष्कळ वेळपर्यंत प्रेमानें बोलत. आपण आजारी आहां फार बोलूं नका असें सांगितलें तरी अध्यात्मविषय निघतांच त्यांस एक प्रकारचें स्फुरण चढे. मजपाशीं तीन हजार रुपये किंमतीची स्वतःची लायब्ररी आहे तथापि त्यांत दादांचीं जीं सर्व पुस्तकें आहेत त्यांस मी वर नंबर देतों व तीं नित्य वाचतों. त्यांचे द्वितीय चिरंजीव वारले तेव्हां नातवास घेऊन व मुलाच्या अस्थी घेऊन नाशीकला ते क्रियेसाठीं आल्यावेळीं मी त्यांच्या सेवेला होतों. या कठिण प्रसंगीं सुद्धां जणूं कांहीं झालेंच नाहीं अशी त्यांची वृत्ति होती. अंतरंगांत अध्यात्म पूर्ण बाणल्यामुळेंच अशी वृत्ति बनली होती व त्यामुळें सर्वांस आश्चर्य

वाटलें ! ती॥ दादांची ती सगुण, साकार, आनंदी, विनोदी व हास्यमुख मूर्ति आतां पुनः कोठें दिसणार नाहीं याबद्दल वाईट वाटतें. आतां वेदांत व अध्यात्म यांची समजूत कळकळीनें व प्रेमानें कोण घालील ? ती॥ दादांचे ग्रंथ तें काम करतात, परंतु ते फारच अपूर्ण वाटतात. ''

( २३ ) रा. तुकाराम पुंडलीक शेटे बुकसेलर मुंबई लिहितात, " हरिभक्तिपरायण दादा यांच्या निधनाची हकीगत ऐकून मनाला अत्यंत वाईट वाटलें. त्यांचे ते वेदांतासंबंधानें ऐकलेले विचार कर्णपथावर अजून आदळत आहेत. त्यांच्या स्वभावांतील सरळपणा व अभिमानशून्यता हे गुण आम्हांला केव्हांही विसरतां येणें शक्य नाहीं. ''

( २४ ) एन्. डी. गर्दे एल्. सी. ई. पेन्शनर मामलेदार पुणें ता. १२।१।३४ च्या पत्रांत लिहितात " आपले वडील माझे फार जुने स्नेही होते. पुण्यास असले म्हणजे दररोज सकाळीं आमचे घरीं त्यांची फेरी असे. फार आजारी असल्याचें समजल्यावरून मुंबईस बर्वे बंधूंकडे मी त्यांस भेटण्यास गेलों. ते आदले दिवशींच अमळनेरास गेल्याचें समजलें. भेट न झाल्यामुळें निराशा झाली व आज केसरीवरून निधनाची दुःखद वार्ता समजली. मी आपल्या दुःखांत वांटेकरी आहें याबद्दल आपणांस खात्रीच आहे. ''

( २५ ) श्री. आ. पां. नवरे झावबाची वाडी मुंबई लिहितात " गोविंदसुत मुंबईस असले म्हणजे मला नेहमीं भेटावयाचे. लायब्ररींत तर त्यांची हटकून गांठ पडावयाची व बोर्डांवरील वृत्तपत्रें उत्कंठेनें वाचीत असल्याची त्यांची उभी मूर्ति आतां दृष्टीस पडावयाची नाहीं, तरी त्यांची अमोलिक पारमार्थिक पुस्तकें हीच आतां प्रत्यक्ष मूर्ति समजून समाधान मानलें पाहिजे. ''

( २६ ) श्री. नारायण महादेव भिडे बी. ए. भोर लिहितात " गोविंदसुत म्हणजे ज्ञानेश्वरी असें त्यांचा परिचय असणाऱ्यांस म्हणतां येणारें आहे. मराठींतील पूर्वपरंपरेच्या जुन्या वाङ्मयाचा व्यासंगी गेला याबद्दल हळहळ वाटणें स्वाभाविक आहे. ज्ञानेश्वर-दर्शन ग्रंथांतील त्यांचा निबंध प्रसिद्ध झालेला पाहण्यास ते हयात असते तर किती चांगलें झालें असतें !"

( २७ ) श्री. के. ल. टेंभुर्णीकर संगमनेरहून लिहितात " वय झालें होतें तरी व्यवस्थित वागणुकीमुळें इतक्या लौकर दादांचें निधन होईल असें वाटत नव्हतें. ज्ञानेश्वरदर्शन ग्रंथांत त्यांच्या नांवाच्या मागें " कैलासवासी " असें विशेषण घालण्याचा दुःखद प्रसंग आमच्यावर आला आहे. पुस्तक पाहण्यास जरी ते नाहींत तरी ग्रंथांत ते आपल्या विचारांच्या रूपानें पुनः आपणांस व जगास दिसतील हें निश्चित. ''

( १८ ) रा. परशुराम गोविंद ढोले पाटील मु॥ रोहण सुंदरमाई पोष्ट डिग्रस लिहितात " गोविंदसुतांच्या निधनाच्या वेळीं मी प्रवासांत होतों, तेथून परततांना अमळनेरास येऊन त्यांचें एकदां दर्शन घ्यावें असे विचार मनांत होते, परंतु त्याप्रमाणें घडलें नाहीं याबद्दल निधनवार्ता ऐकल्यावर फारच पश्चात्ताप झाला ! महाराष्ट्रसंत व संतवाङ्मय यांवरील त्यांचें अलोट प्रेम, अनुपम शांति व परमेश्वरावर निष्ठा हे सद्गुण अवर्णनीय होते. पारमार्थिक ग्रंथनिर्मितीमुळें अखिल महाराष्ट्र जनतेचें मन त्यांनीं आकर्षित केलें. ज्यांस त्यांचा मजप्रमाणें परिचय असेल अगर ज्यांनीं त्यांचे ग्रंथ अवलोकन केले असतील त्या सर्वांना मजप्रमाणेंच त्यांच्या निधनानें दुःख झालें असेल ! ते पंचत्वास गेल्याची वार्ता कळतांच त्यांच्या प्रीत्यर्थ " श्रीज्ञानेश्वर माउली " या मंत्राचा मी एक प्रहरभर जप करून त्यांच्या आत्म्यास शांती देण्याबद्दल ईशप्रार्थना केली. अशा हरिभक्तिपरायणास अखंड शांति व सद्गति मिळणारच. "

( १९ ) रा. गोपाळ नरहर मोघे बी. ए. ( मुंबई म्युनिसिपालिटींत नोकर ) लिहितात " दादासाहेबांसारखीं स्थितप्रज्ञ माणसें ज्या कुटुंबांत जन्मास येतात त्या कुटुंबाचें भाग्य तर मोठेंच, पण अशीं माणसें केवळ त्या कुटुंबाचींच नसून ज्या कार्याकरितां तीं जन्म घेतात त्या कार्यकक्षेंत येणाऱ्या सर्व जनतेचीं तीं असतात म्हणूनच त्यांच्या मृत्यूनें फार मोठ्या जनतेची हानी झाली आहे !"

( ३० ) रा. रघुनाथ गणेश खंडकर, सब ओव्हरसिअर देवरुख लिहितात, " ता. १२।१।३४ च्या नव्याकाळांत दादांचा फोटो पाहतांच मनाला चरका बसला. लगेच खालील मृत्युलेख वाचतांच सर्व हकीगत ध्यानीं आली. ३१।१२।३३ रोजीं मुंबईस कांहीं कामासाठीं मी गेल्या वेळीं बर्वेबंधूकडे त्यांस भेटलों होतो, त्यावेळीं त्यांची प्रकृति अशक्त दिसली तरीही कॉटवर बसून लेखन, वाचन व आल्यागेल्याशीं प्रेमळ संभाषण वगैरे व्यवहार पूर्ववत् सुरू होते. यावरून ते इतक्यांतच इहलोक सोडून जातील अशी शंकासुद्धां आली नाहीं. परंतु ईश्वरीसूत्र कांहीं निराळें असतें ही गोष्ट प्रत्ययास आली. मी ४ वर्षांत मुंबई पुण्याकडे गेलों नाहीं, यामुळें दादांची तिकडे भेट झाली नव्हती, परंतु आयत्यावेळीं मुंबईस एक दिवसापुरतें जाण्याचें काम निघालें व कै. दादांच्या शेवटच्या भेटीचा सुयोग होता म्हणूनच कांहीं तरी किरकोळ काम मुंबईस जाण्याचें निघालें असें आतां वाटतें. शेवटच्या दिवसाकरितां ते अमळनेरास आले व घरच्या सर्व माणसांस दर्शन देऊन निजधामास गेले हाहि योगायोग बरा झाला असें वाटतें. त्यांच्या सद्गुणांचें यथार्थ वर्णन करतां येणें अशक्य आहे । "

( ३१ ) श्री. दत्तात्रय श्रीधर जोशी आय्. सी. एस्. बार ॲटला असिस्टंट कलेक्टर भडोच १२।१।३४ च्या पत्रांत लिहितात " ती॥ दादा परलोकवासी झाल्याची दुःखद वार्ता समजून फार वाईट वाटलें. पुण्याकडे जातांना व पुण्याहून परत येतांनां नुकतीच नाताळांत दोन वेळां मुंबईस मी त्यांची भेट घेतली. परंतु त्या भेटी अखेरच्याच ठरतील असें तेव्हां मुळींच वाटलें नाहीं. परंतु ईश्वरी सत्तेपुढें इलाज काय ?"

( ३२ ) रा. सदाशिव दत्तात्रय भागवत शास्त्री हॉल मुंबई १४।१।३४ च्या पत्रांत लिहितात " दादांची राहणी साधी असून त्यांचा स्वभाव फार विनोदी व परिचित लोकासंबंधानें फार आस्थेवाईक होता. त्यांनां कंटाळा हा कधींच माहीत नव्हता. ते सतत विद्याभ्यासंगी होते. त्यांच्या भक्तिमार्गातील व वेदांतावरील लेखांमुळें येथें व इतरत्रही त्यांचा शिष्यवर्ग फार मोठा आहे. पुस्तकरूपानें व प्रत्यक्ष उपदेशानें आपल्या शिष्यांनां त्यांनीं अमूल्य फायदा दिलाच आहे, परंतु आमच्या सारख्या अनधिकारी जनांना सुद्धां ते हितकारक उपदेश करीत असत. दासबोध वगैरे समर्थांचे ग्रंथ सतत नियमानें वाचण्यास शेवटीं शेवटीं त्यांनीं मला कळकळीनें सांगितलें आहे.

( ३३ ) श्री. विष्णु रामचंद्र देव, देवास पाती २ हे कित्येक वर्षांपासून गोविंदसुतांस पत्रव्यवहारानें सुपरिचित होते व त्यांच्या प्रत्यक्ष भेटीबद्दल पुष्कळ वेळां त्यांनीं योग आणण्याचा प्रयत्न केला, परंतु मुंबईहून गोविंदसुत नुकतेच दुसरीकडे गेलेले असें होऊन चुकामुक पडे. ते लिहितात " आपल्या वडिलांस मिळण्यासाठीं दरसाल प्रमाणें संक्रांती निमित्त तिळगूळ पोष्टांत टाकल्यानंतर दुसऱ्या दिवशीं त्यांच्या निधनाचें शोचनीय वृत्त समजून फार हळहळ वाटली. त्यांची व माझी प्रत्यक्ष भेट होण्याचा कधींच योग आला नाहीं, परंतु माझ्यावर त्यांचें पूर्ण कृपाप्रेम होतें व माझ्याबद्दल त्यांस फार कौतुक वाटत असे हें त्यांच्या लिहिण्यांत नेहमीं व्यक्त होई. आमची त्यांच्या ठिकाणीं असलेली परम पवित्र आदरबुद्धि पाहून एकवार इकडे येऊन दर्शन देण्याबद्दल सालोसाल आम्ही त्यांस लिहीत होतों व त्यांचाही हेतु होता, परंतु तो योग घडून येण्याची ईश्वरी योजना नव्हती ! "

( ३४ ) श्री. जनार्दन गोविंद रायकर भवानीपूर कलकत्ता लिहितात, " केसरीवरून पूज्य दादांच्या निधनाची वार्ता समजली. ता. ४।१।३४ रोजीं मी बर्वेबंधूंकडे मुंबईस त्यांस भेटलों होतों. त्यावेळीं प्रकृति चांगली नव्हती तरी बरी होती. त्यांचा आणि बर्वेबंधूंचा पूर्व जन्मींचा

कांहींतरी संबंध असला पाहिजे असें कोणालाही वाटलें असतें इतक्या आपुलकीच्या भावानें त्यांची सेवा चाकरी ते करीत असत त्यामुळें व श्री. आप्पाशास्त्री साठे यांच्या औषधानें उपयोग होईल असें वाटत होतें. परंतु मी भेटल्यानंतर २।४ दिवसांत प्रकृतींत इतका फरक पडून हा प्रसंग एकाएकींच ओढवला असें दिसतें. जानेवारी अखेरपर्यंत मुंबईस राहण्याचा इरादा असल्याचें ४ जानेवारीस ते मला बोलले होते. ते आपलें काम उत्कृष्ट रीतीनें समाप्त करून मागें अजरामर कीर्ति ठेऊन गेले आहेत यांतच समाधान मानणें भाग आहे !

( ३५ ) श्री. **विठ्ठलदास लालदास रोहेकर,** ठाणें लिहितात, " गोविंदसुत हे वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध होते. ते नरदेहाचें सार्थक्य स्वतः करून गेले आहेत व परमार्थमार्गांतील निरनिराळया ग्रंथांनीं जनतेच्या उद्धारार्थ अनंत उपकार करून नांवलौकिक संपादला आहे. "

( ३६ ) श्री. **गंगाधर माधवराव देशपांडे** फत्तेखेर्डा लिहितात " मुमुक्षूंत लेख येऊं लागल्यापासूनच त्यांच्याबद्दल आम्हांस पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. पुढें ते स्वतः या भागांत २।३ वेळां येऊन गेल्यानें इकडील जनतेची व त्यांची चांगलीच ओळख झाली. ते गेल्यानें आमचेंही छत्र नाहींसें झालें यांत शंका नाहीं. आपल्या वडिलांस आम्ही गुरुस्थानीं मानीत होतों. यामुळें आपल्या दुःखांत आम्ही इकडील सर्व मंडळी भागीदार आहों. त्यांच्या परलोकवासाचें वृत्त महाराष्ट्र पत्रावरून आम्हांस प्रथम समजलें "

( ३७ ) श्री. **यशवंत खंडेराव कुळकर्णी** मु० जानेफळ ( अवधूतानंद स्वामींचें संस्थान ) जि० बुलढाणा लिहितात " परशुरामपंतबाबा कैलासवासी झाल्याचें वृत्तपत्रांत वाचून फार वाईट वाटतें. सर्वांचा ज्ञानाधार नाहींसा झाला ! त्यांची कृपादृष्टि आमचेकडील जनतेवर होती. "

( ३८ ) रा. **शंकर गोविंद डिके,** जुनें इंदूर लिहितात " उत्तरेकडील तीर्थयात्रेस जातांना इंदुरास येऊन भेटूं असें गोविंदसुतांनीं एकदां लिहिलें होतें, परंतु तो योग आला नाहीं. त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांच्या योगानें ते चिरस्मरणीय झाले आहेत. अशा सज्जनांचा सहवास चिरकाल असावासा वाटतो, पण तसा तो मिळतो क्वचित् . "

( ३९ ) श्री. **गोविंद भीमराव रापोळे** मु॥ चिटगिड्डा पोष्ट विकाराबाद निजामस्टेट रेलवे हे पेन्शनर गृहस्थ गोविंदसुतांपेक्षांही वयोवृद्ध आहेत व वेदांत विषयांत चांगले अधिकारी आहेत व गोविंदसुतांचे ग्रंथ वाचल्यापासून ते त्यांच्यावर फारच प्रेम करीत असत. कांहीं दिवस मुद्दाम

त्यांनीं गोविंदसुतांस आपल्याकडे बोलावून आग्रहानें राहून घेतलें होतें व अमळनेर येथें महिना दोन महिने पुनः त्यांच्या सहवासासाठीं येण्याचा त्यांचा इरादा होता. गोविंदसुतांच्या आजारीपणांत दरपंधरवाड्यास त्यांच्याकडून कुशल समजण्यासाठीं म्हणून जोडकार्ड यावयाचेंच. गोविंदसुतांच्या निधनानंतर ते लिहितात " महाराजांचें परमपदास जाणें पाहून प्रपंचरीत्या अतीशय वाईट वाटलें. महाराज महा अनुभवी होते. उपाधीमध्यें ते अलिप्त होते व उपाधी नाहींशी झाल्यावर जसेच्या तसेच आहेत. उपाधी जाणारच. निजवस्तु अचल, अमर आहे. त्यांच्या आत्म्यास शांति मिळणारच. आमच्या सारख्या पामरांची प्रार्थना औपचारिकच होईल. आमचा मुख्य आधार आज गेला हें आमचें दुर्दैव च म्हणावयाचें."

( ४० ) श्री. म. ना. गोडसे ४८ शुक्रवार पुणें लिहितात " परशुरामपंतांचा व माझा परिचय १८९२।९३ सालापासून अखेरपर्यंत अगदीं निकटचा होता. ते व मी कांहीं वर्षे वे. शा. सं. साखरेबुवांचे मठांत अध्यात्मज्ञानश्रवणास जात होतों. परशुरामपंतांस ज्योतिष शास्त्राच्या ठळक गोष्टी समजत होत्या व मलाहि ज्योतिष व वेदांताचा नाद, यामुळें श्रवण आटोपल्यावर त्यांच्या अगर माझ्या बिऱ्हाडीं ऐकलेल्या विषयांची चर्चा, वाटाघाट, मनन वगैरे आमच्या उभयतांमध्यें नेहमीं होत असे. त्यांना दांभिक लोक बिलकूल आवडत नसत. त्यांचा पोषाख नेहमीं साधा व राहणी साधी. त्यांचा स्वभाव प्रेमळ व आचार उत्तम असे. मुलकीखात्यांत त्यांच्यासारखा मार्मिक, बाणेदार, पूर्ण माहितीनें काम करणारा असा विरळाच. व्यवहारांत ही विचारयुक्त वर्तन, फार दक्षता व अत्यंत चोखपणा असे ".

( ४१ ) रा. नारायण अनंत शेंबेकर सांवर्डें लिहितात " दादांची आठवण झाली म्हणजे त्यांची ती प्रत्यक्ष मूर्तिच डोळयांपुढें उभी राहते. त्यांचें विनोदपर भाषण, चटकदार गोष्टी सांगण्याची शैली व दासबोध ज्ञानेश्वरी सांगतांना त्यांना येणारें प्रेमाचें स्फुरण या सर्व गोष्टी येथील आम्हां सर्वांनीं अनुभविल्या आहेत. येथें आले म्हणजे दररोज ज्ञानेश्वरी दासबोध चालत असे व आबालवृद्धांस हें ज्ञानामृत ते पाजीत असत. हा विषय निघाला म्हणजे त्यांचे व ऐकणारांचेहि श्रमपरिहार होत असत. कोंकणांत पुन: केव्हां येणार असें विचारलें म्हणजे थट्टेनें म्हणत असत कीं या प्रांतांतील भूमीचा संसर्ग फार दुष्ट आहे. राम लक्ष्मण या प्रांतांत आल्यावेळीं लक्ष्मणाची बुद्धि पालटली होती व रामाची सेवा न करतां त्याच्याशीं भांडून राज्याचा हिस्सा घ्यावा असें त्यास वाटे. रामानें देशावरील थोडीशी माती बरोबर आणली होती त्यावर लक्ष्मणास उभें राहण्यास सांगतांच लक्ष्मणाची बुद्धि

पूर्वीप्रमाणें सात्विक झाली, अशी आख्यायिका गमतीनें सांगत. परंतु आपल्या जन्मभूमीचा व प्रांताचा त्यांस जाज्वल्य अभिमान असे व वारंवार ते इकडे येत. गेल्या वर्षीं गोकर्णमहाबळेश्वराहून परत येतांना आम्हां सर्वांस मांडकी येथें बोलावून भेट दिली त्या वेळीं बोलले कीं हा मर्त्य देह यापुढें फार दिवस टिकणार नाहीं व आतां यापुढें माझें कोंकणप्रांतांत येणें अशक्य आहे, तीच भेट अखेरची ठरली ! ते येथें आले म्हणजे गांवांतील ग्रामदेवता वगैरे सर्व देवळांत जात व सर्व परिचित मंडळींस त्यांच्या घरीं जाऊन मुद्दाम भेटत असा क्रम असे. लहान मोठ्यांशीं सारखीच साधी वागणूक असे. त्यांची मूर्ति पाहिल्याबरोबर सर्वांच्या मनास आनंद होई व सदोदित त्यांच्या संगतींत असावें असें प्रत्येकास वाटत असे ! ''

( ४२ ) आवासचे गुरुवर्य बापट यांचे चिरंजीव रा. **बाळकृष्ण दत्तात्रेय बापट** ( सबूपोस्टमास्तर माथेरान ) हे ता. १२।१।३४ रोजीं माथेरानहून अमळनेर मुक्कामीं आपल्या वडिलांस लिहितात, '' एकदां ऐकूं येणारी गोष्ट इतक्या अनपेक्षित रीतीनें ऐकूं येईल असें वाटलें नव्हतें. आपण तीर्थरूप दादासाहेब चिंचाळकरांस रा. बापूसाहेब यांचेकडे अखेर घेऊन जाऊं शकलां व आपल्या सर्वांच्या इच्छेप्रमाणें बापूसाहेब यांचे शेवटीं हात लागले हा योगच म्हणावयाचा. आपला व दादांचा फार ऋणानुबंध. चिंचाळकर मंडळीबद्दल असणाऱ्या प्रेमामुळेंच अखेर तरी आपला उपयोग झाला हा कांहीं कमी योग नव्हे. ती॥ दादासाहेब दिवंगत झाले तें यथानुक्रमच जाहलें, तथापि आपणांस निरंतर स्वकीयांप्रमाणें मानणारा व निरलस कार्यकर्ता मनुष्य नाहींसा झाला ही उणीव लवकर भरून निघणारी नाहीं. धामणीकर बुवा, श्रीगुरुपरशुरामपंत व आपण यांचा ऋणानुबंध व प्रेम लक्षांत घेतां बापूसाहेबांइतक्या वेदना आपणांसही जाहल्या असणार हें मी जाणतों. फार दिवसांच्या योगामुळें स्वकीय हानीइतकेंच मलाही वाईट वाटतें.

टीपः- वरील ४२ पत्रें केवळ नमुन्यासाठीं म्हणून दिलीं आहेत. याखेरीज श्री. बापुसाहेब खंडकर पेन्शनर नाशीक, वैद्यराज जगन्नाथ विश्वेश्वर कर्वे किहीम, गणेश रघुनाथ फग्रे वकील कोरेगांव, अंतुकाका फडणीस केसरी कचेरी पुणें, गोपाळ बळवंत जोशी पेन्शनर हेड कारकून पुणें, गोविंद बळवंत नाईक, मेकॅनिकल इंजिनिअर, अमळनेर ( चोपडें मुक्कामाहून ), बाळकृष्ण महादेव राजदेरकर हायस्कूल शिक्षक अमळनेर, ( जळगांव मुक्कामाहून ), पैसाफंड प्रचारक अक्कलकोटकर यांचे मिरज मुक्कामाहून, स. ना. पाटणकर सिनेमा आर्टिस्ट दादर, शामरावपंत नवरे स्वारी कारकून श्रीशंकराचार्य श्रीमज्जगद्गुरु मठ संकेश्वर

करवीर, पुरुषोत्तम गोपाळ जोशी, वकील, एरंडोल, दत्तात्रय नरहर मोघे दक्षिण हैद्राबाद, अनंत लक्ष्मण हळबे, शिक्षक मु॥ कान्हें, अनंत गोविंद तांबे वैद्य उमरावती, दत्तोपंत आंबर्डेकर कराड, गोविलकर बंधु पळस्पे, महादेव सिद्धेश्वर ठकार, पुणें वगैरे असंख्य सज्जनांकडून व आप्तेष्टांकडून सहानुभूतीच्या प्रेमळ पत्रांचा वर्षाव झाला आहे. केवळ स्थलसंकोचास्तव कित्येकांचा नामनिर्देशही करतां आला नाहीं व त्यांनीं गोविंदसुतांबद्दल काढलेले आठवणींचे प्रेमळ उद्गार स्थलाभावामुळेंच देतां आले नाहींत अशा सर्व परिचित, अपरिचित सद्गृहस्थांचे, तसेंच प्रबोध, प्रागतिक, नवाकाळ, केसरी, महाराष्ट्र, सकाळ, ज्ञानप्रकाश वगैरे वृत्तपत्रें व चित्रमयजगत्, महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, लोकमित्र वगैरे मासिक पुस्तकें यांच्या संपादकांनीं गोविंदसुतांचे मृत्युलेख लिहून गुणगौरव करून सहानुभूति व्यक्त केली याबद्दल सर्वांचे जाहीर रीत्या आम्ही आभार मानतों.



# गोविंदसुत परशुराम-स्मृतिहार

( गुंफणार गणेश रामकृष्ण शहाणे, चाळीसगांव )

## आर्या

गोपाल कृष्ण पावन धार्मिक तैसाचि धर्मनय मान्य ॥
विंध्याचल धैर्यानें चिंचाळकरप्रताप गुण धन्य ॥ १ ॥

दक्षिण हस्त जयाचा दक्ष सदा धर्म लेख कार्यांत ॥
सुज्ञ करी स्वसनातनवैदिकधर्मप्रसार आर्यांत ॥ २ ॥

तरती जन आध्यात्मिक परमार्थग्रंथ पाहतां ज्यांचे ॥
परपुण्य कार्य चालवि विद्येचें आणि जो समाजाचें ॥ ३ ॥

रमला न कीं प्रपंचीं रतला जो ग्रंथ वाङ्मयाभ्यासीं ॥
शुक्ल प्रभा विधूची निर्मलसी कीर्ति लाभली ज्यासी ॥ ४ ॥

रामस्मरणें ज्याला पुत्राचा शोक बाधला नाहीं ॥
मग्न निजानंदीं हो संतसमागम करूनि जो राही ॥ ५ ॥

स्मृति मोरोपंतांची येई यद्ग्रंथलेख पाहून ॥
तिमिर हरो चित्ताचें कोमल हें प्रेमपुष्प वाहून ॥ ६ ॥

हा अमळनेरवासी विप्र कऱ्हाडे सदैव कोंकणचा ॥
रमणीय हार अर्पी दास शहाणे गणेश त्या स्मृतिचा ॥ ७ ॥



# कैवल्यवासी श्रीगोविंदसुत

( लेखकः-रा. ल. घरत. )

कैवल्यवासी श्री. परशुराम गोविंद चिंचाळकर हे प्रथम गोविंदसुत या नांवानें मुमुक्षु साप्ताहिकांतील त्यांच्या पारमार्थिक लेखांवरून एक उत्तम वेदान्ती म्हणून माझ्या परिचयाचे झाले. त्यांच्याबद्दल मी विशेष चौकशी केल्यावर मला असें कळलें कीं, ते सरकारी नोकर असून श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं श्रीदासबोधाच्या बाराव्या दशकाच्या पहिल्या समासांत म्हटल्याप्रमाणें " आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका । येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १ ॥ प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंचपरमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥ २ ॥ प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला । मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥ परमार्थ सांडून प्रपंच करिसी । तरी तूं यमयातना भोगिसी । अंतीं परम कष्टी होसी । यमयातना भोगितां ॥ ४ ॥ " या उच्चतम मुमुक्षुकोटींतील एक थोर सज्जन होते. पण पुढें माझ्या असें चांगलें अनुभवास आलें कीं, साधक दशा आणि अंतर्यामांतील पूर्ण सिद्धावस्था त्यांस लाभली होती. त्यांनीं चतुर्थाश्रम केला नव्हता, परंतु भगवान् श्रीकृष्णांनीं म्हटल्याप्रमाणें " काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः । " हा संन्यास त्यांचा होताच. श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांची स्थिति " साधु वस्तु होऊन ठेला । संशय ब्रह्मांडाबाहेरि गेला । निश्चय चळेना ऐसा जाला । या नांव सिद्ध ॥ १ ॥ जो जनांमध्यें वागे । परी जनावेगळी गोष्टी सांगे । ज्याचे अंतरीं ज्ञान जागे । तोचि साधु ॥ २ ॥ दिसतो तरी देहधारी । परी कांहींच नाहीं अंतरीं । तयास पाहातां वरिवरि । कळेल कैसा ॥ ३ ॥ ......साधु आत्मज्ञानी । बोधें पूर्ण समाधानी । विवेकें आत्मनिवेदनी । आत्मरूपी ॥ ४ ॥ " अशा प्रकारचीच होती. लोकसंग्रहासाठीं त्यांनीं अनेक उद्बोधक लेख लिहून मुमुक्षूंस उपकृत केलें आहे.

मुमुक्षु साप्ताहिक वृत्तपत्र होतें तेव्हां त्याचे संपादक ह. भ. प. पांगारकरबुवा यांनीं एका अंकांत श्रीदासबोधान्तर्गत दोन ओंव्या देऊन त्यांचा सांप्रदायिक पद्धतीचा अर्थ विचारला होता. मी त्या वेळीं उरणास राहात होतों व तेथून " एक सांप्रदायिक " या सहीनें मीं त्या दोन ओंव्यांचा विस्तृत अर्थ मुमुक्षूकडे पाठविला. तो प्रसिद्ध करतांना

मुमुक्षुकारांनीं " उरणकर सांप्रदायिकांचें सुंदर पत्र " असा त्याबद्दल उल्लेख केला होता. कै. गोविंदसुतांनीं त्यानंतर त्याच ओंव्यांचा मुमुक्षूंत अधिक विस्तृत अर्थ प्रसिद्ध करून त्यांत कारणपरत्वें उरणकर सांप्रदायिकाचाही उल्लेख केला होता. ते प्रथम सासवन्यास आले त्या वेळीं त्यांबरोबर माझें या दोन ओंव्यांबद्दल थोडें संभाषणही झालें होतें.

कै० गोविंदसुतांचें मुमुक्षु व साधक यांना अत्युपयुक्त असणारें आणि विद्वानांना आनंद देणारें बहुविध व बहुमोल वाङ्मय आहे. तें प्रायः सर्व प्रसिद्ध झालें आहे. मी अलिबाग तालुक्यांतील श्रीकनकेश्वर देवस्थानाचा एक विश्वस्त असून माझ्या शिफारशीवरून विश्वस्त मंडळानें गोविंदसुतांचे सर्व ग्रंथ देवस्थानच्या धार्मिक ग्रंथसंग्रहालयासाठीं विकत घेतले, आणि साप्ताहिक व मासिक मुमुक्षुही चालू केला. ते ग्रंथ व मुमुक्षु अनेकांच्या वाचण्यांत आले आहेत व पुढेंही वाचले जातील.

कै० गोविंदसुतांचे स्नेही व त्याप्रमाणेंच वेदान्ताचे व्यासंगी श्रीयुत द. य. बापट हे कायमचे आवासास राहावयास आल्यावर गोविंदसुत त्यांकडे आवासास अनेक वेळां आले. मी अलीकडे कांहीं वर्षे सासवन्यास राहात आहें. तथापि श्रीयुत बापट यांच्या प्रेमामुळें मला कै. गोविंदसुतांच्या दर्शनाचा व अल्प सहवासाचा सासवन्यासच अनेकदां लाभ मिळाला. गोविंदसुत आवासास आल्यावर प्रत्येक वेळीं सासवन्यास येत. एकदां तर श्रीयुत बापट कांहीं कामासाठीं इतरत्र गेल्यामुळें ते माझ्याकडे एकटेच आले होते. ही त्यांची मजवर शेवटचीच कृपा होती. ते कैवल्यधामास गेल्यावर त्यांच्या चिरंजीवांस मी लिहिलेल्या पत्रांत त्यांचें चरित्र प्रसिद्ध झाल्यास तें मुमुक्षु व साधक यांस चांगलें मार्गदर्शक होईल असें मीं त्यांस सुचविलें होतें. त्यांचे चिरंजीव चरित्र लिहून प्रसिद्ध करीत आहेत हें समजून मला फार संतोष वाटत आहे. तें चरित्र मननपूर्वक वाचून नवीन पिढींतील तरुण आपलें जन्माचें सार्थक करून घेतील अशी आशा करून मी हे त्या सत्पुरुषाच्या ठिकाणीं असलेल्या माझ्या आदर बुद्धीचे निदर्शक माझे दोन वेडेवांकडे शब्द त्यांच्याच चरणीं अर्पण करून वाचकांची रजा घेतों.



# कै० गोविंदसुत यांचें अल्प स्मरण

( ले. त्र्यं. ग. जावडेकर, धुळें )

कै० गोविंदसुत हे त्यांच्या पुण्याच्या मित्रमंडळींत ' महाराज ' या नांवानें संबोधले जात व इतरत्र ' दादा ' या नांवानें संबोधले जात. त्यांचें व माझें विशेष संघट्टन त्यांच्या सेवानिवृत्तीनंतरच सुरू झालें. तत्पूर्वी तें फारसें नव्हतें. प्राकृत अध्यात्मग्रंथवाचकांमध्यें मी नेहमीं दोन वर्ग पाडीत असतों. हे दोन पुठेच जर कल्पिण्यांत आले, तर एकाचें नांव ' ज्ञानेश्वरी पुठा ' व दुसऱ्याचें नांव ' दासबोधी पुठा ' असें ह्मणण्याला मला कांहीं प्रत्यवाय वाटत नाहीं.

कै० दादांचा व्यासंग जरी ज्ञानेश्वरी व दासबोध अशा उभय ग्रंथांचा होता, तथापि प्रत्येक पंथाचें जें एक ' वैशिष्ट्य ' आहे तें लक्ष्यांत घेतां मी त्यांना ज्ञानेश्वरी गटांतले न समजतां दासबोध गटांतले समजत आलों आहें. शालेय शिक्षण केवळ अल्प असतांही त्यांनीं आपला वाचनव्यासंग अगदीं मरेपर्यंत कायम ठेऊन आपली ज्ञानवृद्धि कशी करून घेतली याची साक्ष त्यांचे ग्रंथच देत आहेत. सतत केवळ कादंबऱ्यांच्या वाचनाला चटावलेल्या आजकालच्या तरुणांनीं यापासून एक उत्तम बोध घेण्यासारखा आहे.

कै. दादांच्या चरित्रापासून तरुणांनीं आणखी एक घेण्यासारखा गुण ह्मणजे त्यांची ' निरलसता ' हा होय. ते आपल्या वयाच्या ७२ व्या वर्षी वारले. पण त्यांच्या वयाच्या ७० व्या वर्षापर्यंत मी असें पहात असे कीं ते पहांटे ३ वाजतां उठून त्यांना जें लिखाण करावयाचें असेल त्याला ते सुरुवात करीत. सकाळीं ८।८ वाजेपर्यंत अंथरुणांत लोळत पडणाऱ्या सांप्रतच्या तरुणांनीं ह्यापासून एक धडाच शिकावा असें आहे.

त्यांचे वळणदार मोडी अक्षर यापुढें पाहण्यास मिळणें अशक्यच गोष्ट आहे. त्यांच्या हातचीं मोडी पत्रें जीं आज कायम असतील तेवढींच काय तीं पहावयास मिळावयाचीं. नव्या पिढीमध्यें मोडी लिहिण्याचा मुळीं सरावच राहिलेला नाहीं. कित्येकांना मोडी वाचतां सुद्धां येत नाहीं असें झालें आहे. मग लिहितां येणें तर लांबच राहिलें. कै. दादा एका कार्डामध्यें ५०।६० ओळी मोडीच्या लिहीत असत. ह्यापासून सुद्धां तरुणांनीं कांहीं शिकण्यासारखें आहे.

कै. दादा हे जरी मूळचे कै. लोकमान्यांचे मोठे चहाते होते तरी त्यांच्या पश्चात् म. गांधींच्या अंगीं जे कांहीं लोकोत्तर गुण त्यांना दिसून आले त्यामुळें ते त्यांचे नुसते चहाते झाले इतकेंच नव्हे तर त्यांचें राजकारण सुद्धां त्यांना बऱ्याच अंशीं पसंत होतें. तथापि ते नेहमीं असें म्हणत कीं हिंदुस्थानच्या लोकांत क्षात्रतेज निर्माण झाल्याशिवाय त्यांना पूर्ण स्वातंत्र्याची अपेक्षा करतां येणार नाहीं. म. गांधींच्या खादीचा दादांनीं एकदां जो अंगीकार केला तो त्यांनीं आमरण कायम ठेवला. खादी ही गरीबांची तारणकर्त्री आहे अशी त्यांची खात्री पटलेली होती. खादीचा उपहास करणारांनीं ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

महाराष्ट्रांतल्या पेन्शनर लोकांनाही दादांच्या चरित्रापासून एक बोध घेण्यासारखा आहे. तो असा कीं एका नोकरींतून निवृत्त झाल्यानंतरही दुसरी कसली तरी नोकरी पत्करून आयुष्य कंठीत राहण्याचा मोह कित्येकांना केवळ अनावर झालेला असतो तसा तो मोह दादांना केव्हांच पडला नाहीं. त्यांचे वशीले इतके होते कीं त्यांना एकाद्या संस्थानांत पुनः नोकरी मिळणें अशक्य गोष्ट मुळींच नव्हती.

असें असतांही त्यांनीं आपला काळ पत्ते खेळून न घालवितां लेखन, वाचन, श्रवण व मनन यांतच केवळ घालविला ही गोष्ट त्यांना भूषणास्पद अशीच होती. आणि ती सेवानिवृत्तांनीं द्रव्यलोभ बाजूस ठेऊन घेण्यासारखी नाहीं असें कुणाला तरी प्रामाणिकपणें म्हणतां येईल काय ?

कै. दादांच्या पासून आणखी एक घेण्यासारखा गुण म्हणजे त्यांचा व्यवहारांतील अत्यंत चोखपणा. तरुण पिढीनें तोही अनुकरण करण्यायोग्य आहे. आजकालच्या तरुण पिढींत नुसती छानछोकी मात्र मनमुराद घुसलेली आहे. पण तिचे व्यवहार जर पाहिले तर ते बहुतांशीं 'भोंगळसुतीच' असतात असें दिसून येतें. तसें केव्हांही नसलें पाहिजे. कै. दादांच्या अंगीं दोष कोणतेही नव्हते असें मला म्हणावयाचें नाहीं. ते प्रत्येकांत असतातच. मग ते त्यांच्यांतही कांहीं असल्यास त्याचें मोठेंसें नवल नाहीं.

माझी दृष्टि नेहमीं कुणाच्याही अंगांत जे कांहीं गुण म्हणून दिसत असतील तेवढेच पहात जावे अशी असल्यामुळें त्यांच्या अंगच्या कांहीं गुणांचा मी उल्लेख केलेला आहे. तिकडे तरुण पिढी जर लक्ष्य देईल तर तिचेंच कल्याण होईल हें कांहीं सांगावयास नकोच आहे.



# आठवणींचे रजःकण



(१) लोकमान्यांच्या आठवणी व आख्यायिका भाग २ पृष्ठ २७७।२७८ यांत गोविंदसुत लिहितात:—" आम्ही लोकमान्यांच्या गीतारहस्यावर विनोदात्मक विरुद्ध टीका म्हणून रहस्यनिरीक्षण या नांवाचा ग्रंथ लिहिला होता. तो विनोदात्मक असल्यामुळें चित्रशाळेंतील कंपॉझिटर कंपोज करण्यापूर्वी सर्व मजकूर आवडीनें प्रथम वाचून मग कंपोज करीत असत. ' मजकूर वाचण्यांत तुमच्या पुस्तकामुळें आमच्या कंपॉझिटरांचा विनाकारण वेळ मोडतो हें चांगलें नाहीं ' असे चित्रशाळेचे मालक वासुकाका जोशी आम्हांस विनोदानें बोलले. ही हकीगत लोकमान्यांच्या कानावर गेली तेव्हां लोकमान्यांनीं वासुकाकांस निरोप धाडला कीं " परशुरामपंतांचें पुस्तक कंपोज करण्याला तुमच्या कंपॉझिटरांचा मजकूर वाचण्यांत विनाकारण वेळ जात असेल तर मजपाशीं दोन मुसलमान कंपॉझिटर आहेत ते कंपोज करण्यास पाठवून देतों. ! "

(२) १९१४ च्या जूनमध्यें सरकारनें लोकमान्यांस मंडालेच्या तुरुंगांतून सोडून आपल्या घरीं मध्यरात्रीं आणून अवचित उभें केलें. आपण सुटून आल्याबद्दलची आनंदाची खबर लोकमान्यांनीं रातोरात पुण्यांतील सर्व मित्रमंडळींस कळविली. लोकमान्यांनीं ज्या १०।२० मित्रमंडळींस बोलावण्यासाठीं म्हणून प्रथम आठवण केली त्यांत गोविंदसुत होते. त्या वेळीं केसरीकचेरींत असलेले रा. विनायकराव भुस्कुटे रात्रीं २ वाजतां गोविंदसुतांच्या घरीं आले व लोकमान्यांचा निरोप त्यांस सांगितला व लगेच गोविंदसुत लोकमान्यांस भेटण्यास गेले. ही हकीगत गोविंदसुतांच्या तोंडून आम्हीं ऐकली आहे.

(३) गोविंदसुतांचा फलज्योतिषशास्त्राचा व्यासंग दांडगा होता. १९१७।१८ सालचे सुमारास लोकमान्यांच्या नेतृत्वाखालीं स्वराज्यसंघाचें शिष्टमंडळ कोलंबो मार्गानें विलायतेस जाण्याचें मुक्रर झालें होतें. " या वेळीं तुमचें विलायतेस जाणें होत नाहीं असें माझें फलज्योतिषाच्या आधारें भविष्य आहे " असें मुंबईस जाण्यापूर्वीच गोविंदसुतांनीं लोकमान्यांस निक्षून सांगितलें होतें. पुढें कोलंबोपर्यंत जाऊन बोटींत पाय ठेवतांना विलायत सरकारकडून दिल्लीच्या व्हाइसरॉयमार्फत एक व मद्रासच्या गव्हर्नरमार्फत एक अशा तारा येऊन टिळक व केळकर यांचे पासपोर्ट रद्द करण्यांत आल्याचे हुकुम बजावण्यांत आले. त्या वेळीं परत येतांना गोविंदसुतांच्या भविष्याची सर्वांस गमतीनें आठवण झाली !

( ४ ) देशभक्त शिवरामपंत परांजपे व गोविंदसुत दोघेही अतीशय विनोदी व समवयस्क जिवलग स्नेही. रत्नाकरांतील एका चित्रावरून शिवरामपंतांनीं शृंगाररसात्मक लेख लिहिला होता व त्या लेखावर बरीच प्रतिकूल चर्चा वृत्तपत्रांत येत होती. गोविंदसुत थट्टेनें शिवरामपंतांस म्हणाले " या वयांत असले शृंगारिक लेख लिहिणें तुम्हांस शोभतें काय ? " यावर शिवरामपंतांनीं उत्तर दिलें " एकूण तुम्हीही या वयांत असले लेख वाचतांच हें ठीक आहे का ? "

( ५ ) पुण्याच्या प्लेगच्या वेळीं दरसाल आम्ही चिंचवडला रहात होतों. एक दिवस सायंकाळीं गोविंदसुत पुण्याहून ऑफिसांतून आल्यावर त्यांच्या कानावर वार्ता आली कीं गांवांत एक ब्राह्मणबाई बाळंत होत असतां वारली व तिच्या प्रेताची व्यवस्था करण्यास कोणी भाऊबंद येत नाहींत. लगेच गोविंदसुतांनीं पुढाकार घेऊन ऑफिसांतील चार कारकून मंडळींचीही मदत मिळून रातोरात सर्व व्यवस्था लावली. मग सर्व भाऊबंद खजील होऊन त्यांच्यापैकींही कांहीं सज्जन मदतीस धांवले !

( ६ ) १९०९ सालीं आम्ही सेकंड एल्.एल्. बी. च्या परीक्षेस बसलों. त्याच्या अगोदर ८।१० दिवस प्रकृति जरा बिघडली होती व अभ्यासही अपुरा झाला होता, यामुळें परीक्षेस बसण्याचा विचार नाहीं असें आम्ही मुंबईहून पुण्यास वडिलांस कळविलें. त्यांनीं पत्रिका पाहून लगेच उत्तर दिलें कीं " यंदा परीक्षा हटकून पास होण्याचा योग आहे, परीक्षेस फक्त बस म्हणजे झालें. कोरे पेपर दिले तरी पास होशील. " यामुळें मनास थोडा हुरूप येऊन परीक्षेला बसलों व ज्या प्रश्नांवर विशेष तयारी केली होती तेच प्रश्न येऊन परीक्षा उत्तम गेली व फर्स्ट क्लासाला २।३ मार्कंच कमी पडले इतक्या उत्तम रीतीनें पास झालों !

( ७ ) शेवटच्या दोन तीन वर्षांच्या आजारीपणांत गोविंदसुत हे एक दिवस सकाळीं अमळनेर येथील सुप्रसिद्ध डॉक्टर रामभाऊ म्हसकर यांचेकडे गेले व त्यांना म्हणाले " तुम्ही आजपर्यंत हजारों रोग्यांची परीक्षा करीत आलां, परंतु मी असा रोगी आहें कीं तुमची परीक्षा करण्याकरतां आलों आहें ! माझा रोग असाध्य आहे हें मी ठरविलेंच आहे, परंतु तुमच्या नांवाप्रमाणें तुमच्यापाशीं कांहीं रामबाण इलाज आहे कीं नाहीं याची परीक्षा पाहाण्यासाठीं आलों आहें ! " डॉक्टरांनीं उत्तर दिलें कीं " हरकत नाहीं. तुमचेपुढें परीक्षा देऊन पास होण्याची माझी तयारी आहे ! " डॉक्टरसाहेबांनीं कांहीं दिवस उपचार करून गोकर्णमहाबळेश्वरच्या प्रवासास जाण्यापुरती प्रकृती दुरुस्त करून दिली !

( ८ ) पुण्यांतील एका नामांकित कायदेपंडितांनीं नजर चुकीनें एका शेतकऱ्याची देशमुखी वतन इनाम जमीन गहाण घेऊन १०।१२ हजार रुपयांचा मिळकतविक्रीचा हुकुमनामा मिळविला होता व धनकोच्या वारसांनीं मिळकतविक्रीची दिवाणी कोर्टांत दरखास्त दिली होती. त्या शेतकऱ्याला कोणी सांगितलें कीं परशुरामपंतांकडे जा म्हणजे वतन ॲक्टाप्रमाणें ते कलेक्टरसाहेबांचा मनाई हुकुम देतील व तुझी मिळकत विकली जाणार नाहीं व जीव वांचेल. कलेक्टर साहेबांच्या फिरतीवर बारामती मुक्कामीं तो इसम परशुरामपंतांस भेटला. त्या वेळीं ( सन १९१० ) पुण्यास आम्ही नुकतीच वकिली सुरू केली होती. अमुक कलमाप्रमाणें या इसमाचा अर्ज लिहून पाठवावा असा वडिलांचा निरोप घेऊन तो आमचेकडे आला व कायद्याप्रमाणें आम्ही कलेक्टर साहेबांकडे अर्ज पाठविला व दिवाणी कोर्टांतही हजर होऊन तक्रार केली. लवकरच कलेक्टरकडून कोर्टास मनाई हुकुम येऊन दरखास्त रद्द झाली. परशुरामपंतांनीं आपलें काम केलें अशा भावनेनें तो इसम १०० रुपये घेऊन पुनः फिरतीच्या मुक्कामावर जाऊन त्यांस भेटला व त्यांस रुपये देऊं लागला. परशुरामपंतांनीं त्यास सांगितलें कीं "कायद्यानें जें कांहीं योग्य व सरळ होतें त्याप्रमाणें तुझे कामांत मी हुकुम घेऊन दिला आहे. त्याबद्दल तुम्ही आम्हांस पैसे देण्याचें कांहीं कारण नाहीं. तुम्हांला वाटल्यास पुण्यास जाऊन आमचे चिरंजीव वकीलांस फी व इनाम म्हणून कांहीं द्यावेसें वाटल्यास पुण्यास जाऊन द्या." पुण्यास आल्यावर त्या इसमाची बुद्धि बदलली व त्यानें १०।१५ रुपयांतच आमची समजूत केली हें मानवी स्वभावास धरूनच आहे !

( ९ ) एकदां एक मोठे पुढारी गोविंदसुतांस म्हणाले "दादा, तुम्ही खरोखर मोठे सिद्ध पुरुष आहां !" त्यावर गोविंदसुत म्हणाले "पण तुम्ही माझ्याहीपेक्षां फार मोठे पुरुष आहां. सिद्ध शब्दामागें आणखी "प्र" हें विशेषण माझ्यापेक्षां तुम्हांस जास्त आहे म्हणजे तुम्ही "प्रसिद्ध" पुरुष आहांत !"

( १० ) गोकर्ण महाबळेश्वराहून परत येतांना सांवतवाडीकडे एका मुक्कामाला एका धर्मशाळेंत उतरण्यासाठीं मंडळींनीं जागा पाहिली. परंतु त्या धर्मशाळेंत एक संन्याशी अगोदरच उतरलेले होते. या मंडळींचा आपणांस उपसर्ग होऊं नये अशी त्यांची मनीषा दिसली व ते त्यांस तेथें उतरूं देईनात. त्या जागेवर त्या संन्याशांचा वास्तविक कांहींच मालकी हक्क नव्हता. जागा मिळत नाहीं असें पाहून दादा परतणार तोंच 'तुम्ही कोणत्या गांवचे' असा संन्याशांनीं दादांस प्रश्न केला. 'मी अमळनेरचा आहे' असें दादांनीं उत्तर

देतांच "अमळनेर येथील पूज्य गृहस्थ गोविंदसुत आपल्या परिचयाचे आहेत काय?" असा संन्याशांनीं दादांस प्रश्न केला. "मीच गोविंदसुत आहें," असें दादांनीं विनयानें सांगतांच ते संन्याशी जरा ओशाळले व दादांचे पायावर डोकें ठेवूं लागले तोंच दादांनीं त्यांच्या पायांवर अगोदर डोकें ठेवलें, म्हणजे संन्याशाला आपणांस नमस्कार करूं दिला नाहीं. नंतर परस्परांचा बराच सुखसंवाद झाला व सर्व मंडळींची त्या जागीं उतरण्याची उत्कृष्ट प्रकारें व्यवस्था लागली.

( ११ ) गोविंदसुतांचा अमळनेर येथें मुक्काम असे तेव्हां चांगल्या प्रकृतीच्या स्थितींत आपल्या घराखेरीज गांवांत इतर बऱ्याच ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं दासबोध ज्ञानेश्वरी निरूपणाची त्यांची बैठक असे व प्रत्येक ठिकाणीं वेगवेगळे श्रोते असत. उदाहरण शुक्ल यांचे राममंदिरांत, कै. माधवराव मुठे यांचे घरां वगैरे. रा. नानासाहेब भिडे वकील यांनींही आपल्या घरीं दादांकडून एकदां दासबोध समजावून घेतला आहे. घरीं नेहमीं पोथीवाचनास व श्रवणास येणाऱ्या मंडळींत रा. बाळकृष्ण रावजी डांगरीकर पेन्शनर हेडकारकून ( हे द्वारका व इतर ठिकाणच्या तीर्थाटणांत दादांबरोबर होते ), रा. रघुनाथ पंढरीनाथ कारेगांवकर, पेन्शनर हेडमास्तर, रा. गोविंद बाळाजी नाईक, मेकॅनिकल इंजिनिअर, रा. राजदेरकर ड्रॉइंग मास्तर वगैरे मंडळी असत. या व अमळनेरच्या इतर सर्व प्रेमी सज्जनांनीं दादांचें चरित्र प्रसिद्ध झालेंच पाहिजे म्हणून वेळोवेळीं आम्हांस आग्रहानें सांगून प्रोत्साहन दिलेलें आहे व चरित्रांत अवश्य आल्या पाहिजेत अशा अनेक गोष्टी वेळोवेळीं सुचविल्या आहेत व लिहूनही पाठविल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं गोष्टींचा आम्ही चरित्रांत समावेश केलेला आहे व श्री. कारेगांवकर व श्री. गोविंदराव नाईक यांनीं दिलेल्या आठवणी स्थलसंकोचास्तव संक्षेपानें खालीं दिल्या आहेत. गोविंदसुतांच्या रोजच्या बैठकींतील अमळनेरचे आणखी गृहस्थ म्हणजे कै. विनायक गोविंद ऊर्फ अण्णासाहेब भिडे वकील हे होत. गोविंदसुतांनंतर ५।६ महिन्यांनीं अण्णासाहेबही निवर्तले. गोविंदसुतांनीं आपल्या सकाळच्या फेरफटक्यांत अण्णासाहेबांच्या बंगल्यांत डोकावून ते रिकामे दिसल्यास त्यांच्याशीं १०।२० मिनिटें संभाषण करावयाचें व अण्णासाहेबांनींही सायंकाळीं फिरावयास जातांना गोविंदसुतांकडे येऊन घटकाभर तरी बसावयाचें असा क्रम नेहमीं चालू असे. या बैठकींत हरएक प्रचलित सार्वजनिक प्रश्नांवर उभयतांची मोकळेपणानें चर्चा चाले व जरी कित्येक प्रश्नांवर उभयतांचें मतैक्य होत नसे तरी दादांची विचारभूमिका उच्च दर्जाची असल्याबद्दल अण्णासाहेबांस आदर

असे. गोविंदसुतांचें निधन झालें त्या दिवशीं ते मुंबईहून अमळनेरास आल्याचें समजतांच अण्णासाहेब फार आजारी होते तरी मुद्दाम गोविंदसुतांस भेटले व दोन तास त्यांच्या सन्निध बसले. गोविंदसुतही त्यांच्याशीं प्रेमानें बोलत होते व मी आजच जाईन असें नाहीं, थोडेसे दिवस काढीनही असें म्हणत होते, परंतु दादांचा अंतकाळ अगदीं समीप आहे असा डॉक्टर देशमाने यांनीं जवळच्या लोकांस बाजूस बोलावून आपला वैद्यकीय अभिप्राय कळवितांच अण्णासाहेब खिन्न अंतःकरणानें घरीं गेले. अमळनेर येथें दादांची शेवटची वैद्यकीय शुश्रुषा करणारे गृहस्थ म्हणजे डॉ. भय्यासाहेब चितळे, डॉ. देशमाने व दादांचे परमस्नेही कै. नागोमास्तर वैद्य यांचे चिरंजीव रा. माधव नारायण पाठक वैद्य हे होत.

( १२ ) श्री. कारेगांवकर मास्तर लिहितातः—श्रीदासबोध व समर्थांचे इतर ग्रंथ यांतील विषय दादांना करतलामलकवत् असत. दासबोधाचीं शेंकडों पारायणें केलेले एक वृद्ध गृहस्थ दादांना एकदां प्रवासांत भेटले होते. परंतु कांहीं ओंव्यांचा त्यांनीं आपल्या बुद्धिप्रमाणें जो अर्थ लावला होता त्यापेक्षां वास्तविक अर्थ अगदीं भिन्न स्वरूपाचा व भिन्न संदर्भाचा होता असें दादांनीं प्रवासांतील आपल्या सहवासांत त्यांच्या मनावर बिंबविलें. त्यावरून दादांच्या ठिकाणीं त्या गृहस्थांची फार भक्ती जडली व वेळोवेळीं त्यांचा बराच पत्रव्यवहार यासंबंधानें चालू असे, तीं आलेलीं पत्रें व त्यांतील शंकांचीं दादांनीं पाठविलेलीं उत्तरें आम्हाला ते वाचून दाखवून समजावून सांगत असत. अशा प्रकारें अनेक लोकांचा त्यांच्याशीं नेहमीं पत्रव्यवहार असे व त्यांत श्रीमंत, विद्वान् व सामान्य जनही अनेक असत. जिज्ञासूंना परमार्थ विषय समजाऊन देण्याची दादांना फार तळमळ असे हा अनुभव आम्हांला नेहमीं येत असे. ज्ञानेश्वरीचें निरूपण करतांना प्रथम ओंवींतील दुर्बोध शब्दाचा अर्थ सांगत, नंतर ओंवींतील शब्दांची रचना कशी मार्मिक रीतीनें झालेली आहे याचें विवरण करीत, नंतर चालू विषयाची संगति लावीत. दृष्टांत कोणत्या हेतूनें दिला आहे हें सांगत. हें सांगत असतां निरनिराळ्या मतांचे दृष्टांत असल्यास त्यांची फोड करून त्या त्या मतांचें स्पष्टीकरण करीत. विषयाच्या सुबोधतेसाठीं आलेल्या दृष्टांताची माहिती सांगत. पौराणिक कथाभागांतील दृष्टांत असल्यास तो कोणत्या पुराणांतील कथाभाग आहे हें चालू विषयापुरती माहिती देऊन सांगत. विशेष स्थळीं अर्थ सांगतांना ते आपल्या गुरुपरंपरेच्या अर्थावर भर देत व रहस्यार्थ सांगत. श्रीज्ञानेश्वरींतील विशेष म्हणजे अध्यात्मावर जास्त भर असें त्यांचें मत असे. प्रथम नोकरीचा पेशा, नंतर तीर्थाटण व ठिकठिकाणच्या पारमार्थिक जिज्ञासूंच्या भेटी यामुळें अनेक तऱ्हेच्या

स्वभावांच्या मनुष्यांचा दादांस अनुभव आल्यामुळें त्यांचें व्यवहारज्ञान किता घेण्यासारखें होतें. त्यांच्या नित्यक्रमाचें काम चालू असलें तरी पारमार्थिक विषयांबद्दल अगर प्रापंचिक अडचणींबद्दल त्यांस कोणी विचारण्यास आल्यास त्याच्याशीं अगोदर बोलत व नंतर आपलें काम करीत. प्रत्येक वेळीं प्रत्येक कामाचा अगर प्रवासाचा कार्यक्रम ते आगाऊ आंखून ठेवीत असत व अपरिहार्य अडचणींशिवाय त्यांत कधीं बदल होत नसे.

( १३ ) श्री. गोविंदराव नाईक लिहितातः— दादांच्या आयुष्यांतील ध्येय म्हणजे धर्मजागृति करणें हेंच होतें व या ध्येयास कायावाचामनानें ते वाहिलेले दिसत. सकाळीं ७ वाजले कीं ज्याप्रमाणें सूर्यनारायण अमुक ठिकाणीं असावयाचा हें ठरलेलें त्याप्रमाणें सात वाजले कीं दादा हे रा. राजदेरकर ड्रॉइंग मास्तर यांच्या समवेत बागेंतून फुलें तुळशी घेण्याकरतां जात असतांना दिसावयाचे. हें काम नोकर चाकरांकडून त्यांस करून घेतां आलें असतें, परंतु शारिरिक तपानें जातिनिशीं फुलें तुळशी आणून तीं भगवंतास वाहिलीं असतां तो प्रसन्न होऊन बुद्धियोग देतो ही दादांची नम्र भावना असल्यामुळें हें काम ते स्वतः करीत. दादांची स्नानसंध्यापूजा इतकी यथासांग व प्रेमळ वृत्तीची असे कीं सातव्या अध्यायांत वर्णन केलेल्या भगवंताच्या आर्त भक्तांपैकीं हे असतील असें पहाणारास वाटे, परंतु वस्तुथिति मात्र अशी होती कीं यापेक्षां ते फारच उच्च अधिकाराचे पुरुष होते. दुपारच्या जेवणानंतर पुष्कळ पेन्शनर झोंप घेतांना आढळतात, परंतु दुपारची वेळ ही वाचन, लेखन वगैरे रीतीनें दादांची उद्योगाची वेळ असे. परमार्थाबद्दल ज्याप्रमाणें दादांना तीव्र तळमळ असे त्याप्रमाणेंच स्वदेशोन्नतीबद्दलही निरतिशय प्रेम व कळकळ त्यांना असे व यामुळें देशांतील नेत्यांचे मतप्रवाह व चळवळी काय चालू आहेत या गोष्टींचेंही पूर्ण ज्ञान ते करून घेत असत. त्यांच्या जवळ एखादा श्रद्धाळू व जिज्ञासू इसम क्षणभर बसला तरी संतांच्या प्राकृत शब्दांत धर्मांतील उदात्त विचार ते इतक्या सुलभरीतीनें समजून देत कीं कोणत्याही पंथाला धक्का न लावतां, कोणत्याही प्रकारच्या प्रापंचिक उपाधींत असलेल्या मनुष्यास खरा विचार प्राप्त होऊन स्वकर्तव्याविषयीं त्यास बोध मिळाल्याशिवाय राहात नसे. दादांच्या संभाषणाचा व सहवासाचा ज्याला ज्याला लाभ घडला असेल त्या प्रत्येकाला दिसून येईं कीं दैवी गुणांची संपत्ति दादांच्या ठिकाणीं किती अलोट व अपार आहे !

( १४ ) धोपेश्वरचे " शांता-रमण " ऊर्फ शामराव प. नवरे हल्लीं श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य सं. मठ संकेश्वर-करवीर यांजकडे स्वारी

कारकून आहेत यांनीं ठळकवाडी बेळगांव येथून गोविंदसुतांच्या सहवासांतील बऱ्याच आठवणी पाठविल्या आहेत त्यांतील सारांशः— गोविंदसुतांसारखा उत्तम लेखक, विनोदप्रिय, जबरदस्त स्मरणशक्तीचा, निगर्वी व कोणतेंही काम आस्थेनें करणारा असा मनुष्य क्वचितच दृष्टीस पडतो. फार वर्षांपूर्वीं ते पुण्यास असतांना कांहीं कामानिमित्त मी २।३ वेळां त्यांस भेटलों असेन. त्यानंतर दोन वर्षांनीं मी अमळनेर येथें कांहीं कामानिमित्त गेलों असतां त्यांस सहज भेटण्यास गेलों. मी एक सामान्य मनुष्य, परंतु त्यांनीं माझा फार आदरसत्कार केला व आपलेकडे एक दिवस आग्रहानें मला राहवून घेतलें. मागें पुण्यास भेटल्यावेळीं फारसें त्यांचें माझें बोलणें झालें नव्हतें तरी सुद्धां मजविषयीं ओळख त्यांनीं चांगलीच ठेवली होती. सकाळीं उठल्यावर आपल्या बरोबर मला ते फिरावयास गांवांत घेऊन गेले व देवालयें वगैरे दाखवून गांवाची सर्व माहिती दिली. माझ्या परिचयाचे एक गृहस्थ ५।६ वर्षांपूर्वीं अमळनेरास होते, हल्लीं कोठें आहेत माहीत नाहीं असें मी बोलतांच वाटेंत १।४ इसमांचे घरीं ते वळले व त्या इसमाबद्दल पुरा तपास काढून सांगितलें कीं हल्लीं त्या इसमांची अमुक ठिकाणीं बदली झाली आहे. दुपारीं भोजनोत्तर वामकुक्षी करण्याचा माझा विचार होता, पण काय ? टपालचीं पत्रें वगैरे लिहून दादांची स्वारी पोषाख करून आली व " आतां तत्त्वज्ञान मंदिर व प्रताप मिल पाहण्यास चलता ना ? " असें दादांनीं विचारलें. ' आपण सकाळीं फार फिरलां आहां, विश्रांति घेऊन निघण्यास काय हरकत आहे ? ' असें मी म्हणतांच " भलतेंच ! मी जर दमलोंच नाहीं तर विश्रांतीची काय जरूर ? तुम्हांस विश्रांतीची जरूर वाटत असेल तर तासभर सवड देतों " असें दादा म्हणाले. मला जरी विश्रांति पाहिजे होती तरी वार्धक्यांतही दादांची इतकी तरतरी पाहून मी ओशाळलों व त्यांच्याबरोबर निघालोंच. त्या दिवशीं गीतामृतशतपदीकर्ते कै. बाबा गर्दे यांच्याशीं त्यांनीं माझा परिचय करून दिला व दादांच्या नवीन नवीन विनोदी बोधपर कोट्या ऐकून माझा आळस पार गेला व तो दिवस त्यांच्या सहवासांत आनंदांत गेला. कांहीं वर्षांनीं मी मुंबईस असतों असें त्यांस समजलें होतें व एके दिवशीं सायंकाळीं माझे बिऱ्हाडीं येऊन दत्त म्हणून माझे समोर उभे राहिले व मला आश्चर्यचकित केलें. मी व माझे नातेवाईक यांस त्यांच्या सहवासानें या वेळीं फार आनंद वाटला. माझी गांठ न पडल्यानें दोन वेळां ते माझे बिऱ्हाडावरून फिरून गेले होते असें आसपासच्या लोकांकडून समजलें. इतका गुणी व विद्वान् मनुष्य असून वागणी किती साधी व निगर्वीपणाची असे सर्वांचे उद्गार निघाले.

गोकर्ण महाबळेश्वराहून परत येतांना राजापूरला दादांचा एक दिवस मुक्काम होता. अशक्तपणामुळें व दगदगीनें त्यांस धोपेश्वरीं येतां आलें नाहीं, पण तेवढ्या वेळांत त्यांनीं धोपेश्वरला जाणाऱ्या लोकांबरोबर भेटून जाण्या-विषयीं मला निरोप दिला. कोणाचा निरोप आहे हें निरोप आणणाऱ्या लोकांकडून मला बरोबर समजलें नाहीं, परंतु मी तसाच निघालों व इच्छित ठिकाणीं जातांच ' गोविंदसुत तुमचीच मार्गप्रतीक्षा करीत आहेत. ' अशी हकीकत लोकांनीं सांगितली. भेट होतांच " कां राजेश्री, हल्लीं म्हणे तुम्ही एक कादंबरी प्रसवला आहा आणि आम्हांला तिची दादही दिली नाहीं ? " असें गोविंदसुत म्हणाले. लगेच मी खिशांतून ' नाहीं ' कादंबरी काढून त्यांस भेट म्हणून दिली. ' किंमत काय ठेवली आहे ' असें विचारतांच ' मला किंमत नको, भेट दिली आहे ' असें मीं सांगितलें, परंतु माझ्याकडून पुस्तक मोफत घेणें त्यांस आवडलें नाहीं. पुस्तकावर १० आणे किंमत पाहून " दोन आणे कमिशन मी तुमचेकडून घेणारच " असें म्हणून आपल्या बरोबरच्या गृहस्थां-कडून मी नको म्हणत असतांही त्यांनीं अधेली माझ्या खिशांत टाकलीच. " आतां या कादंबऱ्या सोडून कांहीं अध्यात्मविषय घ्याना लिहायला ? " असें ते मला म्हणाले. " पण माझ्यासारख्या कादंबरीप्रिय माणसाला तो विषय कसा लिहितां यावा ? " असें मी विचारतांच " प्रयत्न केला म्हणजे सर्व कांहीं साध्य होतें " असें त्यांनीं उत्तर दिलें. त्या रात्रीं प्रवासांतील अनेक गोष्टी आपल्या विनोदी भाषेत त्यांनीं सांगितल्या व सर्वांचा बराच काळ आनंदांत गेला. दुर्दैवानें हीच त्यांची व माझी शेवटची भेट ठरली.

